

# शांभवी

**डॉ. श्रीनिवास जनार्दन कशाळीकर**



सोमनाथ
प्रकाशन

शांभवी (कादंबरी)

क ४, नारायण पुजारी नगर,
गफारखान रस्ता, मुंबई ४०० ०१८
दूरध्वनी : ४९३२७३२, ४९८२५२९
Email : shriniwasjk@rediffmail.com
पहिली आवृत्ती : २९ मे २००१

**प्रकाशक :**
**उदयदादा लाड**
**।। सोमनाथ प्रकाशन ।।**
राजाराम इस्टेट, दादासाहेब फाळके रोड,
दादर (पूर्व), मुंबई ४०० ०१४
दूरध्वनी : ४१४ १२८८, ४१४ ७२८८
फॅक्स : ४१४ ८८८८
Email : Udaylad2001@yahoo.com

निर्मिती :
**नितीन हिरवे**

मुखपृष्ठ, रेखाचित्रे :
**सतीश भावसार**

अक्षररूप :
**ॐ प्रिंट.**दूरध्वनी : ३०८२३२१

मुखपृष्ठ छपाई :
**जॉली ऑफसेट**, वडाळा, मुंबई - ३१

मुद्रक :
**सुनील बाईंडिंग ॲण्ड प्रिंटिंग वर्क्स**
वडाळा, मुंबई - ३१

किंमत : २००/- **रुपये**



जनताजनार्दनाच्या

चरणी

विनम्रपणे

अर्पण

–श्रीनिवास जनार्दन कशाळीकर

# मनोवाच

वर्तमान परिस्थितीचं सर्वस्व पणाला लावून आकलन करता करता भविष्यकालीन परिस्थितीचं ज्ञान यथार्थ झालेल्या व भविष्यकाळ घडविण्याची शक्ती, युक्ती आणि दिशा प्राप्त झालेल्या युगंधराची ही कथा प्रत्यक्षात आपली सर्वांचीच आहे.

माझ्या कै. आईवडिलांचे आशीर्वाद व कर्ताकरविता नारायणाच्या कृपेने हे लेखन शक्य झालं.

माझी प्रिय पत्नी डॉ. सौ. विभा व मुली चि. ऊर्जिता व चि. मुक्ता यांच्या सहनशील, समजूतदार, संयमी व स्नेहल सहवासामुळे ही कथा शब्दबद्ध होऊ शकली.

डॉ. पुष्कर शिकारखाने यांच्या सहकार्यामुळे आणि प्रिय श्री. उदयदादा लाड यांच्या गुणग्राहक व विवेकी वृत्तीमुळे आणि मित्र नितीन हिरवे आणि चित्रकार सतीश भावसार यांच्या व इतर संबंधितांच्या सहकार्याने ती उत्कृष्ट स्वरूपात प्रकाशित झाली.

माझे इतर कुटुंबीय, स्नेही, नातेवाईक, सहकारी, विद्यार्थी आणि रुग्ण या सर्वांच्या शुभेच्छा आणि प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहकार्य माझ्या लेखनामध्ये उपयुक्त ठरलं.

या सर्वांचा मी ऋणी आहे.

**श्रीनिवास जनार्दन कशाळीकर**

# प्रकाशकाचे शब्द

डॉ. श्रीनिवास कशाळीकरांचा परिचय सुमारे पंचवीस वर्षांपूर्वी सुप्रसिद्ध नाटककार - लेखक कै. अनिल बर्वे यांनी माझ्याबरोबर करून दिला. अधूनमधून आमची प्रत्यक्ष भेट किंवा दूरध्वनीवरून संभाषण होत असे. पाच वर्षांपूर्वी 'शांभवी' या कादंबरीचे हस्तलिखित माझ्याच ऑफिसच्या नूतनीकरणाच्या वेळी गहाळ झाले ते नवीन सहस्रकाच्या सुरुवातीच्या दिवसांत कुठल्याही प्रकारे क्षती न होता गाथेसारखे अवतरले.

'शांभवी' हाती लागताच मी एकीकडे डॉक्टरांना कळविले आणि तिचे वाचन सुरू केले. पहिली काही पाने वाचल्यावर हा विषय जागतिक असल्याचे आढळून आले व झपाटल्यागत वाचून ती पूर्ण केली. माझ्याच बरोबर ज्या ज्या लोकांनी कादंबरीचे वाचन केले ते सर्व 'शांभवी'च्या प्रेमात पडले आणि तिथेच 'शांभवी'च्या प्रकाशनाची ज्योत उजागर झाली. स्वदु:खाबरोबरच परदु:खाचाही अर्थ, वर्ण, धर्म, देश या भेदांच्या पलीकडे जाऊन विचार करणाऱ्या अनेक मनांतील स्फुल्लिंगांची एक विशाल मशाल घेऊन निघालेल्या कमलेंद्राची ही कथा आहे. या मशालीला चिरंजीव इंधन मिळालेय ते जागतिक ख्यातीच्या गीता ज्ञानयज्ञातून. सर्व प्रकारच्या जटील, जागतिक प्रश्नांची निरसने व उत्तरे लेखकाने दिली आहेत. ही कादंबरी एका अद्वितीय ज्ञानग्रंथाचा दर्जा भूषविते. लेखकाला ज्ञानेश्वरीतील पसायदानाचा साक्षात्कार होऊन ही कादंबरी सुचली असे आमच्या दोघांत झालेल्या संभाषणातून स्पष्ट झाले. त्यात लेखकाने पसायदानातील शेवटच्या दोन ओळींवर खात्रीपूर्वक असे विधान केले, **''ज्ञानेश्वरांनी जगासाठी मागितलेल्या (विश्वात्मक देवाकडे) पसायदानाला परिपूर्तीचा वर मिळाला आणि ज्ञानदेव सुखीया झाला. हे स्वयं ज्ञानदेवांचे विधान असल्यामुळे ते अटळ ब्रह्मवाक्यच आहे आणि हा आनंदाचा दिवस एके दिवशी नक्की येईल यात शंका नाही.''**

'शांभवी'तील असामान्य उत्कर्षशाली सत्त्वामुळेच तिने तिचे अवतरण तिच्याच इच्छेनुरूप करून घेतले असे आम्हास वाटते. आम्ही प्रकाशकाची भूमिका करताना आम्हाला अतीव आनंद होत आहे. माऊलींच्या पुढील पंक्तीचीआठवण होते-

**सोने सोनेपणा उणे।**
**न येताची झाले लेणे।**

—उदयदादा लाड

मग तिहीं ते शांभव ।
अद्वयानंद वैभव ।
संपादिले सप्रभव ।
श्रीगहिनीनाथा ।। १८.१७५६

ज्ञानेश्वरी





महाराज सत्येंद्रांना जाग आली तेव्हा नुकतीच पहाट होत होती. ब्राह्ममुहूर्त अजून बराच काळ शिल्लक होता. निशादीपाच्या मंद तेजानं शयनगृहाच्या कोरीव भिंती गूढरम्य भासत होत्या. राधाकृष्णाची ती तसबीर दिव्य शृंगाराचा नमुनाच होती. श्यामल रात्रीच्या नीरव शांततेवर कुक्कुटरवाची दूरवरून येणारी ध्वनिकंपने उमटत होती. मध्येच एखाद्या भालूचा आवाज येत होता. थंड वाऱ्याच्या लहरीबरोबर येणारा निशिगंधाचा सुवास वातावरणातील त्या स्पंदनांना नवं परिमाण देत होता.

महाराज उठले तोच रात्रपाळीचा सेवेकरी लगबगीनं पुढे झाला. वाकून त्रिवार नमस्कार करून त्यानं महाराजांचे जोडे समोर नीट ठेवले. हात जोडून प्रथम व्यंकटेशाला नमस्कार करून महाराजांनी जोडे चढवले.

**समुद्रवसने देवी पर्वतस्तनमंडले ।**
**विष्णुपत्नी नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ।।**

पर्वतरूपी स्तन मंडलांनी चराचरांचं पोषण करणाऱ्या विष्णुपत्नी

पृथ्वीमातेला नमस्कार करून व आपल्या पायांचा स्पर्श झाल्याबद्दल तिची माफी मागणारा हा श्लोक धीरगंभीर आवाजात म्हणून महाराजांनी शेजारच्या ताम्रपात्रातील पाणी प्राशन केलं. त्यांच्या पिढ्यांमागून पिढ्या अशा तऱ्हेने पहाटे जलपान करीत. उषःकाली जलपान करण्याच्या या रिवाजाला उष:पान म्हटलं जात असे.

जलपान करून महाराज स्नानगृहाकडे वळले.

संगमरवरी स्नानगृहामध्ये कालानुरूप पुष्कळ बदल झाले होते. बाथ टब व बेल्जियम कट आरशांप्रमाणेच पर्शियन सुंदरींच्या उत्तेजक तसबिरींनी देखील काही जागा अडवली होती. श्मश्रुक्षौर व दंतधावनाचे विविध प्रकार उपलब्ध होते.

महाराजांनी त्यांच्या आवडीचे दंतमंजन घेतलं

**आयुर्बलं यशो वर्चः प्रजापशून्वसूनिच ।**

**ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्व नो देहि वनस्पते ।।**

आयुष्य, बळ, यश, आत्मज्ञान, बुध्दी इ. देण्याविषयी मंजनांतर्गत वनस्पतींची प्रार्थना करून त्यांनी मुखमार्जन केलं.

बाकी शौचविधी झाल्यानंतर

**नमामि गंगे तव पादपंकजं सुरासुरैर्वंदित दिव्यरूपम् ।**

**भुक्तीं च मुक्तिं च ददासि नित्यम् भावानुसारेण सदा नराणाम् ।।**

या शब्दात सुर आणि असुर अर्थात् देव व राक्षस यांनी जिच्या दिव्य रूपाची शतकानुशतके पूजा केली अशा भावानुरूप भोग आणि मोक्ष देणाऱ्या गंगामातेच्या पदयुगुलांना मनोमन वंदन केलं.

शीत आणि उष्ण असे दोनही पर्याय उपलब्ध असतानाही त्यांनी नित्याप्रमाणे शीत वर्षावाखाली स्नान केलं. पूर्वी स्नानापूर्वी ते अभ्यंग करीत. पण हल्ली त्यांना त्याचा कंटाळा यायचा. सेवेकऱ्याला अधून मधून पाठ तेवढी चोळायला सांगत. व्यंकटेशस्तोत्र म्हणत स्नान झाल्यानंतर सेवेकऱ्यानं दिलेल्या टॉवेलनं त्यांनी अंग कोरडं केलं. बाजूच्याच कक्षात कपडे बदलण्याची सोय होती. तिथे येऊन त्यांनी सेवेकऱ्यानं दिलेली धूत वस्त्र परिधान केली. जोडे चढवले आणि ते स्नानगृहाच्या बाहेर आले. तोंडानं व्यंकटेशस्तोत्र म्हणणं चालूच होतं. ते देवघरात आले.

ऐंशी वर्षं पार केलेल्या वृध्द सत्येंद्रांची शरीरयष्टी तरुणालाही लाजवील

अशी दणकट आणि प्रमाणबध्द होती. मानेवर रुळणारे केस वयोमानानुसार पिकले होते व विरळ झाले होते. भुवयाही पांढुरक्या झाल्या होत्या. आकडेबाज मिशा तर कापसासारख्या दिसू लागल्या होत्या. त्वचेवरही सुरकुत्यांचं जाळं उमटू लागलं होतं. पण तरीही त्यांची उंचीपुरी आणि ताठ आकृती अजूनही कुणावरही छाप पडावी अशीच होती. चाल सिंहाची होती आणि हालचाल चित्याची. चेहरा काळा-सावळा पण रेखीव होता. पाणीदार डोळ्यांमध्ये नैतिकतेच्या आत्मविश्वासाचं तेज विलसत होतं.

प्रजाजनांच्या आदराचं स्थान असलेले महाराज सत्येंद्र रोज पहाटे उठून शूचिर्भूत होऊन देवघरात येत तेव्हा तिथल्या समयांच्या प्रकाशात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला भक्तिरसाचा उजाळा चढे.

ते देवघर म्हणजे एक प्रशस्त दालनच होतं. पूर्वेकडील भिंतीसमोर एक लांब-रुंद असा संगमरवरी चौथरा होता आणि चौथऱ्यावर नक्षीदार शिसवी देव्हारा होता.

महाराज सत्येंद्रांनी प्रथम व्यंकटेशाचं भक्तिभावानं दर्शन घेतलं. मग साष्टांग दंडवत घालून ते काही क्षण तसेच स्तब्ध राहिले.

नायडू राजघराण्याच्या पिढ्यांमागून पिढ्या या स्थानी अशाच भक्तिभावानं नतमस्तक होत आल्या होत्या.

महाराजांनी त्यांच्याही पूर्वी पूजेसाठी येऊन गेलेल्या पुजाऱ्यानं आकर्षकपणे विविध प्रकारच्या फुलांनी सजविलेल्या देव्हाऱ्यात पाहिलं. कुलस्वामी व्यंकटेशाप्रमाणेच देव्हाऱ्याच्या मध्यभागी असलेल्या नक्षीदार तबकातील पंचायतन त्यांनी दृष्टीत साठवलं. पंचायतनामध्ये काळा शाळिग्राम म्हणजे विष्णू, धुरकट तपकिरी रंगाचा थोडासा खडबडीत महादेव, चांदीसारखी देवी, लाल गणपती आणि पारदर्शक काचेसारखा सूर्य होते. देव्हाऱ्याच्या त्या खणात डावीकडे कोपऱ्यात एका गडूमध्ये पवित्र गंगा होती, तर दुसऱ्या बाजूला असलेल्या शंखामध्ये सकाळीच पुजाऱ्यानं देवांना पिण्यासाठी म्हणून भरून ठेवलेलं पाणी होतं.

देव्हाऱ्याच्या खाली मखमली बासनात बांधून चंदनाच्या कोरीव पाटावर श्रीगुरुचरित्राची पोथी ठेवली होती. श्री गुरुचरित्र म्हणजे नायडू घराण्याचं आराध्यदैवत आणि नरसोबावाडी व गाणगापूर निवासी श्री नृसिंह सरस्वती यांचं चरित्र. नायडू राजघराण्यात श्री गुरुचरित्राच्या पठणाला

अनन्यसाधारण महत्त्व होतं.

स्वत:ला गंध लावून घेऊन सर्व देवांना, श्रीगुरुचरित्राच्या पोथीला आणि उजव्या बाजूला कोपऱ्यात देव्हाऱ्याच्या पलीकडे असलेल्या वास्तुपुरुषाला गंधफुलं अर्पण करून महाराजांनी पुन्हा एकदा साष्टांग नमस्कार केला आणि पुजाऱ्यानं नेहमीच्या भांड्यात ठेवलेलं तीर्थ आणि प्रसाद घेऊन ते बाहेरच्या दालनात आले.

आता त्यांची घोड्यावरून रपेट करून यायची वेळ झाली होती. त्यांनी रपेटीचा पेहराव केला अन् अकस्मात त्यांना त्यांच्या नातवाची-कमलेंद्राची-त्यांच्या बाबूची आठवण झाली ! साता समुद्रापलीकडे अमेरिकेत असलेल्या बाबूची आज अचानक कशी काय आठवण आली आपल्याला? त्यांना स्वत:चं थोडं आश्चर्यच वाटलं ! कुणी म्हणेल, स्वत:च्या नातवाची आठवण झाली तर त्यात आजोबांनी आश्चर्य करावं असं काय आहे ? उलट आजोबांना नातवाची आठवण न येणं हेच नवलाचं ठरेल. पण सत्येंद्रांना स्वत:चं आश्चर्य वाटण्यासाठी तसंच कारण होतं. त्यांच्या आणि कमलेंद्रांच्या दरम्यान फक्त भौगोलिक अंतर नव्हतं. विचित्र पण कडवट दुरावा होता. कारण, बरंच काही कडू घडलं होतं आणि आजोबा-नातवाचं नातं पार जगावेगळं आणि क्लेशकारक बनलं होतं. जगावेगळं व विचित्र अशासाठी, की कलह किंवा तंटा किंवा शत्रुत्व नव्हतं ! केवळ मतभेदातून झालेला तो दुरावा होता. पण त्यामुळे एकेकाळी त्यांचा जीव की प्राण असलेल्या त्यांच्या या नातवाची अलीकडे साधी आठवण जरी झाली तरी त्यांच्या अंगाची काहिली होई. जिवाला क्लेश होत. कधी कधी तर त्याच्या आठवणीनं ते कमालीचे खिन्न होत.

आजोबा-नातवाच्या नात्यात दरी निर्माण करणारी आणि कमलेंद्रांचा विचारही सत्येंद्रांसाठी तापदायक बनवणारी कडवट घटना, म्हणजे कुणालाही न जुमानता कमलेंद्रानं निवडलेला त्याचा व्यवसाय!

महाराज सत्येंद्रांच्या दृष्टीनं कमलेंद्राचा व्यवसाय राजघराण्याच्या परंपरेला काळिमा फासणारा होता.

महाराज सत्येंद्रांच्या स्मृतीमध्ये तो प्रसंग अगदी ताजा होता. अगदी काल-परवा घडल्यासारखा.

■



दुपारी साडेतीन-चारची वेळ. महाराज सत्येंद्र अभ्यासिकेत बखरी चाळीत बसले होते. अचानक 'ताता ताता' म्हणून कमलेंद्र आत आला. त्यांच्या चरणांवर माथा टेकवला आणि त्यानं सीनिअर केम्ब्रिजचा निकाल त्यांच्यासमोर ठेवला. त्यांनी निकालपत्रावरून नजर फिरवली तेव्हा त्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. कमलेंद्र सर्व विषयात उत्तम गुण मिळवून उत्तीर्ण झाला होता. त्यांनी मोठ्या आनंदानं पंचक्रोशीत पेढे वाटायची आज्ञा केली. थोड्या वेळानं त्यांनी मोठ्या कौतुकानं कमलेंद्राला जवळ बसवून पुढे बॅरिस्टर होणार की आय. ए. एस्. की आणखी काही म्हणून विचारलं आणि कमलेंद्र आता पुढे काय सांगतो हे मोठ्या अपेक्षेनं ते ऐकू लागले.

कमलेंद्रानं अगदी सौम्य आवाजात पण ठामपणे त्यांना म्हटलं, ''मी केटरिंग कॉलेजला जाणार ताता''. ते शब्द ऐकले मात्र महाराज सत्येद्रांची सारी उमेद उद्‌ध्वस्त झाली. सारा उत्साह गळून गेला. अवघ्या आनंदावर विरजण पडलं.

त्यानंतर काही दिवस कमलेंद्राचं मन वळवण्याचा त्यांनी खूप प्रयत्न

केला. पण यश आलं नाही. ते पार खचून गेले. त्याच्या या अगदीच विक्षिप्त निर्णयानं सर्वच जण निराश झाले होते. पण ते स्वत: तर पार ढासळून गेले होते, उन्मळून पडले होते.

महाराजांचं लक्ष दिनदर्शिकेकडे गेलं. दिनांक सोळा ऑक्टोबर एकोणीसशे पंच्याऐशी! हाच तो दिवस! त्यांच्या एकदम लक्षात आलं. याच दिवशी कमलेंद्रानं तो धक्कादायक निर्णय घेतला होता...

नकळत त्यांचं मन दिनदर्शिकेच्या पानांप्रमाणे फडफडत भूतकाळात गेलं, अगदी कमलेंद्राच्या बालपणीच्या काळात... मुलाचे पाय पाळण्यात दिसतात. कमलेंद्र असा निर्णय घेईल याची पूर्वकल्पना देणारा तो प्रसंग.

सर्वसाधारणपणे राजवंशातील माणसांच्या वागण्या-बोलण्यात, विचार करण्यात काही वैशिष्ट्ये असतात. वागण्यात रूबाब असतो, बोलण्यात ऐट असते. नजरेत नैसर्गिक जरब असते. विचारात ऐहिक सामर्थ्याची आणि सत्तेचीच उजळणी असते. या वैशिष्ट्यांना छेद देणारा तो प्रसंग! कमलेंद्र दहा वर्षांचा असताना घडलेला तो प्रसंग त्यांच्या डोळ्यांपुढे तरळला... त्या दिवशी पहाटे ते देवदर्शनाला आले तेव्हा त्यांना तो आश्चर्यकारक प्रकार दिसला होता...

कोवळा कमलेंद्र पद्मासनामध्ये बसून ध्यान करीत होता! त्याच्या चेहऱ्यावर विरक्तीचं तेज होतं आणि डोळे अर्धोन्मीलित होते, अनंतात विलीन झाल्यासारखे.

दहा वर्षांच्या चिमुरड्या पोरानं पहाटे पहाटे स्वत: होऊन उठावं आणि अशा तऱ्हेनं ध्यानमग्न बसावं ही बाब त्यांच्याही आकलनाबाहेरची होती. त्यांच्या डोळ्यात कौतुक दाटून आलं. पण त्याचबरोबर राजधर्माशी अगदीच विसंगत असलेल्या या बाबीमुळे, पुढे हा कुणी साधू-संन्यासी तर होणार नाही ना, या शंकेनं ते बेचैनही झाले. पण त्यांनी त्याला ध्यानमग्नतेतून उठवलं नाही. त्या मंगल आणि पवित्र दृश्याकडे एकटक बघत ते बाजूला बसून राहिले.

थोड्या वेळानं कमलेंद्र भानावर आला. तातांना तिथं पाहून तो थोडासा संकोचला आणि म्हणाला, ''ताता तुम्हाला माझ्यामुळे खोळंबावं लागलं...!''

त्यांनी कमलेंद्राच्या पाठीवर थोपटलं आणि रपेटीला निघता निघता त्याला विचारलं, ''बाबू ध्यान कशासाठी करीत होतास रे?''

कमलेंद्र उत्तरला, ''ताता, काल मी रमण महर्षींचं छोटं चरित्र वाचलं. मनांत आलं, आपण ध्यान करून पाहावं जमतंय का ते!''

''पण बाबू, ही कामं राजघराण्यातल्या पुरुषांची नव्हेत..... साधू, संत, योगी यांना शोभतं हे सारं!''

''पण ताता, मला खूप चांगलं वाटलं, हो. खूप प्रसन्न वाटलं. अन् ताता, जनक नव्हता का राजा असूनही तत्त्वज्ञानी?''

कमलेंद्राचा प्रश्न बिनतोड होता. त्याचं शंकानिरसन झालं नाही, हे त्यांना कळत होतं. पण त्यांचा नाइलाज होता. त्याच्या प्रश्नाचं उत्तर त्यांना माहीत होतं. पण ते त्या वयात त्याला कळलं नसतं. प्रवृत्तीपर अध्यात्म आणि निवृत्तीपर तत्त्वज्ञान यातला भेद कळण्याइतपत त्याला जगण्याचा अनुभव अजून यायचा होता. राजा जनकाचं श्रेष्ठत्व आणि जीवनदृष्टी त्यांना मान्य होती, किंबहुना वंद्य होती. पण ध्यान-धारणेला आजकाल जे स्वरूप प्राप्त झालं होतं, ते त्यांच्या दृष्टीनं मनाच्या रोगटपणाचं द्योतक होतं. लहानपणापासून मुलांवर षड्रिपूंवर मात करण्याचा आणि वैराग्यात कोंडून घेण्याचा आदर्श लावणं हे त्यांना विकृत वाटायचं. जीवन रसरसून वीरश्रीनं जगण्याचं सोडून नतद्रष्ट अशा निष्क्रियतेत लोळणं यालाच आजकाल अध्यात्म म्हटलं जाऊ लागलं होतं. त्यामुळेच एरवी कमलेंद्राच्या कुशाग्र बुध्दीचा त्यांना गौरव वाटत होता. तरी त्याची ही लक्षणं त्यांना एखाद्या बुवा-बैराग्याची वाटली. ही लक्षणं बरी नव्हती, या विचारानं ते अस्वस्थ झाले होते.

पण थोड्या वेळानं घोड्यावर स्वार होऊन दोघे निघाले तसा वाऱ्याचा झुळझुळ स्पश आणि बाहेरच्या रमणीय वातावरणानं ते आनंदी झाले, प्रफुल्लित झाले. तो प्रसंग आणि ती अस्वस्थता दोन्ही विरून गेली.

नुकत्याच पडून गेलेल्या श्रावणसरींनी वातावरण कसं एखाद्या ओलेत्या युवतीसारखं प्रसन्न आणि मोहक बनलं होतं. त्या वातावरणात, घोड्यांच्या टापांच्या नादात, त्या नादातील तालात, आणि त्या तालाच्या लयीवर झुलण्यात त्यांना अवीट गोडी वाटत होती. ते धुंद झाले होते. त्यांच्या मनात आलं, सृष्टीची निर्मिती ओंकारातून झाली म्हणण्याच्या मुळाशी

अनाहत ध्वनीची अनुभूती असावी. मध्यरात्री सारं काही नि:शब्द असताना स्वत:च्या अंतरंगातून उमटणारा, वैयक्तिक अस्तिवाची संपूर्ण विश्वाशी एकतानता अनुभवाला आणून देणारा सूक्ष्मतम ध्वनी असं ज्याचं वर्णन केलं जाऊ शकतं असा अनाहत ध्वनी! मानवी अस्तित्वाचा, मानवी जाणिवांचा सर्वात खोलवरचा तळ, सबस्ट्रॅटम! त्यांच्या मनात विचार आले, खरं म्हणजे कंपनं कुठे नसतात? पण सचेतनाला या कंपनांमध्ये तन्मय होताना आगळीवेगळी अनुभूती मिळते. कधी हृदयाचे वाढणारे ठोके, तर कधी भावनोत्कटतेनं कातर होणारा स्वर, कधी तारुण्यात मीलनाच्या वेळी होणारी ओठांची नि:शब्द हालचाल, तर कधी पापणीची फडफड, कधी भीतीनं पोटात उठणारा गोळा, तर कधी उत्तेजित झाल्यावर होणारी हातापायांची थरथर! या साऱ्यांची जाणीव म्हणजे रसरसणाऱ्या जीवनाचा आपल्याला जाणवणारा अवर्णनीय पैलूच!

महाराज सत्येंद्रही नादब्रह्मात तल्लीन झाले. जाता जाता अचानक उगवतीला मळभ भरून आलं होतं आणि दोघांनीही घोड्यांना टांच मारली होती. चौखूर दौडत जाणाऱ्या घोड्यांच्या खुरांनी धुरळा उडत गेला तसाच तो आनंद साठवत ते पुढे निघाले.

कालांतरानं कमलेंद्राच्या विरक्तीची धास्ती कमी झाली. कारण हळूहळू तो प्रसंग मनातून पार निघून गेला. त्याला मुख्य कारण म्हणजे कमलेंद्राची बाकी सारी वागणूक आणि प्रगती. ती निश्चितच कौतुकास्पद आणि उत्साहवर्धक होती. साहजिकच त्यामुळे महाराज सत्येंद्रांनी त्याच्याविषयी मोठी स्वप्नं रंगवली होती. मोठ्या अपेक्षा बाळगल्या होत्या. पण आज इतक्या वर्षांनी जेव्हा तो प्रसंग आठवला तेव्हा त्यांना जाणवलं, आपल्या मनात त्या प्रसंगी जी शंका आली, तीच अखेर खरी ठरली. कमलेंद्रानं बैरागी बनून नाही पण काहीशा अतिशहाणपणानं राजपरंपरेला आणि साऱ्या वैभवालाही धुडकावून लावलं होतं........साऱ्या स्वप्नांच्या ठिकऱ्या उडवल्या होत्या.

■

आजदेखील आकाश काळ्या ढगांनी झाकलेलं होतं. बाहेरचं वातावरण जसं उदासवाणं होतं, तसंच त्यांचं भावविश्वही काळवंडून-कोमेजून गेलं होतं. भूतकाळाच्या स्मृती भिंतीवर हलणाऱ्या छायांप्रमाणे भासत होत्या. कधी सुखद तर कधी शोकाकुल करणाऱ्या; कधी मोहक आणि लोभसवाण्या,

तर कधी थरारून सोडणाऱ्या. पण नेहमीच फसव्या. अस्तित्वाचा आभास निर्माण करणाऱ्या पण अस्तित्व नसलेल्या. सावली म्हणजे जिवंत व्यक्ती नव्हे, तद्वत आठवण म्हणजे वर्तमान नव्हे या जाणिवेनं ते कासावीस झाले. आठवणीच्या रूपात हुलकावण्या देणारे प्रसंग वास्तवात पुन्हा कधीही न परतण्यासाठी भूतकाळात गेलेले होते. वर्तमानाचं भान आलं तेव्हा त्या स्मृती अधिकच भेसूर बनल्या, त्यांना खायला उठल्या.

आज त्यांचा लाडका बाबू त्यांच्यापासून कायमचा दुरावला होता. त्यांच्या वर्तमान आणि भविष्य दोन्हीना काळाच्या काळ्याकुट्ट विवरात ढकलून देऊन! त्यांची स्वप्नं, त्यांच्या आकांक्षा, त्यांच्या अपेक्षा सारं काही पायदळी तुडवून!

त्यांच्या राजघराण्याच्या एकुलत्या एक आणि एवढ्या हुशार वारसानं त्यांची पर्वा न करता त्यांच्या लेखी हीन असलेला व्यवसाय स्वीकारल्यामुळे त्यांना झालेला मन:स्ताप न संपणारा, न सरणारा होता. त्यामुळे कमलेंद्राच्या आठवणीनं त्यांच्या अंगाचा तिळपापड होई. साहजिकच कमलेंद्राचा विचार त्यांच्या जवळपासदेखील फिरकणार नाही याची दक्षता त्यांचं अंतर्मनच घेत असे. म्हणूनच त्याची आठवण झाल्याचं त्यांना आश्चर्य वाटलं होतं ! पण ती आठवण बाजूला सारण्यासाठीच की काय, जागृत मनाला नकळत त्यांचं लक्ष भिंतींवर टांगलेल्या पूर्वजांच्या तैलचित्रांकडे गेलं.

महाराज पूर्णेंद्रांच्या-त्यांच्या पणजोबांच्या राजबिंड्या आणि तितक्याच सात्त्विक चेहऱ्यावर नजर पडताच नकळत त्यांचे हात जोडले गेले. केवळ पणजोबा म्हणून नव्हे तर एक आदर्श राजा म्हणून महाराज पूर्णेंद्र त्यांना नेहमीच पूज्य वाटत आले होते.

बालपणीच्या अस्पष्ट आठवणींच्या धुक्यातून देखील महाराज पूर्णेंद्रांच्या सात्त्विकतेचे आणि वात्सल्याचे किरण महाराज सत्येंद्रांना क्षणभर चेतना देऊन गेले.

बाजूलाच विलायती पोषाखातल्या त्यांच्या आजोबांची-महाराज उपेद्रांची तसबीर होती. अंतर्बाह्य विलायती संस्कृतीचा अंगीकार केलेल्या महाराज उपेद्रांच्या स्मृती तशा फार जुन्या नव्हत्या. आंग्लसंस्कृती स्वीकारल्याशिवाय आपल्याला तरणोपाय नाही असं त्यांना वाटायचं. त्यांच्या काळात ब्रिटिश

रिजंटांची आणि त्यांच्या मित्रमंडळीची राजवाड्यामध्ये नेहमीच सरबराई व्हायची. महाराज उपेद्रांच्या या ब्रिटिशधार्जिणेपणामुळे सत्येंद्रांना त्यांच्याबद्दल कधीच फारसा आदर वाटला नव्हता...

त्यांच्या शेजारची ही तसबीर महाराज विश्वेंद्राची-त्यांच्या वडिलांची. त्यांची तसबीर म्हणजे महाराज सत्येंद्रांसाठी एक अनाकलनीय गूढच होतं! कारण महाराज विश्वेंद्र सत्येंद्रांच्या अगदी बालपणी निवर्तले होते.

महाराज सत्येंद्राना जाणवलं, त्यांच्या पणजोबांचा वारसा त्यांनी स्वतःच काय तो पुढं चालवला होता. पुण्यश्लोक महाराज पूर्णेंद्रांच्या प्रजाहितदक्ष कारभाराची आणि संस्कृतिजतनाची आजोबांच्या काळात खंडित झालेली परंपरा केवळ त्यांनीच कशीबशी त्यांच्या स्वतःच्या एकट्याच्या खांद्यावर अजूनपर्यंत पेललेली होती.

बाजूलाच त्यांच्या स्वर्गीय मुलाची-युवराज खासदार केशवेंद्रांची तसबीर होती. तिच्याकडे लक्ष जाताच महाराज सत्येंद्रांना पुन्हा कटू स्मृतींनी घेरलं. केशवेंद्र म्हणजे राज्य खालसा होऊन सर्व सत्ता आणि शान पार लयाला गेल्याची आठवण! केशवेंद्रांचं दुर्दैव असं, की तो शेवटपर्यंत युवराजच राहिला! राज्याभिषेकाची संधीही न मिळता, मर्यादित राजसत्ता आणि राजवैभवाचाही अधिपती न होता खासदारांच्या कळपातला तो फक्त एक खासदार बनला! त्यांचा धाकटा पुत्र वीरेंद्र लग्नकार्य न करता घरदार सोडून इंग्लंडला गेला व तिथेच हॉटेल व्यवसायात रमला. पण एकूणच वकूब आणि कुवत सुमार असलेल्या वीरेंद्राला वाईट सवयीही जडलेल्या असल्यामुळे त्याच्याकडून काहीही अपेक्षाच नव्हत्या. त्याच्याबद्दल फारसं सुखदुःख नव्हतं. उलट तो गेल्यामुळे राजघराण्याची संभाव्य नामुष्की टळली, असंच साऱ्यांना वाटलं होतं.

केशवेंद्रांच्या स्मृतीत त्यांच्या काळजातला सल ताजा केला. स्वतः राजसंन्यास घेऊन युवराजाला स्वतःच्या हातांनी राजसिंहासनावर बसवण्याचा खरं म्हणजे ऐतिहासिक प्रघात; पण स्वतंत्र भारत सरकारनं संस्थानं खालसा केली आणि महाराज सत्येंद्रांना राजसंन्यास घ्यायच्याऐवजी सक्तीनं सत्ताभ्रष्ट व्हावं लागलं! राजसंन्यास आणि राज्याभिषेक इतिहासजमा झाले! ब्रिटिशांच्या काळात अधूनमधून स्वाभिमान खच्ची होणाऱ्या घटना घडत तरी राजपद होतं. राजवैभव होतं. स्वातंत्र्य नसलं तरी थोडीफार राजसत्ता आणि प्रतिष्ठा

होती. स्वतंत्र भारतात मात्र सारंच संपलं. सोमनिलयम संस्थान एक तालुका बनलं आणि महाराज सत्येंद्रांसह राजघराण्यातील सर्व व्यक्ती बनले साधे नागरिक. अधिकार राहिला तो फक्त मतदानाचा आणि तोही फक्त प्रौढांना! त्यांच्यासाठी उरला होता तो फक्त गत राजवैभवाचा इतिहास! तोच त्यांच्या नजरेसमोर तरळला ...! तो सारा बेचैन करणारा इतिहास त्यांच्या मनात अगदी स्पष्टपणे आणि घट्ट रुतला होता. पूर्वजांच्या यशाच्या गौरवशाली गाथा आणि पराभव व नामुष्कीच्या करुण कहाण्या त्यांनी बखरीतून समरसून वाचल्या होत्या. पुष्कळदा वडीलधाऱ्यांकडून जिवाचे कान करून ऐकल्या होत्या. शिवाय बरंच काही पाहिलं आणि अनुभवलंही होतं. मनात अशा तऱ्हेने एक सळसळता जीवनपट कायमच ताजातवाना होता. आज तो अलगद उलगडला...!

कर्नाटक आणि आंध्र प्रदेशाच्या सीमेवर चित्रावती नदीच्या तीरावर वसलेलं त्यांचं संस्थान, नायडू घराण्याचे मूळ पुरुष महाराज जयेंद्र यांनी वसवलं होतं. एका बाजूला चित्रावती नदीचं निळंशार पात्र आणि बाकी तिन्ही बाजूंना सोमनिलयम पर्वताच्या हिरव्यागर्द रांगा, अशी नितांत सुंदर नैसर्गिक पार्श्वभूमी सोमनिलयम संस्थानला लाभलेली होती. पूर्वी हा निसर्गरम्य प्रदेश विजयनगरच्या साम्राज्यात मोडत असे. महाराज जयेंद्रांच्या मर्दुमकीमुळे आणि राजनिष्ठ कर्तृत्वामुळे नायडू घराण्याला तो जहागीर म्हणून मिळाला. पुढे वारंवार युध्दांमधून विजयनगरच्या बाजूने मोलाची कर्तबगारी बजावल्यामुळे सोमनिलयम हे स्वतंत्र मित्रराज्य बनलं.

त्या काळात राजधानी सोमनिलयम एक नगर होतं. छोटंसं नगर. जेमतेम आठ हजार लोकवस्तीचं. या राजधानीतून आजूबाजूच्या तीस-चाळीस छोट्या-मोठ्या गावांवर आणि वाड्यांवर त्यांचा अंमल चाले.

सोमनिलयम संस्थानात शेती, उद्योग, शिक्षण, कलाकौशल्य, कारागिरी यांना राजाचं संरक्षण असे. तसाच लबाड व कामचुकारांना राजाचा धाकही असायचा. उद्योग-व्यापारउदीम सचोटीनं आणि परिश्रमपूर्वकतेनं यशस्वी करणं आणि वेळच्या वेळी कर भरणं या जबाबदाऱ्यांत कुणी कमी पडलं तर लगेच त्याला योग्य शासन केलं जात असे. थोडक्यात कर्तबगारीला संरक्षण व प्रोत्साहन आणि निष्क्रियता आणि फसवणुकीला कठोर शिक्षा अशी व्यवस्था होती.

बलुतेदारी होती. वर्णव्यवस्थाही बिनबोभाट चालू होती. पण बलुतेदार खाऊन-पिऊन सुखी होते. जाती-जातींमध्ये रोटी-बेटीचा व्यवहार चालत नसला तरी जातीय वैमनस्यही नव्हतं.

बलुतेदारीच्या पध्दतीमुळे कामांची विभागणी जातीनुसार झालेली होती. स्वतःच्या व्यवसायाचं बाळकडू बालवयापासूनच मिळत असे. घर, शाळा, उद्योग, यांच्यात तफावत नव्हती. समाजाचं दायित्व समजून जो तो आपल्या जातीनुसार व्यवसाय करी. खुल्या स्पर्धेला वाव नव्हता. अधिक ऐहिक सुखासाठी वाट्टेल त्यानं वाट्टेल तो व्यवसाय करण्याची मुभाही नव्हती. केवळ ऐहिक सुखाला जीवनांचे परमोच्च ध्येय समजून सामाजिक स्वास्थ्याकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ती नसल्याने तसा प्रयत्न सहसा कुणी करीतही नसे. परंपरांनी चालत आलेले नीती-नियम आणि बंधने केवळ वैयक्तिक फायद्यासाठी धुडकावून लावण्याची वृत्ती फारशी बोकाळली नव्हती.

खुल्या स्पर्धेत अनुस्यूत असलेली प्रोत्साहनाची कल्पना वेगळ्या प्रकारे मात्र रूढ होती. एक म्हणजे उत्तम प्रकारे स्वतःचा जातिधर्म पार पाडणं हे प्रतिष्ठेचं आणि धर्मनिष्ठेचं आदरणीय लक्षण मानलं जायचं आणि दुसरं म्हणजे स्वतःच्या कारागिरीत, व्यवसायात किंवा विद्येमध्ये विशेष कर्तबगारी गाजवणाऱ्यांना राजदरबारी मानसन्मान दिले जायचे. याशिवाय वर्णाश्रमानुसार आचरण करणाऱ्याला धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चारही पुरुषार्थ प्राप्त होतात, या समजुतीचा जनमानसावर पगडा होता. एकंदरीत विविध कारणांनी स्वैर आणि बेबंद वैयक्तिक महत्त्वाकांक्षेला जीवनात थारा नव्हता आणि जो तो सुरळीतपणे आणि श्रध्देनं कर्तव्य पार पाडत होता. अधूनमधून अपवादामत्क बुध्दिचातुर्य किंवा कलाकौशल्य असलेल्या व्यक्तीचे जातीयबंधनामुळे कुचंबणा होण्याचे प्रकार घडल्यानंतर धर्माचार्य आणि राजा यांच्या अनुमतीने त्यांनाही जातिबाह्य व्यवसाय करण्यास अनुमती देऊन समाधानी ठेवण्यात आले होते. अशा तऱ्हेनं जातिबंधनं सैल करण्यात आल्याच्या घटनांची बखरीमधून करण्यात आलेली नोंद त्यांच्या वाचनात आलेली होती.

सर्व स्त्री-पुरुषांना स्वतःच्या व्यवसायाचं शिक्षण मिळे आणि इतरही शिक्षणाच्या सोयी होत.

कुणी कोणताही व्यवसाय केला, तरी त्याला समाजात जो आदर मिळे तो त्याच्या नीतिमत्तेवरून, व्यवसायावरून नाही.

सोमनिलयमचं ऐश्वर्य आणि तिथली सुखी प्रजा ही त्या परिसरात एक आदराची नि कौतुकाची बाब होती. अर्थात, यामुळेच कित्येक संस्थानिकांना सोमनिलयमचा मत्सरही वाटत असे.

पुढे काळाच्या ओघात परकी आक्रमक आले. त्यांनी केलेल्या हल्ल्यांनी देवगिरी, विजयनगरीसारखी मोठी साम्राज्यं ठेचली गेली. परंतु या साऱ्या वादळांत, या उत्पातांमध्ये सोमनिलयम टिकून राहिलं.

पण अखेर व्यापाराच्या निमित्तानं भारतात शिरकाव करून घेऊन डेरेदाखल झालेल्या ब्रिटिशांनी महाराज सत्येंद्रांच्या पूर्वजांनाही नामोहरम केलं. कुटिल राजकारण आणि नीतिशून्य रणनीती या ब्रिटिशांच्या स्थायीभावांमुळे सरळ आणि उमद्या सोमनिलयमवासीयांचा आणि सोमनिलयमच्या सैन्याचा ब्रिटिशांसमोर निभाव लागला नाही.

अर्थात, ब्रिटिशांकडे फक्त कुटिल, कपटी आणि नीतिशून्य डावपेच होते असं नव्हे. त्यांच्याकडे स्वार्थांध मूल्यहीनता आणि विधिनिषेधशून्य व्यवहार एवढंच भांडवल होतं असंही नव्हे. तेवढ्याच सामग्रीवर ते भारत व पर्यायाने सोमनिलयम जिंकू शकले नसते. त्यांच्याकडे अद्ययावत युध्दसामग्री, करडी शिस्त, अव्वल तंत्रज्ञान आणि श्रेष्ठ युध्दकुशलतादेखील होती.

परिणामी दोन सप्टेंबर अठराशे चौसष्ट रोजी दिवसरात्र चाललेल्या तुंबळ युध्दात ब्रिटिशांनी सोमनिलयमचा पाडाव केला आणि चित्रावतीचं पाणी तिच्या मुलांच्या रक्तानं लाल झालं.

सत्येंद्रांना पुन:पुन्हा प्रश्न पडे, " हे घडलं कसं? हे सारं का घडलं?..... आजही याच प्रश्नानं त्यांना भंडावून सोडलं. कमलेंद्राशी त्यांनं तो दुर्दैवी निर्णय घेण्यापूर्वी झालेल्या चर्चा त्यांना आठवल्या. ऐन वयात आलेल्या कमलेंद्रानं संपूर्ण भूतकाळ अंतर्बाह्य अनुभवल्याप्रमाणे गतेतिहासाची सुस्पष्ट मीमांसा वेळोवेळी मांडली होती.

कमलेंद्र म्हणायचा, "स्वतंत्र विचार, चिकित्सा, शोध, अभ्यास, प्रयोग, नवनिर्मिती अशा साऱ्याच चांगल्या परंपरा तुटल्यामुळे त्याकाळच्या

बहुतेक राजांप्रमाणे आपल्या पूर्वजांची जीवनदृष्टीही अधू झाली होती. जी अवस्था राजाची, तीच प्रजेची. तीही पक्षाघात झाल्याप्रमाणे लुळीपांगळी झालेली होती. या पंगुत्वामुळे शौर्य, कष्टाळूपणा, सचोटी, उमेदपणा, सहिष्णूता इत्यादी इतर गुणही मातीमोल ठरले. इतर अनेक दुर्गुण असले तरी ब्रिटिशांकडे धडाडी, स्वतंत्र विचार, आक्रमकता, प्रयोगशीलता, उद्योजगता असे अनेक उपयुक्त गुण होते. बेरकीपणा, मुत्सद्देगिरी याचबरोबर व्यक्तिस्वांतत्र्याचा प्रबळ विचार असलेले ब्रिटिश त्यामुळेच जेते ठरले.

महाराज सत्येंद्रांना ते स्वत:देखील आयुष्यभर या तऱ्हेच्या दोषांमध्ये अडकल्याचा या क्षणी खेद वाटला. वास्तविक कमलेंद्राप्रमाणेच निरर्थक कर्मकांड आणि आंधळ्या रूढी त्यांनाही झोंबत. पुनर्जन्म, दैववाद, कर्मफलसिध्दांत वगैरे कल्पनांच्या बोजड, भोळसट आणि विपर्यस्त अनुमानाच्या जोखडामुळे राजे नि समाज निष्क्रिय, विकलांग नि अखेर नामशेष झाले हे त्यांनाही पटत असे. पण आजही त्यांच्यापाशी यावर उतारा नव्हता. किंबहुना आता ते अधिकच असहाय व अगतिक झाले होते.

कमलेंद्र म्हणे, "इतर राजांप्रमाणे आपल्या पूर्वजांमध्येही तिरसट दुरभिमान, आत्मघातकी संकुचितपणा, दीर्घद्वेषी वृत्ती आणि हेकटपणा हे दोष कमी-अधिक प्रमाणात होते."

पण सत्येंद्रांच्या मनात येई, "दोष कुणात नसतात? एकंदरीत पाहिलं तर आपलं घराणं आदरणीयच होतं. विद्या आणि सुसंस्कृतपणा, औदार्य, प्रजाहितदक्षता यांसाठी ते प्रसिध्द होतं व अजूनही लोक आपल्या पूर्वजांची स्तुतिस्तोत्रच गात असतात. तरीही असं का घडलं?"

मग कमलेंद्र त्यांच्या भावना जाणून त्यांना सांगे, "तो काळ प्रतिकूल होता. सततची आक्रमणं, आक्रमकांची रासवट जाळपोळ, देवळांची तोडफोड, नालंदा, विक्रमशीला, तक्षशीलासारख्या विद्यापीठांची नासधूस, लूटमार, धार्मिक छळ, जबरदस्तीची धर्मांतरं यामुळे, हे सारं अगदीच अपरिचित असलेला भारतवर्ष दहशत आणि भीतीनं थिजून गेलेला होता. संपूर्ण समाजाची अस्मिता हरघडी ठेचली गेल्यानं तो पूर्णपणे उद्‌ध्वस्त होऊ घातला होता. एका दृष्टीनं पाहिलं तर भारतीय समाजाची सुसंस्कृतता, सौम्यपणा, नेमस्तपणा, उमदेपणा इत्यादी गुणांनी शौर्य, मुत्सद्देगिरी वगैरे राजकीयदृष्ट्या महत्त्वाचे गुण झाकोळून गेले होते व भारतीयांचे गुण त्यांचे

दोष ठरले होते! प्रत्याक्रमणांच्या आणि प्रतिशोधाच्या जबरदस्त व पोलादी कवचांच्या अभावी खुनशी नि रासवट आक्रमकांच्या जुलमांनी भारतवर्ष जर्जर झाला होता. विनाशाच्या या वावटळीतून आणि उदासीनता व भयग्रस्तेतून तो सावरला जाण्यापूर्वीच ब्रिटिश राजवटीचा वज्राघात झाला होता. ह्या वेळपर्यंत संपूर्णपणे गाजलेल्या व विविध प्रकारच्या सामाजिक व सांस्कृतिक धक्क्यांनी विकृत झालेल्या व रूढी आणि अमानुष प्रथांत रुतलेल्या निस्तेज भारतीयांच्या तुलनेत, ब्रिटिश, वैज्ञानिक व औद्योगिक प्रगतीची फळं खाऊन आणि नव्या राजकीय विचारांचं रसायन पिऊन सर्वतोपरी शक्तिशाली झाले होते. त्यामुळे भारतवर्ष आणि त्यातील संस्थाने ब्रिटिशांच्या राजवटीखाली जाणं अनपेक्षित नव्हतं, जरी वेदनादायक असलं तरी! एकीकडे भारतात त्या काळी विरक्तीची बजबजपुरी, फितुरीची कीड आणि विश्वासघाताची विकृती अचानक वाढली होती तर दुसरीकडे ब्रिटिश व एकूणच पाश्चात्यांत स्वार्थ, कावेबाजपणा व साहसीपणा वाढला होता.''

या क्षणीही त्यांना कमलेंद्राचं म्हणणं सत्यच वाटलं. परंतु तरीही विषण्ण करणाऱ्या या इतिहासाचे बळी ठरलेल्या स्वत:ची, केशवेंद्राची आणि कमलेंद्राची त्यांना कीव वाटली, लाज वाटली. विशेषत: त्यांनी एकाकीपणे जी धडपड चालविली होती......घराण्यांच्या परंपरा व लोकहिताच्या कार्याची जी ज्योत तेवत ठेवली होती.....तिच्यामध्ये आशेचं स्थान असलेल्या कमलेंद्रानं साथ न दिल्याबद्दल त्यांना त्याचा पुन्हा तीव्र संताप आला. अगदी बाकी काहीच नाही, तर निदान चार धर्मादाय कामं करून गरिबांचा दुवा घ्यायचा सोडून स्वयंपाकघरचा महाराज बनलेल्या कमलेंद्राची त्यांना घृणा वाटली. ज्या हातांनी तलवार-बंदूक चालवायची, लोकांना दान द्यायचं ते त्याचे हात कांदे-बटाटे सोलण्यात रमले. या गोष्टीमुळे त्यांना पराकोटीची उद्विग्नता आली.

त्याची आठवण टाळण्यासाठी पूर्वजांच्या तसबिरीकडे गेलेलं त्यांचं लक्ष नकळत कमलेंद्रापाशी येऊन थांबलं आणि ते पुन्हा खिन्न झाले.

■

पडलेल्या खांद्यांनी आणि मेलेल्या नजरेनं महाराज सत्येंद्र हताशपणे घोड्याचा पागेपाशी आले.

घोड्यांची दाणावैरण आणि इतर निगा सांभाळणारा रघुराम त्यांना



पाहून थोडा मागे सरला. मग कमरेपासून वाकून त्यानं त्यांना मुजरा केला आणि त्यांच्या आवडत्या घोड्याच्या-पौनाचा लगाम त्यांच्या हाती दिला.

महाराज सत्येंद्रानी सरावानं रिकिबीत डावा पाय टाकला आणि एका उडीत ते पौनावर स्वार झाले.

खिंकाळून आणि मान वेडावून पौनानं त्याची पसंती दर्शविली तसे ते थोडे प्रसन्न झाले. त्यांनी टाच मारताच पौनानं नित्याचा मार्ग धरला.

महाराज सत्येंद्र एकटेच त्यांच्या आवडत्या पौनावर स्वार होऊन सकाळी चालले असताना जणू काही सोमनिलयमचा परिसर त्या शेवटच्या राजाकडे निरखून पाहत होता.

सोमनिलयम डोंगरांची शिखरं गडद काळी दिसत होती. काळ्या, निळ्या, जांभळ्या, गुलाबी, लाल अशा छटा पांघरलेलं आकाश जणू त्या शिखरांना स्वत:च्या कुशीत घेऊन कुरवाळीत होतं. उगवतीला अजून पहाटेची तेजस्वी लाली पसरायची होती. पण डोंगरमाथ्यावर पहाटेची चाहूल लागलेले पक्षी सूर्यदेवाचं स्वागत करण्यासाठी किलबिलाट करीत बाहेर पडू लागले होते.

वाऱ्याच्या झुळकीबरोबर आलेल्या रानफुलांचा प्रफुल्लित करणारा

सुवास महाराज सत्येंद्रांनी जोरदार श्वास घेत छातीत भरून घेतला अन् पौनाला पुन्हा टाच मारली. महाराजांच्या अंगवळणी पडलेल्या त्या इशाऱ्यासरशी तपकिरी रंगाचा तो धिप्पाड अरबी घोडा चौखूर दौडत निघाला.

वाट सरावाचीच होती. बघता बघता सोमनिलयमची सीमा आली. सोमनिलयम संस्थानाच्या सभोवती भक्कम कोट होता. चार दिशांना असलेल्या चार महाद्वारांपैकी हे एक महाद्वार होतं. दोन बाजूंना दोन प्रचंड बुरूज होते. डावीकडचा बुरूज अलीकडेच कोसळला होता. तटाच्या भिंतीही जागोजागी कोसळून त्यांच्यावर जिकडे तिकडे गवत वाढलं होतं. एकेकाळी या तटावरून, या बुरूजांवरून रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून गस्त घातली जात असेल याची कल्पनाही करणं नवागताला जमलं नसतं.

एकाच वेळी दोन-तीन हत्ती सहज आत येऊ शकतील एवढ्या त्या प्रचंड महाद्वाराचा डावीकडचा दरवाजा बुरूजासकट भुईसपाट झाला होता; तर उजवीकडच्या बुरूजाच्या दरवाज्याची बिजागरं आणि भलेमोठे लोखंडी सुळे गंजले होते.

स्वत:च्या डोळ्यांदेखत होत असलेली ती पडझड महाराजांना निमूटपणानं रोज पाहावी लागे. ते थोड्या अंतरावर येऊन एका जुन्या पुष्करिणीपाशी थांबले. पौनाच्या रुंद पाठीवरून ते उतरले तेव्हा पौनानं त्यांच्याकडे नजर वळवली. गेल्या काही वर्षांत, विशेषत: काही महिन्यांत महाराजांच्या तगड्या देहामध्ये होणारे बदल, त्यांच्या बैठक मारण्याच्या आणि उतरण्याच्या हालचालींतून त्याला जाणवत असावेत. तेवढ्यात महाराज सत्येंद्रांचा हात त्याच्या आयाळीतून फिरला, तेव्हा तो सारं विसरला. त्या ओळखीच्या, आवडीच्या उबदार स्पर्शानं पौना मोहरून गेला.

महाराजांनी पौनाला फिरायला मोकळा सोडला आणि ते पुष्करणीपाशी आले. पुष्करणीत उतरताना प्रचंड संगमरवरी शिळेवर कोरलेल्या पणजोबांच्या नावाकडे त्यांचं लक्ष गेलं. पुन्हा एकदा नकळत मान आदरानं झुकली.

स्वर्गीय महाराज पूर्णेंद्रांना अशा गोष्टींची फार आवड होती. त्यांनी जागोजागी पुष्करणी, पुष्पवाटिका, तरूवरांची बनं जोपासली. मंदिरं, धर्मशाळा, गोशाळा, पडशाळा जोपासल्या. नाना प्रकारच्या पशुपक्ष्यांची खास जोपासना केली.

महाराज सत्येंद्र बालपणापासून इथं येत. त्या काळात बाजूच्या व्यंकटेशाच्या देवळात, तिथल्या धर्मशाळेत प्रचंड वर्दळ असायची. अगदी पहाटे पहाटेदेखील महाराज पूर्णेंद्र इथे येताक्षणी त्यांच्या भोवती प्रजाजनांची गर्दी लोटायची. केवळ दर्शनानं धन्य होऊन, मुजरा करून, नमस्कार करून लोक जायचे.

आज ते स्थानमाहात्म्य संपलं होतं. श्री व्यंकटेशाच्या देवळात मिणमिणती काकडआरती चालू होती, तेवढीच. काळाच्या ओघात पुजाऱ्यांचं नेमून दिलेल्या उत्पन्नात भागेनासं झालं होतं. त्यामुळे ती उरलीसुरली प्रथाही शेवटच्या घटका मोजत होती...

या जुनाट भग्न वास्तू, नामशेष होत चाललेल्या ह्या प्रथा पूर्णेंद्रांनी जिवापाड जपल्या खऱ्या पण महाराज उपेंद्राच्या दुर्लक्षामुळे आणि महाराज विश्वेद्रांच्या अकाली मृत्यूने त्या वास्तू आणि प्रथांची खूपच आबाळ झाली होती.

शेवाळ दाटलेल्या त्या पुष्करणीतून एका बेडकानं उडी मारली. टुण टुण उड्या मारत तो गवतात गेला. ''पाणी स्वच्छ करायला हवंय,'' म्हणत महाराज सत्येंद्रांनी ओंजळीनं पाणी घेऊन स्वत:च्या चेहऱ्यावर मारलं. पाण्याच्या शिडकाव्यानं त्यांना ताजंतवानं वाटलं. त्या जुनाट पुष्करणीतून एक एक पायरी चढून बाहेर येताना त्यांचं मनदेखील भूतकाळाच्या विवरातील स्मृतींच्या धुक्यातून वर्तमानात आलं.

ते तसेच व्यंकटेशाच्या मंदिराकडे वळले. एका बाजूला जवळच धर्मशाळेची पडकी इमारत होती. त्या तेवढ्या निवाऱ्याच्या आधारानं एक बैरागी तिथं झोपला होता.

देवळाच्या आवारातल्या प्रचंड पिंपळावर आता चिमण्यांचा चिवचिवाट वाढला होता.

महाराज सत्येंद्र तसेच पुढे गेले. मंदिराच्या छोट्याशा सभामंडपाच्या वर एक माळा होता. त्या माळ्यावर ढोल, नगारे, ताशे इत्यादी वाद्यं बांधून ठेवलेली होती. पूर्वी इथं रोज पहाटे नौबत झडायची.

सत्येंद्रांनी जोडे बाजूला ठेवले आणि अनवाणी पावलांनी ते गाभाऱ्यात गेले.

काकडआरती पाहून त्यांना थोडं समाधान वाटलं. व्यंकटेशाच्या

मूर्तीसमोर माथा टेकवला आणि प्रसन्न वंदनानं ते बाहेर आले.

रपेट करून परत यायला निघाले तोपर्यंत गावातली गजबज वाढली होती. वर्दळ वाढली होती.

त्यांच्याकडे लक्ष जाताच जुने-जाणते त्यांना मुजरा करीत होते. अभिवादन करीत होते. नव्या पोरांना मात्र त्या माजी राजाची शान आणि सत्ता यांचं सोयरसुतक नव्हतं. मुजरे आणि नमस्कार स्वीकारत आणि दुर्लक्षाकडे दुर्लक्ष करीत महाराज सत्येंद्र राजवाड्यात परत आले. आतापर्यंत उन्हं वर आली होती.

■

घोड्याच्या टापांचा आवाज ऐकून लगबगीनं पुढे आलेल्या रघुरामनं अदबीनं महाराजांकडून पौनाचा लगाम घेतला आणि तो पागेच्या दिशेनं निघाला.

महाराज आपल्या मागोमाग येताहेत, हे पाहून मनातल्या मनात तो थोडा धास्तावला. पागेत शिरताना तो आणखीच खजील झाला. कारण अजून पागेतली झाडलोट झाली नव्हती. एकीकडे महाराजांना घाणीतून यावं लागलं म्हणून आणि दुसरीकडे ते आता आपल्याला काय म्हणतील या विचारांनी पौनाला बांधताना त्याच्या छातीत धडधडत होतं.

"रघुराम, हनुमंताचं शिक्षण कसं काय चाललंय"?

एकदम अनपेक्षितपणे आलेल्या त्या आपुलकीच्या प्रश्नानं रघुराम गडबडलाच. खरं म्हणजे महाराजांना अगदी जवळून ओळखणाऱ्यांपैकी तो एक होता. त्याच्या पिढ्यान्-पिढ्या राजघराण्याची सेवा करीत आल्या होत्या. राजवाड्याच्या परिसरातच तो लहानाचा मोठा झाला होता. पूर्वीपासून महाराजांचा त्याच्यावर अत्यंत विश्वास होता. त्याच्या बरोबरीचे बहुतेक पागेकरी पागा ओस पडत गेली तसे सेवेतून मुक्त केले गेले. पण इन मिन तीन घोड्यांच्या निगेसाठी रघुराम मात्र अजून सेवेत होता. याची कारणं दोन होती. एक म्हणजे राजघराण्याशी असलेलं त्याचं इमान आणि दुसरं म्हणजे घोड्यावर असणारा त्याचा जीव! रघुराम इतक्या तन्मयतेनं आणि बारकाईनं घोड्यांच्या दुखण्या-खुपण्याची देखभाल करी की त्याची जाण पाहून, घोडे त्याच्याशी संवाद करतात असं वाटावं. त्यातल्या त्यात

पौना म्हणजे तर रघुरामचा जीव की प्राण होता. पण पूर्वीइतकं झटपट काम आजकाल त्याच्या हातून होत नव्हतं. म्हणूनच आज दिरंगाई झाली होती. साहजिकच आधी महाराजांच्या येण्यानं आणि मग त्यांच्या त्या अनपेक्षित विचारणेनं तो एकदम गोंधळला होता. ''चांगलं चाललंय महाराजा, चांगलं चाललंय! नेहमी वरचा नंबर मिळवतो आपल्या आशीर्वादानं.'' त्यानं खाली पाहात उत्तर दिलं.

''बाकी घरचं सगळं ठीक आहे ना? ... तुझ्या मुली ...?''

''सर्व ठीक आहे महाराजा, आपली कृपा ... व्यंकटेशाची कृपा.'' रघुरामला महाराजांच्या आत्मीयतेनं भरून आलं.

पन्नाशीच्या रघुरामकडे, त्याच्या मान झुकवून, वाकून उभ्या राहिलेल्या देहाकडे आणि पायांकडे नजर लावलेल्या त्याच्या विनम्र चेहऱ्याकडे पाहून महाराज सत्येंद्रांच्या मनात आलं, ''राजानं प्रत्येक नागरिकाची, प्रत्येक सेवकाची पोटच्या पोरासारखी काळजी घ्यायला हवी.''

संस्थानी कारभार संपला त्याची सर्वांत अधिक झळ राजावर संपूर्णपणे अवलंबून असलेल्या रघुरामसारख्या इमानी सेवकानाच बसली, याची महाराज सत्येंद्राना जाणीव होती. साहजिकच बारीकसारीक चुकांकडे दुर्लक्ष करून आणि शिवाय गरजेला उपयोगी पडून ते रघुरामला सांभाळून घेत.

महाराज सत्येंद्र राजवाड्याकडे निघाले तसा त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहणाऱ्या रघुरामनं सुटकेचा निःश्वास सोडला. ते दिसेनासे होताच तो लगेच झाडलोट करू लागला.

पौनाला खरारा करताना, महाराजांचा तो काहीसा पडलेला चेहरा रघुरामच्या नजरेपुढे सारखा येत राहिला. त्याच्या मनात आलं, ''काय ही महाराजांची आजची अवस्था! एके काळचा हा आपला दाता आणि त्राता. पण हा आपला स्वामी आज स्वतःच किती अगतिक झालाय! पण तरी-देखील महाराज आपली किती काळजी करतात. काय काय म्हणून केलं नाही यांनी माझ्या कुटुंबासाठी? प्रथम अंबेचं, थोरल्या मुलीचं लग्न करून दिलं. मग मधल्या लक्ष्मीसाठी चांगल स्थळ आणून तिचा संसार थाटून दिला. धाकट्या पार्वतीचं तर लग्नही लावलं आणि नंतर तिचं अवघड बाळंतपणही जिल्ह्याच्या डॉक्टरकरवी पार पाडलं...'' एके काळची महाराजांची शान त्याला आठवली. ते वैभव डोळ्यापुढे उभं राहिलं. मानकरी, सरदार,

दरकदार, केवढा लवाजमा असायचा बरोबर! चेहऱ्यावर काय तेज असायचं! त्यांची स्वारी आली, की भालदार-चोपदारांपासून ते साऱ्या सेवकांपर्यंत सारेजण उत्साह, आनंद आणि आदरानं उत्तेजित होऊन जायचे. पण त्याचबरोबर काही चुका झाल्या असतील, हातून हेळसांडपणा घडला असेल, तर किती वचक वाटायचा भल्याभल्यांना! दरारा केवढा होता महाराजांचा! दरारा आणि शान जशी वैभवाची तशीच करारी आणि दिलदार स्वभावाचीही! एकदा रघुरामच्या कामगिरीवर खूश होऊन महाराजांनी त्याला बोटातली अंगठी काढून दिली होती, तर दुसऱ्या एका सेवकाला एकदा मोत्यांची माळ देऊन टाकली होती. पण महाराजांची साधी शाबासकी, त्यांची पाठीवरील कौतुकाची थापदेखील सर्वांना लाख मोलाची वाटे.

आज ते वैभव, ती शान पार ओसरली होती. रघुरामच्या दृष्टिदेखत हे सारं अघटित घडलं होतं. पण तरी ही, महाराजांचं मन अजून तेवढंच मोठं आहे याची रघुरामला खात्री होती. त्यामुळे त्यांच्याविषयीचा आदर तीळभरही कमी झाला नव्हता रघुरामला माहीत होतं, की विशेषत: युवराज केशवेंद्रांचा हृदयविकाराच्या धक्क्यानं अकाली मृत्यू झाल्यानंतर तर महाराजांची मिळकत जवळजवळ बंदच झाली. पण तरीही ते त्यांच्या नातवाकडून पैसे घेत नसत. त्यांचा पडता काळ आलेला पाहून देणेकऱ्यांनीही उचल खाल्ली. पण तरीही महाराज वाकले नाहीत. एक एक करून साऱ्यांची देणी भागवलीच पण तशाही स्थितीत त्याच्या पगारात महाराजांनी कपात केली नव्हती. एवढंच नव्हे, हनुमंताच्या शिक्षणाचा सारा खर्चदेखील अजूनही महाराजच करीत होते. त्याला काही हवं नको याची काळजी घेत होते. बैलानं एकदा शिंगानं भोसकलं तेव्हा तर महाराजांनी स्वत:चं रक्त देऊन हनुमंताला वाचवलं होतं.

लाखांचा पोशिंदा हा... गोर-गरिबांचा आधार... व्यंकटेशा तूच त्यांच्यावर कृपा कर, रघुराम स्वत:शीच पुटपुटला. त्याच्या डोळ्यांत पाणी आलं.

■

घोड्यावरून रपेट करून आल्यानंतर आजकाल महाराजांना थोडं थकल्यासारखं वाटायचं. पण त्यांनी अजून त्याकडे फारसं लक्ष दिलं नव्हतं. पण त्यांच्या मनात आलं, ''मनाची उमेद सरली की दणकट

आणि धडधाकट शरीरदेखील साथ देईनासं होतं!'' पागेतून निघाले ते महाराज सत्येंद्र थेट त्यांच्या अभ्यासिकेत गेले.

बाकी अनेक गोष्टी संपत आल्या, संपल्या, नामशेष झाल्या. पण पूर्वजांच्या काळापासून वापरात असलेली ती अभ्यासिका मात्र पूर्वीप्रमाणेच विद्यालंकारांनी नटलेली आणि समृध्द होती. भिंतीना टेकून उभ्या असलेल्या काचेच्या कपाटातून युध्दशास्त्र, राज्यशास्त्र वगैरे विविध विषयांवरील ग्रंथ होते. त्या त्या वेळच्या राज्यकर्त्यांच्या खास आवडीप्रमाणे या ग्रंथांच्या भरीला शिकार, वन्यपशू, काव्य, नाटके वगैरे विषयांवरच्या ग्रंथांची रेलचेल होती. अभ्यासिकेच्या भिंतींवर अनेक नकाशे होते. विशेषत: सोमनिलयम परिसराचा मोठा नकाशा होता. अतिशय प्रशस्त आणि उठण्या-बसण्याची उत्कृष्ट सोय असलेल्या त्या अभ्यासिकेत गेल्या गेल्या समोरच्या उघड्या शेल्फमधून महाराज सत्येंद्रांनी आजचं वर्तमानपत्र उचललं. पहिल्या पानावर कुणीतरी जिल्हा पातळीवरील नेता दिवंगत झाल्याची बातमी होती. महाराजांना युवराज, खासदार केशवेंद्राच्या निधनाची बातमी डोळ्यापुढे आली. ती देखील अगदी अशाच मांडणीत व टाइपात, अशाच प्रकारे दिली गेली होती. त्या घटनेला आता आठ वर्षं झाली होती. त्यांची पत्नी महाराणी मायादेवी पुत्रशोकानं खचून अखेर निघून गेली तेव्हा त्यांचा दबदबा कमी झाल्यामुळे की काय, तिच्या मृत्यूची बातमी आतल्या पानावर छोट्या टाइपात छापली होती. त्याही घटनेला आता सहा वर्षं होऊन गेली होती.

सत्येंद्रांनी आतलं पान उघडलं आणि ते अग्रलेख वाचू लागले. अग्रलेख संपवून वर्तमान पत्र ठेवून देणार एवढ्यात त्यांची लाडकी मधू धावतच त्यांच्यापाशी आली. पायावर डोकं ठेवून तिनं नमस्कार केला तशी त्यांनी तिला उठवून एकदम उचलून तिचा गालगुच्च्या घेतला.

''या वयात एवढं ओझं कशाला घ्यायचं ते? जिवाला सांभाळून राहावं ताता...''

चमकून महाराजांनी मागे वळून पाहिलं. त्यांची नातसून, मधूची आई, कमलेंद्राची पत्नी कामिनी उभी होती. कामिनीकडे पाहताच ते आणखीच उल्हसित झाले. एखाद्या वाळवंटात ओॲसिस असावं- हिरवळ असावी, तशी त्या वातावरणात कामिनी आणि मधू होत्या. मधूच्या अल्लड खळखळत्या बाललीलांनी आणि कामिनीच्या उभरत्या, तरुण आणि मोहक अस्तित्वानं

त्या वातावरणात चैतन्य संचारत होतं.

सडपातळ कामिनी दिसायला जशी रेखीव शिल्पाप्रमाणे सुंदर होती तशीच स्वभावानं गोड होती. तिच्या वागणुकीत नैसर्गिक आकर्षकता होती. चालण्यात डौल होता तसा बोलण्यात पोच होता. शब्दात सांत्वन होतं. दृष्टिक्षेपात आपुलकी होती. डोळ्यात तेज होतं.

तिला जेव्हा महाराज सत्येंद्रांनी प्रथम पाहिलं तेव्हाच त्यांच्या लक्षात आलं होतं की कमलेंद्रासाठी ती अगदी सुयोग्य होती.

तिच्या हसतमुख प्रसन्न चेहऱ्यावरील ते काळजीचे भाव पाहून त्यांना हसू आलं. अगं वेडे, अजून हाड-पेर मजबूत आहे! लहान बाळासारखी माझी काळजी नको करायला काही. हिलाच काय, तुलादेखील असंच उचलून गरागरा फिरवू शकेन.

"म्हातारचळ लागलंय वाटतं नातसुनेला उचलून फिरवायला."

तो डाफरण्याचा आवाज ऐकून तिघेही दचकले! दरवाजात केशवेंद्राची विधवा पत्नी कृष्णादेवी उभी होती. तिच्या चेहऱ्यावर हेटाळणी, वैफल्य, अगतिकता असे संमिश्र भाव होते. तिच्या म्हणण्यावर कुणी काही बोलण्यापूर्वीच मानेला हिसका देऊन फणकाऱ्यानं ती तरा तरा निघूनदेखील गेली.

तिच्या त्या खेकसण्यानं तिघांच्याही चर्या खर्रकन् उतरल्या. आनंदावर विरजण पडलं. महाराज सत्येंद्रांची तर अगदीच विचित्र अवस्था झाली. काय बोलावं हेच त्याना सुचेना. एवढीशी मधू पण तिलाही काही तरी एकदमच बिनसल्याचं जाणवलं.

तेवढ्यात कामिनीनंच स्वत:ला सावरलं. काहीच न घडल्याप्रमाणे ती म्हणाली, "चला ताता, चल मधू. नाश्ता तयार आहे."

"ठीक आहे, चल"... म्हणून महाराज मधूसह तिच्या मागून जेवणाच्या दालनात आले.

नाश्त्यासाठी बसल्यावरदेखील त्यांचा चेहरा पडलेलाच पाहून कामिनीनं म्हटलं, "ताता, आपण एवढं लावून घेऊ नका, अत्तम्मा म्हणाल्या ते ..."

ओढून-ताणून हसण्याचा प्रयत्न करीत सत्येंद्र म्हणाले, "छे: छे:! लावून काय घ्यायचं त्यानं? ती तरी कुठं समाधानी आहे? केशवेंद्र अचानक गेला. कमलेंद्रही जवळ नाही..." इतक्यात मधू जवळ आहे हे लक्षात आलं म्हणून ते तत्क्षणी अर्ध्यावरच थांबले. मग विषय बदलून

त्यांनी मधूच्या शाळेची चौकशी करत, हास्यविनोद करत नाश्ता आटोपला. ■

मधू नेहमीप्रमाणे गायनाच्या रियाजाला गेल्यावर कामिनीकडे रोखून बघत ते म्हणाले, ''सोळा वर्षांपूर्वी कमलेंद्रानं राजघराणं सोडलं. तो निघून गेला. योगायोगानं तुझं स्थळ आलं. तुम्ही उभयतांना आवडलात. तुमचं लग्न झालं. वाटलं होतं की लग्नानंतर तरी तो परत येईल. पण नाही. तुला घेऊन तो परत गेला. तुमच्या लग्नाला आता नऊ वर्षं होऊन गेली. दरम्यान तुझे वडील गेले, केशवेंद्र गेला, मधू जन्मली. तू परत आलीस आणि या ना त्या कारणानं तुझं परत जाणं लांबतच चाललं. वाटलं होतं आमच्या नाही तर कमीत कमी तुमच्या ओढीनं तरी कमलेंद्र परत येईल. पण तेही नाही. स्वत:चं आणि तुझंही वैवाहिक सुख नष्ट झालं तरी त्याचा हेका सुटत नाही. मधूला त्यानं पितृछाया देण्याची आवश्यकता आहे. पण तीही जबाबदारी घ्यायला तो तयार नाही. कमलेंद्राला कसलीच पर्वा नाही...



पहिली मुलगी झाली त्यानंतर मुलगा व्हायला नको? राजवंशाला कुलदीपक नाही. पण तरीही तुझी कूसदेखील उजवली नाही पुन्हा. नवरा नाही, मुलगा नाही, घराण्याला वंशाचा दिवाही नाही... कसं हे सारं सहन करू शकेल कुणीही स्त्री? आम्हा वृध्दांच्या तोंडाकडे पाहून कसे बरं दिवस ढकलणार? हताश झालीय कृष्णाबाई. असह्य झालंय तिला. म्हणून वागते डोकं ताळ्यावर नसल्यासारखी. बोलते तोंडाला येईल ते,... समोर कोण आहे याचं भान विसरून! मुद्दाम नाही बोलत आम्हाला दुखवण्यासाठी म्हणून... समजू शकतो मी तिची व्यथा!''

महाराजांचं ते बोलणं कामिनीच्या वर्मी लागलं. तिच्या मनात आलं, आपण एवढ्या आस्थेनं ह्यांना सांगायला गेलो तर उलट ताता अत्तम्मानाच पाठीशी घालताहेत! चूक अत्तम्मांची असूनही उलट कमलेंद्रावरच आगपाखड करताहेत! मुलगा नाही म्हणून माझंच उणं काढताहेत! ह्या वृध्दांना समोरच्या जिवंत माणसांपेक्षा घराण्याच्या निर्जीव परंपरा आणि लोकापवादाचं महत्त्व जास्त ! अत्तम्मांचं जाऊ दे पण तातानीही ह्या असल्या भोंगळ वंशाच्या दिव्याच्या समजुतीपायी आपला पाणउतारा करावा ना? आणि तो देखील आपला काहीच दोष नसताना? आपण त्यांना शक्य ती सर्व सहानुभूती दाखवत असताना आणि आपलेपणानं वागवत असताना? .... ती खिन्न झाली. पण मोठ्या प्रयासानं तिनं स्वत:च्या भावनांचा कढ उतूं जाऊ दिला नाही. विचार केला, वृध्दत्व हा देखील एक प्रकारे आजारच आहे. मन आणि शरीर दोन्हीही पोखरून टाकणारा. त्यातून जुन्या काळचे समज, अपसमज, अंधश्रध्दा या रोगात घट्ट होतात. यातून सुटका फक्त परिस्थिती एकदम सुधारली तर, किंवा मृत्यूनंच होते.

तिच्या चेहऱ्याकडे पाहणाऱ्या सत्येंद्रांना तिच्या नजरेला नजर भिडवता आली नाही. त्यांच्याही लगेच ध्यानात आलं, ''आपण नकळत हिच्या जखमेवर मीठ चोळलं, अन् तेही अगदीच विनाकारण. हिनं खरं तर पतीच्या सान्निध्यातील सुखाचं जीवन आपल्यासाठी सोडलं. मनातली व्यथा कधी चेहऱ्यावर येऊ न देता ही सोमनिलयममध्ये इतरांच्या सुखासाठी राहिली. पण आपण मात्र हिलाच हिणवलं. आपला तोलच जातो आजकाल, हेच खरं! ही तर सोडाच पण कमलेंद्रही कधी कुणाला जिव्हारी लागेल असं बोलला नाही. त्यानं कुणाचा अपमान केला नाही. पण त्याला

आपण उठसूठ दोषच देत राहतो. त्यानं आपलं ऐकलं नाही हे खरं, पण तो काही मोठा गुन्हा तर नव्हे? आपल्या वैफल्याचं खापर नेहमी त्याच्याच डोक्यावर फोडणं हे एका परीनं नामर्दपणाचं आहे. कामिनीला अशा तऱ्हेनं दुखवणं हे अगदीच निंद्य आहे. आपण पापी आहोत. या दोघांच्याही समोर आपण किती क्षुद्र आहोत, खुजे आहोत!''

त्यांची, त्यांच्या पारदर्शक चेहऱ्यातून सहज दृग्गोचर होणारी ती घालमेल, ते अपराधी भाव पाहून कामिनी स्वत:चं दु:ख विसरली. तिला त्यांची कणव आली. हळुवारपणानं ती म्हणाली,

''तुम्ही बोललेलं नाही मनाला लावून घेत मी. मायेची माणसं नाही, तर आणखी कोण एवढं स्पष्ट बोलणार? त्यातून तुमच्या भावना, तुमच्या उरातला सल थोडातरी कळतोच ना मला! पण माझाही याबाबतीत निरुपाय आहे. ते इथे राहते तर मला काय नकोसे आहेत? पण त्यांना इथे आणण्याच्या बाबतीत माझी कुठे सत्ता चालते? मला कोण विचारतो? माझं कोण ऐकतो?''

पायाकडे पाहात शांतपणे बोलणाऱ्या कामिनीचा रोख त्यांना कळला. कमलेंद्र दूर जाण्यास जसे ते स्वत: कारणीभूत होते तसेच तो दूर राहण्यासाठीदेखिल तेच पुष्कळ प्रमाणात जबाबदार होते. सतत त्याची निर्भर्त्सना करून त्यांनीच त्याला मनानंही दूर केलं होतं आणि दूर ठेवलं होतं. त्याचे परत फिरण्याचे रस्ते बंद करून टाकले होते. स्वयंपाक्याचा व्यवसाय एकदा पत्करल्यानंतर तो पुन्हा सोमनिलयममध्ये येऊन राहणं जवळजवळ असंभाव्य असलं, तरी सतत त्याची उपेक्षा करून, त्यानं देऊ केलेले पैसेही नाकारून त्यांनीच कटुता वाढवली होती. ही वस्तुस्थिती-जी त्यांना स्वत:शी तरी कबूल करणं भाग होतं - कामिनीनं अप्रत्यक्षपणे आणि त्यांचा अनादर न करता त्यांच्या नजरेला आणून दिली होती. त्यांचं स्वत:चं वैफल्य जेवढं खरं होतं, अस्सल होतं, समर्थनीय होतं तेवढेच त्या वैफल्याला ते स्वत:ही जबाबदार होते यात शंका नव्हती. तिच्या बोलण्याच्या अनुरोधानं त्यांनी विचारलं, ''तुला काय वाटतं? तुझ्याकडे हवं ते ठरवण्याची आणि करण्याची सत्ता असली अन् तू त्याला समजावलंस तर झालं गेलं विसरून, स्वयंपाकीपणाचा वेडेपणा सोडून तो परत येईल इथे?''

''नाही ताता, तसं नाही. मनं तशी एकदम निवळणं कठीणच

असतं. पण आहेत ते संबंधही वैफल्यापोटी बिघडवण्याऐवजी नाउमेद न होता त्यातल्या त्यात गोडीचे संबंध निर्माण केले तर आशेला नक्कीच वाव आहे. आत्मीयतेनं, सामंजस्याचं वातावरण तयार करत करत पुढे जे घडेल ते स्वीकारणं हेच आपल्या हातात आहे.

ठीक आहे, तसंच करू, आमच्याकडूनं होता होईतो आम्ही गोडीचे संबंध निर्माण करू. किमान, कटुता तरी नाहीशी करू. बाकी सारा भरवसा व्यंकटेशावर टाकून जे होईल ते प्रसन्न मनानं स्वीकारायचा प्रयत्न करू. ते स्वत:ला सावरत म्हणाले.

■

तेवढ्यात मुजरा करीत हरी आत आला. हरी हा महाराज सत्येंद्रांचा हरकाम्या. त्याची खुबी अशी, की कोणत्याही कामाला त्याचा नकार नसे. काम स्वत:ला न जमणारं नसलं, तर ते तो, दुसऱ्याकडून करून घेई. पण हरीला काम सांगितलं, की ते काम झालं नाही असं कधीच व्हायचं नाही. त्यामुळे तो बारीकसारीक लबाड्या करतो हे माहीत असतानाही महाराजांनी त्याला अजून काढून टाकला नव्हता. पण महत्त्वाच्या चर्चा, आर्थिक व्यवहाराचे प्रसंग, अशा वेळी तो आजूबाजूला असणार नाही याची ते दक्षता घेत. त्यामुळे या घरगुती गोष्टी चाललेल्या असताना मधेच त्याला आलेला बघून त्यांच्या कपाळावर सूक्ष्म आठी उमटली.

''बाकी टपाल अभ्यासिकेत ठेवलंय. कमलेंद्रगारूंचं टपाल तेवढं आणलंय,'' म्हणून त्यानं एक लिफाफा महाराजांच्या हाती दिला. परिचित आणि सेवक तिथल्या प्रथेनुसार महाराज सत्येंद्रांना महाराजा आणि कमलेंद्राला कमलेंद्रगारू म्हणत.

लिफाफा उघडता उघडता त्यांनी सूचक नजरेनं पाहिलं, तसा हरी लगबगीनं अभ्यासिकेतून त्यांचा चष्मा घेऊन आला. सोनेरी काड्यांचा चष्मा लावून त्यांनी हरीकडे चष्म्याच्या वरून पाहिलं, तेव्हा तो निमूटपणानं बाहेर गेला.

हरी गेल्यावर महाराजांनी ते पत्र मोठ्यानं वाचायला सुरुवात केली :

पूज्य तातांना,

बाबूचा साष्टांग नमस्कार.

माझं पत्र पाहून तुम्हाला कदाचित आश्चर्य वाटेल. पण आज पत्र

लिहायला घेतलं कारण, काही महत्त्वाच्या बाबी तुम्हाला कळवाव्याशा वाटल्या.

सर्वप्रथम महत्त्वाचं म्हणजे, तुम्हाला पसंत नसलेल्या या व्यवसायात माझा चांगलाच जम बसलाय. आता कॅलिफोर्नियात चार कोटी डॉलर्सचं नवीन हॉटेल भागीदारीमध्ये सुरू करतोय. कोणतीही अडचण नाही.

पण राजघराण्याची परंपरा, प्रतिष्ठा हे सारं काही तुमच्या दृष्टीनं मी मातीत मिळवलंय. तुमच्या मते मी राजघराण्याला लागलेला कलंक आहे. तुमची ही भूमिका व व्यथा माहीत असल्यामुळे मन मोकळं करण्यासाठी पत्र लिहायला घेतलं. अडचणी सांगून किंवा व्यथा दाखवून सहानुभूती मागायला, मदत मागायला नव्हे आणि स्वत:चा मोठेपणा प्रदर्शित करण्यासाठीही नव्हे.

ताता, बालपणापासून मला तुमच्या वात्सल्याचा अमूल्य लाभ झाला. तुमचे उत्तम संस्कार मिळाले. तुमच्या वागण्या-बोलण्यातून खूप काही शिकायला मिळालं. तुमची पितृछाया अकाली हरवली, तरी मोठ्या धीरोदात्तपणे तुम्ही पूर्वजांचा वारसा आणि त्यांच्या मायेचा झरा माझ्यापर्यंत पोचवला. ताता तुमच्या या कार्याची कदाचित इतिहासात नाही तरी माझ्या हृदयात आदरपूर्वक कृतज्ञतेनं, नोंद झाली आहे. त्यामुळे माझ्याकडून तुमचा जो अपेक्षाभंग झाला आणि तुम्हाला जे वैफल्य आलं त्याची, माझ्या भूमिकेची आणि आजच्या परिस्थितीची मला जसजशी संगती लागली तशी ती सविस्तर लिहिणं आवश्यकच झालंय. त्यातून सध्याची कटुता कदाचित कमी होऊ शकेल.

ताता, तुम्हाला तो प्रसंग स्मरतो? कुळकायदा लागू होण्यापूर्वीची ती घटना आठवते?

आपला एक कुळ-नारायण रेड्डीची परिस्थिती हलाखीची झाली. त्याला खंड भरता आला नाही म्हणून नान्नगारूंनी माझ्या वडिलांनी हुसकावून लावला, त्याला उद्ध्वस्त केला. त्याची जमीन लाटली, म्हणून तो धाय मोकलून रडला. पण नान्नगारूंच्या हृदयावर त्याचा परिणाम झाला नाही. शेवटी त्यानं तळतळाटानं शाप दिले. कालांतरानं शाप देत देतच तो अखेर मरून गेला.

त्या घटनेपासून मला मनापासून वाटू लागलं की नान्नगारूंसारख्यांचा

माज झडावा. त्यांचे हाल हाल व्हावे. सर्व संस्थानिकांची सद्दी संपून त्यांचे हाल व्हावे, ह्या ऐतखाऊ लोकांना आता यातना भोगाव्या लागल्याच पाहिजेत. सत्तांध संस्थानिक आणि त्यांच्या सत्तेचा मला उबग आला.

कुठे पिढीजाद वारशाने येणारी असली घृणास्पद सत्ता आणि कुठे ब्रह्मज्ञानी जनकराजा, नि:स्पृहतेचे मेरुमणी छत्रपती शिवराय आणि पुण्यश्लोक महाराज पूर्णेंद्रांनी प्रजेच्या सर्वांगीण हितासाठी पालन केलेला उदात्त राजधर्म! त्या दिवशीदेखील माझ्या भावना मी तुमच्यापाशी व्यक्त केल्या. पण तुम्ही त्याकडे कानाडोळा केलात.

असल्या ह्या माणुसकीचा गळा घोटणाऱ्या सत्तेची मला आणखीच शिसारी आली, ती दुसऱ्या एका प्रसंगामुळे.

दिवाळीच्या आदल्या दिवशीची संध्याकाळ होती. राजप्रासाद रोषणाईनं नटला होता. चमचमत होता. शाही मेजवानीही आयोजित केलेली होती. सर्वजण दागदागिन्यांनी आणि भरजरी पोषाखानं नखशिखांत नटले होते. सारे, एकाहून एक प्रतिष्ठित आणि गर्भश्रीमंत पाहुणे राजवाड्यासमोरच मुद्दाम तयार केलेल्या झगमगत्या मंडपात जमले होते. पंचपक्वान्नांचा वास सर्वत्र दरवळत होता. हास्यविनोदाला आणि स्वत:ची प्रौढी मिरवण्याला उधाण आलं होतं. आता मेजवानीला सुरुवात होणार एवढ्यात ... कोवळा हनुमंता मंडपात शिरला. गरमागरम जिलेबीनं भरलेलं भांडं पाहून हुरळला. निष्पाप मनानं त्यानं एक जिलेबी घेतली आणि खाऊ लागला.

ते बघताच पाहुणे नाराज झाले. त्यांची नापसंती बघून आणि या घाणेरड्या कारट्यानं रंगाचा बेरंग केला म्हणून नान्नगारू एकदम उसळले. रागाच्या आणि तिरस्काराच्या भरात त्यांनी हनुमंताला त्याच्या बकोटीला पकडून फरफटत बाहेर नेला आणि त्याच्या कानशिलात भडकावली. रघुरामनं ते पाहताच तोही बाहेर धावला. पण हनुमंताला सोडवून त्याची समजूत घालण्याऐवजी त्यानंही आणखी एक चपराक त्या निरागस पोरालाच दिली.

ते बघून मला धक्काच बसला. तात्काळ मी पुढे होऊन एकीकडे नान्नगारूंना आणि दुसरीकडे रघुराम दोघांनाही खडसावलं. हनुमंताला उचलून घेऊन मेजवानी सोडून निघून गेलो. त्या क्षणी माझ्या मनानं घेतलं की मेजवानी सोडली तसंच ऐतखाऊ आणि बांडगुळाचं जिणंही सोडून द्यायचं.

ताता, या प्रसंगीही तुम्ही चूपच राहिलात ! भूतकाळातल्या गतवैभवाच्या, पोकळ मोठेपणाच्या, आंधळ्या व अडाणी परंपरांच्या विटक्या चिंध्या त्यावेळीही तुम्ही उतरल्या नाही आणि आजही नाही. चार धर्मादाय कामं करून स्वत:चा अहंकार चुचकारण्याचा लंगडा प्रयत्न तेवढा तुम्ही करत आहात. असल्या भ्रामक मोठेपणाच्या सोसापायी तुम्ही माझ्या भावनांचा उपहास केलात. मला दूर सारलंत, हाकलूनच दिलंत जवळजवळ. पण तेवढ्यावरही न थांबता मी आत्मीयतेनं देऊ केलेला आणि स्वत:च्या प्रामाणिक श्रमांनी कमावलेला पैसा ठोकरून लावलात. राजसत्ता गेली, फक्त आभास राहिला. पण प्रजेच्याच नव्हे तर कुळांच्या श्रमांवर, त्यांच्या रक्तावर ताव मारणाऱ्या पारंपरिक राजधर्माच्या या आभासापोटी तुम्ही मला झिडकारलंत. माझ्या स्वकष्टार्जित पैशामागे असलेल्या सचोटी व इतर साऱ्या सद्‌भावना तुम्ही लाथाडल्यात. तुम्ही ज्या मोठेपणासाठी मला दूर केलंत ती संस्कृती नव्हे तर विकृती आहे याची मला तेव्हापासून खात्री वाटू लागली, ती आजपर्यंत!

खरं सांगू? वीरेंद्रकाकांनी हा व्यवसाय सुचवताच मी स्वीकारण्याचं कारण म्हणजे मला माझा अहंकार, माझी बेगडी प्रतिष्ठा, पिढीजाद ऐतखाऊपणा सर्वकाही गाडून टाकायचं होतं. खरंच ताता, श्रमाच्या पूजेनंच मला अस्सल राजधर्माच्या जाणिवेकडे आणलंय. जो राजधर्म जनक, शिवाजी, पुण्यश्लोक पूर्णेंद्र यांनी पाळला त्यांची यथार्थ जाणीव मला होऊ लागलीय. सत्य शोधण्याची, सत्य अनुभवण्याची, आत्मज्ञानाची, आत्मानुभवाची, आत्माविष्काराची, खऱ्या राजधर्माची मला अधिकाधिक स्पष्ट जाणीव होतेय. याच राजधर्मानं साऱ्या विश्वाचं कल्याण होणार यात मला शंका नाही. याउलट इतरांच्या जिवावर ऐषआराम करणारे तमोगुणी रसातळाला जाणार यात शंका नाही. विकारवशतेचा नाश आणि आत्मज्ञानाधिष्ठित सत्तेचा व संस्कृतीचा उदय होणार याबद्दल माझी खात्री झालीय! सोळा वर्षांत मी पुष्कळ पाहिलं, पुष्कळ सोसलं. पुष्कळ भोगलं, पुष्कळ उपभोगलं. जगाचा प्रचंड अनुभव आला. भोंगळ राजधर्माचा, बेगडी प्रतिष्ठेचा आणि उन्नतीला मारक परंपरांचा, तसेच ऐतखाऊ सत्ताधारी, शासक व नेत्यांचा सर्वनाश होऊनच विश्वकल्याण साध्य होईल हे मला स्वच्छ दिसू लागलंय.

शेवटी एक बाब सांगतो. जी स्थिती दिखाऊ संस्कृतीची, तीच

माझ्याबाबतीत माझ्या व्यवसायाचीही होऊ शकेल. कधी तरी स्वयंपाक्याच्या व्यवसायाची ही कातही गळून पडेल असंही मला वाटतंय. भविष्यात नेमकं काय घडेल हे सांगता येत नाही. पण उज्ज्वल भविष्याची पहाट माझ्या आत फटफटतेय एवढं मात्र खरं.

असो. हे सारं जे लिहिलंय, दोषदिग्दर्शनाचा जो आगाऊपणाही केलाय तो तुमचा उपहास किंवा अपमान करण्यासाठी मुळीच नाही. तुमच्याकडून बरंच काही शिकूनच मला जे कळलं तेच प्रामाणिकपणे लिहिलंय. तुम्हाला रुचलं तर ते तुमचंच आहे. पण पटलं नाही तर कृपया रागावू नये.

हे विज्ञापना.

सर्व थोरांस साष्टांग नमस्कार आणि शुभेच्छा.

चि. कामिनी व मधूसह सर्व लहानांस अनेक आशीर्वाद.

तुमचा,

बाबू

गंभीर मुद्रेनं महाराज सत्येंद्रांनी पत्राची घडी करून लिफाफ्यात ठेवली. त्यांच्या चेहऱ्यावरची नापसंती, व्यथा आणि गोंधळ पाहून कामिनी बुचकळ्यात पडली. नकळत अस्फुट हास्यही उमटलं.

''हसायला काय झालं कामिनी?''

''काही नाही. पत्रातली तत्त्वज्ञानाची झोड ऐकून आणि तुमची चेहऱ्यावर उमटलेली गोंधळाची प्रतिक्रिया पाहून...''

''मी गोंधळलेला नाही. चिडलेलाही नाही. उलट तोच शीड नसलेल्या जहाजाप्रमाणे दिशाहीन झालाय. आम्ही आमच्या परंपरा सांभाळतो तेच बरं.'हे बोलताना, मनातून मात्र सत्येंद्रांना जाणवत होतं की खरोखरच आपण गोंधळलोय. कमलेंद्राच्या म्हणण्यातलं तथ्य त्यांना जाणवत होतं, पण नेमकेपणानं उमजत मात्र नव्हतं.

कामिनीनंच मग त्यांना पृच्छा केली, ''ताता कालबाह्य रूढींच्या पिंजऱ्यात राहून काही भव्यदिव्य कसं काय घडवता येईल? आजच्या स्वार्थी राज्यकर्त्यांपुढे आणि त्यांच्या लाचार, माजोरी प्याद्यांपुढे तुमच्या-सारख्यांच्या सात्त्विक धडपडीची काय अवस्था झालीय? ना तुम्ही तुम्हाला अभिप्रेत असलेला राजधर्म आचरू शकला, ना तुम्हाला स्वार्थांध व सत्तांध

राजकारणाची कळ उमगली. निराशेची लक्तरं लपवत, संपूर्ण पडझड होऊन मातीच्या ढिगारा बनलेल्या प्रतिष्ठेच्या इमारतीची दीनवाणी डागडुजी करताहात तुम्ही. किंबहुना तसा केविलवाणा प्रयत्न चाललाय तुमचा. हताश मनाची व्यथा लपवत किती काळ हे सत्य नाकारणार तुम्ही?''

" कामिनी ! आमच्या जखमेवर असं मीठ चोळू नकोस. आमचं राहू दे. पण स्वत:चा देश, स्वत:ची माणसं, पूर्वजांचा वारसा म्हणजे फक्त रूढींचा पिंजराच का? पूर्वजांचं काम पुढे चालवणं हा राजधर्माचा आभास आणि खानसामा बनणं ही मात्र भव्यदिव्य कर्तबगारी का? कामिनी तुम्हा दोघांच्याही टवाळीला, उपमर्दाला चोख उत्तर दिलं असतं. पण आम्ही आता थकत चाललोय... आमची गात्रं शिथिल होत चाललीयत... आमच्या नजरेसमोर सर्वस्वाची परवड होताना, आमच्या धारणा साकार करून दाखवण्याची ताकद आमच्या अंगात राहिली नाही. आम्ही असहाय झालो आहोत. स्वप्नभंग आणि अवहेलनेचे धनी बनलो आहोत. स्वप्नं मोठी, म्हणून स्वप्नभंगाचं दु:खही मोठं आहे. पण गरुडझेप घेताना पंख छाटल्यानं होणारं दु:ख जटायूचं असतं, पिंजऱ्यातल्या पोपटाचं नव्हे. पण घायाळ जटायूप्रमाणे कावळ्यांकडूनही टोचून घ्यायचं प्रारब्धात आलंय आमच्या....

बोलता बोलता त्यांचा स्वर कातर झाला. त्यांचे डोळे कधी नव्हे ते अश्रूंनी डबडबले. वेदना आणि चीड यांनी ते थरथरू लागले.

कामिनी सुन्न झाली. तिला काय बोलावं सुचेना. ती काही बोलणार एवढ्यात महाराज पुढे म्हणाले, ''पोटाचीच चिंता असणाऱ्यांचं दुर्भाग्य आम्ही कमी लेखीत नाही. पण... पण आमचं प्राक्तनच इतकं फुटकं, की आम्ही राजधर्माच्या प्राणवायूला मुकलो. पोटासाठी जगण्याची कल्पनाच सहन होत नसल्यानं आमची जिवंतपणीच प्रेतयात्रा निघालीय!''

त्यांच्या बोलण्यानं हेलावलेल्या कामिनीनं कसंबसं स्वत:ला सावरून म्हटलं, " ताता, असं जिवाला का बरं एवढं लावून घ्यायचं? मला एवढचं म्हणायचं होतं की या राजघराण्याच्या आता कालबाह्य झालेल्या परंपरा नि त्यांची क्लेशकारक बंडखोरी दोन्ही बाजूला पडून या दोन्हीं-मधला चांगला आशय जतन करणारा तिसरा चांगला मार्गही निघू शकेल.''

तिच्या त्या सोज्वळ आणि सांत्वनपर स्पष्टीकरणानं काहीसे शांत होत महाराज म्हणाले,

"कामिनी, तिसरा मार्ग? कमलेंद्राच्या पत्रात तर त्यानं स्पष्ट म्हटलंय, की त्याला स्वत:लाच नेमकं काय घडेल ते माहीत नाही. अशा स्थितीत तिसरा मार्ग आहे कुठं? नव्या अनुभूतीचं अतिरंजित वर्णन आणि आमचा उपहास याशिवाय आहे काय पत्रात?" त्यांच्या प्रत्येक शब्दात साशंकता होती.

महाराज क्षणभर कामिनीकडे रोखून पाहत राहिले. मग हळूहळू तुटकपणे त्यांनी म्हटलं, "या राजघराण्याच्या परंपरेपेक्षा अन्य काहीही मोठं नाही असं म्हणता यायचं नाही, हे खरं आहे. कमलेंद्राच्या बंडखोरीतही अल्पस्वल्प तथ्य असेल हे देखील अगदीच नाकारता यायचं नाही. अखेर आमच्या परंपरा आणि त्याची बंडखोरी, सारी व्यंकटेशाची लीला! कुणी सांगावं, तू म्हणतेस तसा निघेलही कदाचित तिसरा चांगला मार्ग. आता हा दुरावा ताणून धरण्याची ताकद आमच्यातही उरलेली नाही. आता आमचा भरंवसा त्या एका व्यंकटेशावरच!"

बोलता बोलता त्यांचा चेहरा पूर्ववत सात्त्विक तेजानं तळपू लागला. दु:खाची काळी छाया दूर झाली. उठून पितृत्वाच्या नात्यानं, वात्सल्यानं, तिला धीर देण्याच्या भावनेनं त्यांनी तिच्या पाठीवर थोपटलं आणि धीमी धीमी पावलं टाकत ते परत अभ्यासिकेत निघून गेले.

■



महाराज सत्येंद्र आणि कामिनीचा हा संवाद झाला त्यावेळी अमेरिकेत रात्र झाली होती. चार्लस्टन आणि सोमनिलयम यांच्यात दहा तासांचा फरक होता. त्यामुळे चार्लस्टनमध्ये रात्रीचे नऊ वाजले होते. चार्लस्टन हे अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील एक टुमदार बंदर आहे. ऐतिहासिक वारसा लाभलेलं हे शहर पर्यटकांच्या पसंतीचं ठिकाण आहे. इथे सर्व सोयी आहेत पण गजबजाट, प्रदूषण, गर्दी, धकाधकी वगैरे बाबी नाहीत. इथली एक मजेची बाब म्हणजे उन्हाळ्याच्या दिवसांत रात्री आठ-नऊ वाजेपर्यंत सूर्यास्त झालेला नसतो. आजही अजून सूर्यास्त झाला नव्हता.

कॉलनी हाऊसमध्ये मुख्य शेफ म्हणून काम करणारा कमलेंद्र नायडू त्यांच्या छोट्याशा ऑफिसमध्ये बसला होता. कामं संपत आली होती. थोड्या वेळानं जेवून त्याला परत त्याच्या घरी ब्लॉझम अपार्टमेंटमध्ये परतायचंच होतं.

एका बाजूला वॅपू खाडी असलेला ब्लॉझम अपार्टमेंटचा परिसर त्याला अत्यंत आवडे. निळ्याशार गालिच्याचं उसवलेलं सूत दिसावं त्याप्रमाणे वॅपू खाडी नकाशात दिसत असली तरी अटलांटिक महासागराच्या या खाडीच्या प्रत्यक्षातलं सौंदर्य मात्र अवर्णनीय होतं. स्टोनो, ॲशले आणि कूपर या तीन नद्यांप्रमाणेच ही छोटीशी खाडीही अमेरिकेच्या साऊथ कॅरोलिना प्रांतातील चार्लस्टन शहराच्या रंगीबेरंगी पार्श्वभूमीचं वैभव होतं. तिच्या काठावर साऊथ विंडरमिअर भागात त्या काळी राहणाऱ्या सुखवस्तू रहिवाशांना वॅपू खाडी आणि या खाडीचा विविधरंगी इमारतींच्या कशिद्यानं नटलेला हिरवागार किनारा रोज पाहायला मिळे.

तिथल्या आलिशान रेसिडेन्शिअल कॉम्प्लेक्समधील सर्वोत्तम म्हणजे ब्लॉझम अपार्टमेंट्स्. ड्युप्लेक्स अपार्टमेंटच्या या सुंदर इमारतींच्या पुढे-मागे दोन्ही बाजूंना हिरवळीचा गालिचा होता. त्या गालिच्याच्या मध्यभागी होता चकचकीत आरशासारखा स्विमिंग पूल. स्थापत्यशास्त्रज्ञांनी ब्लॉझम अपार्टमेंटची रचना अशी केली होती की, दक्षिणेच्या बाजूला बाल्कनी यावी. त्यामुळे वॅपू खाडीची नयनमनोहर शोभा बाल्कनीत आरामात बसून न्याहाळता येत असे.

दहा वाजले तसा कमलेंद्र उठला. आपल्या सहकाऱ्यांना आवश्यक त्या सूचना देऊन तो ब्लॉझम अपार्टमेंटमध्ये परतला. त्याचा ब्लॉक-

अपार्टमेंट पहिल्या मजल्यावर होतं. बारा नंबरचं ते अपार्टमेंट तो राहायला आल्यापासून नेहमीच्या वर्दळीमुळे प्रसिध्द झालं होतं. पण आज तो एकटाच आला. दिवसभराच्या श्रमांनी त्याला झोप आली होती. चेंज करून तो लगेच झोपी गेला.

■

मॉर्निंग वॉक घेऊन कमलेंद्र आपल्या अपार्टमेंटच्या बाल्कनीत आला तेव्हा स्वच्छ ऊन पडलं होतं. कोवळं सोनेरी ऊन. वॅपू खाडीचा पृष्ठभाग



चांदीचा वर्ख पसरल्यासारखा झगमगत होता. समुद्रपक्षी, बगळे, चिमण्या, यांच्या जोडीला पोपटदेखील होते. स्विमिंग पूलाच्या पाण्यात मुलं डुंबत होती. त्यांचे आई-वडील मुलांमध्ये रमले होते. रंग, पाणी, आकाश आणि जमिनीचा तपकिरी कॅनव्हास यांच्या जोडीला सळसळणारी, उचंबळणारी जीवनासक्ती मिळून तिथं एक विलक्षण चैतन्यमय कोलाज तयार झालेलं होतं. ते समरसून पाहणारा कमलेंद्र, अमेरिकन मित्रांसाठी के.के. बनला होता ! टॉप शेफ के.के.! के.के.नं दूरवर जाणारी ती कॅटॅमरॉन्स पाहिली. विविध रंगाची शीडं सांभाळत वॅपुच्या पृष्ठभागावर एकेकट्यानं चालवलेल्या त्या होड्यांना विहत असताना पाहून के.के. हरखून गेला.

ही सकाळ आणि त्यानं सोमनिलयमला आपल्या आजोबांबरोबर-ताताबरोबर घोड्यावर-बसून रपेट करताना अनुभवलेल्या सकाळी यांची के.के.च्या मनात नकळत तुलना झाली. मग त्याला वाटलं अशी तुलना करणं सयुक्तिक नाही. निसर्गाची विविध रूपं ही; ह्यामध्ये तुलना कशी होऊ शकेल? पण लगेच त्याच्या मनात दुसरा विचार आला. निसर्गाची रूपं म्हणजे काही फक्त रंग नव्हेत. त्या रंगात, त्या रूपात, त्या त्या भागातील माणसांच्या कर्तृत्वाच्या, प्रवृत्तीच्या, कलात्मकतेच्या, प्रतिभेच्या खास वैशिष्ट्यपूर्ण छटा असतात, नाद असतात, कंपनं असतात. निसर्गाच्या रूपातला हा अविभाज्य मानवी सहभाग विसरता येणार नाही! वैभवानं डंवरलेल्या ह्या सकाळीमध्ये आणि अजूनही वल्कलातच हरवलेल्या सोमनिलयमच्या सकाळीमध्ये डोळ्यांत खुपण्याएवढी तफावत आहेच.

तो तसाच आत आला. त्यानं आरशात पाहिलं. त्याचे केस आता अधूनमधून पांढरे होऊ लागले होते. मिशीमधूनही एकाद-दुसरा पांढरा केस बाहेर डोकावू लागला होता. ड्रेसिंग टेबलावरील स्वत:च्या जुन्या फोटोकडे त्याच लक्ष गेलं. मद्रासला कॅटरिंगची पदवी घेतली तेव्हाचा, सोळा वर्षापूर्वीचा दाढीमिशा काढलेल्या गुळगुळीत चेहऱ्याचा नि लांबलचक हिप्पी स्टाइल केसातला स्वत:चा तो फोटो पाहून त्याला हसू आलं.

त्याला जाणीव झाली, सोळा वर्षांचा काळ कसा बघता बघता निघून गेला होता. त्याला त्याच्या पदवीदान समारंभाची आठवण झाली. समारंभाला कुलगुरूंव्यतिरिक्त कितीतरी मान्यवर व्यक्ती उपस्थित होत्या. कॉन्व्होकेशन हॉल उत्तीर्ण पदवीधरांनी आणि निमंत्रितांनी खच्चून भरला होता. उत्साह

आणि इच्छापूर्तीचं पेव फुटलं होतं. त्याला पदवीदान करण्याच्या वेळी खुद्द कुलगुरूंनी सुवर्णपदक मिळाल्याबद्दल त्याचं तोंडभरून कौतुक केलं, तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला होता. पण...

सुवर्णपदक मिळालं म्हणून घरच्यांनी मात्र एका शब्दानंही त्याचं कौतुक केलं नव्हतं.

मुळातच स्वयंपाक्याचा कोर्स निवडला तेव्हाच त्यानं तातांचा आणि इतर सर्वांचाही रोष ओढवून घेतला होता. त्यामुळे हे अपेक्षितच होतं.

पण त्यानंतरही तातांनी अगदी टोकाची भूमिका घेतल्याबद्दल मात्र त्याला मनापासून वाईट वाटल होतं. तातांचं म्हणणं होतं की कोर्स पूर्ण केल्यानंतरही त्यानं किमानपक्षी तो व्यवसाय तरी करू नये. पिढीजात जमीनजुमला आणि मालमत्ता सांभाळावी. त्याच्या आईवडिलांनी देखील असला बायकी व्यवसाय करू नये म्हणून खूप आगपाखड केली होती. पण त्यांना न जुमानता याच व्यवसायातील पुढील शिक्षण घ्यायचा निर्धार व्यक्त करताच नान्नगारू अम्मासकट म्हणजे आईवडिलांसकट सर्वांनी त्याच्यावर तोंडसुख घेतलंच पण ताता अक्षरश: उसळून उठले होते. म्हणाले होते, "आमच्या घराण्याचा असला हा कलंक इथे नको!" पण सुदैवानेच की काय त्याला जर्मनीची स्कॉलरशिप मिळाली आणि घरातून हाकलून दिलं जाण्याचा-अगदीच छी:थू: होण्याचा प्रसंग आपोआपच टळला होता.

जर्मनीमध्ये अल्पावधीतच त्याला उत्तम प्रावीण्याचं प्रशस्तिपत्र मिळून तिथून तो इंग्लंडला गेला होता. लंडनमध्ये असताना त्याला वाटलं होतं, आता तरी आपल्या तातांची चीड कमी झाली असेल. पण तसं झालं नाही. त्यांनी एका शब्दानंही कधी त्याची साधी विचारपूस केली नाही, की पत्राला उत्तरं दिली नाहीत. नाही म्हणायला त्याच्यासाठी आलेलं कामिनीचं प्रपोजल तेवढं त्यांनी त्याला कळवलं होतं. या गोष्टीलाही आता नऊ वर्षं उलटून गेली होती. इंग्लंडहून पुढे ऑस्ट्रेलिया, जपान आदी देशांत व्यवसाय करताना त्याची आर्थिक स्थिती पुष्कळ सुधारली होती. परंतु अगदी आत्मीयतेनं पाठवलेले पैसेदेखील तातांनी धुडकावून लावले होते. परंतु आप्तस्वकीयांच्या प्रेमळ सहवासाला पारखा होण्याचं दु:ख आणि त्यांनी केलेल्या उपमर्दाची उद्विग्नता, पिऊन टाकून त्यानं स्वत:ला व्यवसायामध्ये झोकून दिलं होतं.

प्रगतीची घोडदौड चालूच होती.

चार्लस्टनला जॉब ऑफर आल्यावर चार्लस्टनमध्ये येऊन त्यानं सारं शहर पाहून घेतलं. साऊथ कॅरोलिना प्रांतातील अटलांटिक महासागराच्या कुशीत वसलेलं हे शहर त्याला अत्यंत आवडलं होतं...

विशेषत: न्यूयॉर्क, शिकागो वगैरे शहरांच्या तुलनेत या शहराची ऐतिहासिक पार्श्वभूमी, स्वच्छ आणि सुंदर बीचेस, इथला समटर फोर्ट, अठराशे त्रेसष्टमध्ये जिथून तोफगोळ्यांनी आग ओकली गेली ते 'बॅटरी' हे ठिकाण, सलिव्हन्स आयलंड, जेम्स आयलंड, कंट्री क्लब, माऊंट प्लेझंट, सारंच वैशिष्टपूर्ण होतं. विशेषत: टुमदार बंगले, त्यांच्या भोवतालचे बगीचे आणि अतिशय व्यवस्थितपणे जपलेली निसर्गराजी नि पब्लिक पार्कस् पाहून तर तो चार्लस्टनच्या प्रेमात पडला होता. त्यानं इथला जॉब आनंदानं स्वीकारला होता.

बघता बघता या घटनेलाही आता वर्ष लोटलं होतं. 'कॉलनी हाऊस' रेस्टॉरंटमध्येही त्याच्या नावाचा मोठाच दबदबा निर्माण झाला होता. इथल्या नियतकालिकातून त्याच्या मुलाखतीही झळकल्या होत्या. पण या काळात जितक्या झपाट्यानं यश, पैसा, नावलौकिक त्याला मिळाला, तितक्याच वेगानं तो आणि घरच्यांच्या दरम्यानची दरी रुंदावतच गेली. ह्या दुराव्याची त्याला आजकाल अधिकच खंत वाटू लागली होती. याचं कारण आता परिस्थितीमध्ये एक महत्त्वाचा फरक पडला होता. मध्यंतरीच्या काळात म्हणजे नऊ वर्षांपूर्वी त्याचा कामिनीशी विवाह झाला होता. त्याच्या आणि कामिनीच्या वडिलांचे मृत्यू, मधूचा जन्म अशा या ना त्या कारणामुळे मधू व कामिनीचं भारतातलं वास्तव्य वाढत गेलं होतं. घरच्या साऱ्यांच्या विशेषत: तातांच्या लळ्यामुळे मधू तर सोमनिलयम सोडायला अजिबात तयार नव्हती. मधू आणि कामिनीच्या वियोगाचा दाह अनुभवताना, आपल्या आजोबा-आजी व आई-वडिलांची आपला विरह सहन करताना काय अवस्था झाली असेल याची हेलावून टाकणारी जाणीव त्याला सारखी सारखी होऊ लागली होती. साहजिकच तो घरच्यांच्या ओढीनं अस्वस्थ होऊ लागला होता.

पण काय करावं हे मात्र त्याला कळत नव्हतं. अमेरिकेत राहून भावजीवनाचा कोंडमारा होत होता. एकटेपणा खायला उठत होता.

पण अमेरिका सोडायची तर तातांची क्षमा मागून, याचना करून, ते म्हणतील ती पूर्वदिशा मान्य करून त्यांच्या आज्ञेप्रमाणे ऐदी आणि ऐतखाऊ संस्थानिकाचं उबगवाणं अन् अगदीच नकोसं झालेलं जिणं जगावं लागणार होतं. नुसतं भारतात परतून तिथेही शेफचा व्यवसाय केला तर दुरावा आणि कटुतेमध्ये काहीच फरक पडला नसता.

आजकाल त्याला जाणवू लागलं होतं की, ज्या अस्सल जीवनानुभवासाठी त्यानं ऐन उमेदीत संकेत, रूढी, परंपरा, प्रतिष्ठा, वडीलधाऱ्यांचा दबाव हे सारं न जुमानता अंतर्मनाचा कौल मानून स्वयंपाक्याचा व्यवसाय निवडला होता, त्याच स्वयंपाक्याच्या जीवनानुभवात तो आता गुरफटत चालला होता. व्यावसायिक यश प्रचंड होतं. पण ते आत्मिक समाधान देऊ शकत नव्हतं. त्याचा अतृप्त आत्मा शेफच्या व्यवसायाच्या शृंखलांमध्ये गुदमरू लागला होता.

त्याला हेही माहीत होतं, की हे असमाधान म्हणजे प्रौढ बनण्याचं, किंबहुना दृष्टिकोन अधिक प्रगल्भ व व्यापक बनण्याचं लक्षण होतं. या असमाधानाचा अर्थ ''शेफचा व्यवसाय'' वाईट आहे असा होत नव्हता. त्यामुळे ह्या शृंखला तोडाव्याशा वाटल्या तरी तोडणं पटत नव्हतं; पण शेफ म्हणून मिळालेल्या यशाचा बडिवार माजवत खूश राहणंही जमत नव्हतं. पण यामुळेच की काय अलीकडे जीवनातील स्थित्यंतराची वेळ आलीय असं त्याला वाटू लागलं होतं. काही दिवसापूर्वीच जेव्हा असेच विचार आले आणि त्याला अगदी मनापासून काही तरी उज्ज्वल घडण्याची अस्पष्ट पण तीव्र पूर्वजाणीव झाली तेव्हा त्यानं तातांना विचारांच्या त्या आवर्तातच सर्व बाबींची शहानिशा करणारं पत्र लिहून टाकलं होतं. विशेषत: राजधर्माविषयीच्या त्याच्या जाणिवा त्यानं थोड्या अधिकच ठासून त्यांना कळविल्या होत्या. ते पत्र लिहिताना त्याच्या मनात एक कल्पना तरळून गेली होती की, तपश्चर्या करताना आपल्याभोवती वारूळ तयार झालंय. ज्या क्षणाला तपश्चर्या पूर्ण झाल्याची खात्री पटेल त्या क्षणी वारूळ फोडून बाहेर यायचं! दुसऱ्या क्षणी असंही वाटलं होतं, की योग्य वेळ येताच पिकल्या फळाप्रमाणे आपणही व्यावसायिक बेड्या, आणि अस्वस्थतेच्या कोठडीतून सुटून निघू आणि दुरावा संपून सर्वांचं पुनर्मीलन होईल. पण त्याच्या ह्या कल्पनेला वास्तवाचा आधार नव्हता, हेही त्याला माहीत होतं!

या क्षणी त्याला तीव्रतेनं जाणवलं, अजून योग्य मार्ग सापडत नाही. त्याचा शोध घेणं आवश्यक आहे. तुटत जाणारे दुवे सांधण्याचा आणि तयार होण्यापूर्वीच निखळून पडणारे दुवे तयार करण्याचा अचूक मार्ग सापडायला हवाय.

■

घरच्यांचा विचार येताच त्याचं लक्ष ड्रेसिंग टेबलावरील फोटोंकडे गेलं... मधू आता सहा वर्षांची झाली होती. तिच्या तेजस्वी अन् बोलक्या डोळ्यांवर त्याची नजर स्थिरावली आणि त्याच्या पोटात खड्डा पडला. पायाखालची वाळू सरकावी तसं त्याला वाटलं. नकळत डोळे भरून आले.



कितीतरी वेळ तो मधूच्या डोळ्यात डोळे घालून एकटक पाहत होता. त्याच्या मनात आलं, आसक्ती ठेवू नये म्हणणारा जगत्‌गुरु होतो. पण या आसक्तीपायी मिळणारं सुख जगत्‌गुरु देत तर नाहीतच उलट धिक्कारायला सांगतात. सर्व काही सोडून द्यायचा उपदेश करणाऱ्यांना समाज देवत्व बहाल करतो. त्यांची पूजा करतो. खोटी आशा लावणाऱ्यांनाही, समाज उदो उदो करतो; परंतु विविध स्तरावरील जनसामान्यांना छोट्या-मोठ्या सुखांपासून ते अत्युत्कट आनंदाच्या अनुभूतीपर्यंत सारं काही मिळावं यासाठी काय करता येईल?

अखेर त्यानं स्वत:च्या मनाची समजूत घातली की, समस्या अस्वस्थ होऊन सुटत नाही, उलट ती अधिकच गुंतागुंतीची होते. प्रयत्नानं त्यानं मन शांत केलं. मनोमन मधूला पाहिलं. तिची स्मृती रोमारोमांत भरून घेतली आणि तो झटक्यातच तयारीला लागला.

केसातून कंगवा आणि गालावरून इलेक्ट्रिक शेव्हर फिरवताना तो संपूर्ण बदलल्यासारखा दिसत होता; खंबीर, निश्चयी आणि आत्मविश्वासपूर्ण! त्यानं झटपट कपडे बदलले. पायात आवडती कोल्हापुरी चप्पल सरकवली आणि तो घराबाहेर पडला.

प्रायलो स्ट्रीटवरच्या कॉलनी हाऊसला पोचायला त्याला दहा-बारा मिनिटं लागत. पार्किंग प्लेसमध्ये ठरलेल्या जागी आपली टोयोटा पार्क करून तो झपाझप किचनमध्ये शिरला. लगबगीनं युनिफॉर्म घालत असतानाच त्याच्या चिंचोळ्या ऑफिसमधील फोनची रिंग वाजली. त्यानं फोन घेतला. भारतीय ढंगात इंग्रजी बोलणाऱ्या सतीशचा आवाज त्यानं लगेच ओळखला.

डॉ. सतीश पाठक हा अगदी काही दिवसांपूर्वीच अमेरिकेत आला होता. सुमारे साडेपाच फुटांचा गव्हाळ वर्णाचा डोक्याला थोडाफार टक्कल पडू लागलेला सतीश बावीस-चौविशीचा असेल. त्यानं दिल्लीला पीएच. डी. केली होती.

घरची परिस्थिती वाईट असली तरी हुशारीच्या जोरावर शिष्यवृत्त्या मिळवत त्यानं इथपर्यंत मजल मारली होती. गरिबीतून संघर्ष करीत शिकणाऱ्या सतीशविषयी के.के. च्या मनात विशेष सहानुभूती निर्माण झाली होती. पण एरवीदेखील भारतातून अमेरिकेत प्रथम जाणाऱ्यांची मुख्य समस्या खाण्या-

जेवणाची असते हे के.के ला माहीत होते. त्यामुळे पहिल्याच भेटीत नवागताला तो जेवायला बोलवत असे. सतीशलाही त्यानं पहिल्या भेटीतच जेवायला बोलावून संपर्क साधण्यासाठी स्वत:चा फोन नंबर दिला होता.

"डॉ. सतीश, आता मी फारच गडबडीत आहे. तुझा रूम नंबर १२२ ना... संध्याकाळी आठ-साडेआठच्या दरम्यान माझा ज्युनिअर तुला पिक-अप करील. ठीक आहे?"

पलीकडून सतीशचा ओ.के. येताच त्यानं फोन ठेवून दिला.

फोन ठेवल्यावर पुन्हा त्याच्या मनात डॉ. सतीशचा विचार आला. सतीशसारखे परदेशात नव्यानं येणारे कितीतरी जण त्याला आठवले. त्यांच्यापैकी कित्येक जण त्याच्या आदरातिथ्यानं तृप्त झाले होते. त्याच्या आधारानं निर्धास्त झाले होते. भारतात पीएच. डी. करून पुढे संशोधन करण्यासाठी अमेरिकेत आलेल्या सतीशला इथल्या जेवणाखाण्याची रीतिरिवांजाची, परक्या वातावरणाची सवय होईपर्यंत सांभाळून घ्यायला हवं होतं. त्यामुळे के.के. नं आपण होऊनच डॉ. सतीशला जेवायला आमंत्रण आणि संपर्कासाठी फोन दिल्यामुळे सतीशचा फोन आला होता. सतीशला चांगल्या भारतीय जेवणांची आणि आपुलकीची नितांत गरज होती. सतीशकडे गाडी नसल्यामुळे त्याला त्याच्या हॉस्टेलवरून घेऊन येणं आवश्यक होतं. कारण ही के.के. ची स्वत:ची पध्दत होती आणि इथल्या शिष्टसंमत संकेताचाही तो एक भाग होता. भारतामध्ये पत्ता दिला किंवा जवळपासची खूण सांगितली, की पाहुणा बस-टॅक्सीनं किंवा पायी येऊन दाखल होतो. त्याला स्वत:च्या गाडीनं आणण्याचा विचारही यजमानाच्या मनात येत नाही! लगेच त्यानं पीटरला हाक मारून डॉ. सतीशचा पत्ता आणि फोन नंबर दिला आणि संध्याकाळी आठ-साडेआठच्या दरम्यान डॉ. सतीशला घेऊन यायची जबाबदारी त्याच्यावर सोपवली.

त्याचवेळी त्याचा मुख्य असिस्टंट फ्रॅंकलीन आला. फ्रॅंकलीनला आजच्या डिशेसबद्दल भराभर प्रश्न विचारून सर्व तयारी आहे की नाही याची त्यानं खातरजमा करून घेतली.

तेवढ्यात त्याच्या लक्षात आलं की डॉक्टर टेलरशी रविवारच्या कार्यक्रमाविषयी बोलायचं होतं. त्यानं फोन उचलून त्यांचा नंबर दाबायला सुरुवात केली.

डॉ. टेलर हे त्याच्या परिचयातले वैज्ञानिक. पण त्यांना इतरही अनेक बाबींमध्ये रस होता. नाट्यक्षेत्र तर त्यांच्या खास आवडीचं! एकदा तर त्यांनी एका नाटकात चक्क कुत्र्याची भूमिका केली होती. सव्वासहा फुटी भारदस्त व्यक्तिमत्त्वाचा आणि प्रतिष्ठित वैज्ञानिक असलेल्या डॉ. टेलरची ती भूमिका पाहून के.के देखील अचंबित झाला होता! नाट्यवेडाप्रमाणेच डॉ. टेलरना तत्त्वज्ञानात देखील रस होता. त्यामुळेच त्यांनी रेव्हरंड बेट्झ यांच्या निवासस्थानी एका कार्यक्रमाला के.के ला खास निमंत्रित केलं होतं.

■

के.के. जिथे काम करत होता त्या कॉलनी हाऊस रेस्टॉरंटपासून सुमारे दीड दोन मैलांवर एक विद्यार्थ्यांचं हॉस्टेल होतं. तिथे त्याला डॉर्मिटरी म्हणत. दोघांत काय फरक असतो हे कदाचित तिथे राहणाऱ्या कुणालाच माहीत नसेल!

या डॉर्मिटरीत दिल्लीहून अलीकडेच आलेला डॉ. सतीश राहत असे. या डॉर्मिटरीमध्ये आजूबाजूंच्या खोल्यांमधून विद्यार्थी-विद्यार्थिनी रात्री-अपरात्री केव्हाही धमाल करताना त्याला दिसत होते. ते पाहून "इथे स्त्री-पुरुष भेदच नाही की काय?" असा त्याला प्रश्न पडत राहिला होता. भारतातील मुलींची वसतिगृहं आणि मुलांची वसतिगृहं यामधील बंदिस्त वातावरण, करडी शिस्त आणि बंधनं यांचा इथे मागमूस नव्हता. त्या तरुण मुलां-मुलींचं ते मोकळं, स्वतंत्र, बेबंद आणि खळाळतं हुंदडणं, एकमेकात मिसळणं, त्यांची ती सलगी हे सारं पाहून त्याला अगदीच एकाकी वाटू लागलं होतं. कुणाचीच ओळख नसल्यामुळे आणि रूममध्ये पार्टनरदेखील नसल्यामुळे त्याला एकदमच वाळीत टाकल्यासारखं वाटत राहिलं होतं.

त्यामुळेच आज सकाळी सकाळीच त्यानं कुठलीही भीडभाड न ठेवता के.के ला फोन केला होता. त्याला कुणाची तरी सोबत हवी होती. कंपनी हवी होती. नेहमीच्या सवयीचं नाहीतरी किमान भारतीय जेवण तरी हवं होतं.

के.के. ला फोन केल्यानंतर डॉ. सतीशनं डिपार्टमेंटला जायची तयारी केली आणि तो खोलीबाहेर पडला.

त्याच्या डॉर्मिटरीपासून युनिव्हर्सिटी अवघ्या दोन मिनिटांवर होती.

उत्सुकता, दडपण आणि सर्वच नवीन असल्याने आलेली अस्वस्थता यामुळे नकळत त्याच्या चालण्याचा वेग वाढला.

समोरच्याच कोपऱ्यावरचं रेस्टॉरंट मागे पडलं तशी पुढ्यातच युनिव्हर्सिटी दिसली. डावीकडे गेलेल्या छोट्याशा क्रॉसरोडवर चालू असलेल्या बांधकामाचा कानठाळ्या बसवणारा आवाज येत होता. मनोरुग्णालयाच्या नवीन इमारतीचं हे बांधकाम होतं. डावीकडील व्यवस्थापनाची आणि उजवीकडील नर्सिंग कॉलेजची लाल रंगाची जुनी इमारत मागे टाकून तो युनिव्हर्सिटीच्या आवारात शिरला.

युनिव्हर्सिटीच्या आवारात नजरेत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे व्यवस्थित कापलेलं हिरवंगार कुरण-मॅनिक्युर्ड लॉन्स आणि त्यावरील पांढऱ्या शुभ्र सिमेंटचे पादचाऱ्यांसाठी असलेले आखीव-रेखीव रस्ते. डावीकडच्या विस्तीर्ण मोकळ्या जागेत पांढऱ्या रंगानं आखलेल्या चौकोनांमध्ये गाड्या पार्क केलेल्या होत्या. एकावेळी शेकडो गाड्या मावतील अशी ती संपूर्ण जागा सिमेंट कॉंक्रीटची होती. गाड्यांसाठी वेगळी गेट्स होती. समोरच पांढऱ्या रंगाची सहा मजली इमारत होती. या इमारतीच्या चारी बाजूंनी प्रशस्त असा पोर्च होता. त्यामध्ये सुंदर फुलबाग होती. या बागेच्या भोवती पंधरा-वीस फूट रुंदीचा एक कालवा होता! त्याचे काठ सुबकपणे गिलावा केलेले होते. काठावर विद्यार्थी-विद्यार्थिनींप्रमाणेच काही अध्यापकही वावरत होते. आकाशी निळे हार्टस् आणि गडद निळ्या पँट्सच्या गणवेषातील कृष्णवर्णीय आणि श्वेतवर्णीय कामगार मंडळीही दिसत होती. अगदी उजवीकडे हॉस्पिटलची इमारत होती. डॉ. सतीशचं डिपार्टमेंट पार्किंग प्लेसच्या पलीकडे डाव्या बाजूला असलेल्या चार मजली इमारतीत दुसऱ्या मजल्यावर होतं.

लिफ्टमध्ये शिरता शिरता तो स्वत:शी पुटपुटला, 'हिला इथं एलेवेटर म्हणायचं. लिफ्ट नाही.'

डॉ. सतीश डिपार्टमेंटमध्ये पोचला तेव्हा त्याच्या मनात आज रात्री भारतीय जेवण मिळणार, हाच विचार घोळत होता. गेले काही दिवस अळणी आणि कंटाळवाणं अमेरिकन जेवण जेवावं लागलं होतं. पिझ्झा, नगेट्स्, वगैरे पुढे आवडू लागलेल्या जेवणाच्या व्हरायटीज त्याला अजून इथं चाखायला मिळाल्या नव्हत्या. कारण युनिव्हर्सिटी परिसरापलीकडे त्याला फारशी माहिती नव्हती. मनातल्या मनात त्यानं के. के. ला दुवा दिली.

तेवढ्यात समोरून डॉ. टेलर आले.

"हाय! डॉ. सतीश, गुड मॉर्निंग, हाऊ आर यू धीस मॉर्निंग?"

"गुड मॉर्निंग सर, आय ॲम फाइन. थँक यू सर," म्हणून तो उगीच घुटमळला. कारण प्रत्यक्षात तो 'फाइन' नव्हता.

"विद्यार्थ्यांप्रमाणे अर्ध्या चड्डीत मी दिवसभर नाही राहणार! आता कपडे बदलणारच. सव्वासहा फुटी कृश देही डॉ. टेलरनी बुचकळ्यात पडलेल्या सतीशला स्पष्टीकरण दिलं.

सतीश संकोचानं हसला. चेक्सच्या हाफ पँटमध्ये अर्धेमुर्धे झाकलेले त्यांचे गोरे, किडकिडीत आणि केसाळ पाय आपण बावळटाप्रमाणे निरखीत होतो म्हणून त्यांनी हे स्पष्टीकरण दिलं हे लागलीच त्याच्या ध्यानात आलं. डॉ. टेलरची त्याच्या त्या बावळटपणानं करमणूक झाली. 'हॅव यू कम आऊट ऑल जेट लॅग?' त्यांनी त्याची चौकशी केली. तो त्यांच्या हाताखाली संशोधन करायला आलेला असल्यामुळे अशी चौकशी करणं हा त्यांच्या दृष्टीनं त्यांच्या ड्यूटीचाच एक भाग होता. 'येस सर...' स्वत:शीच बोलल्यासारखा डॉ. सतीश उत्तरला. कारण या क्षणी तो त्याचा स्वत:चा बुजरेपणा, भेदरटपणा आणि त्यामुळे होणारी त्याची पंचाईत यातच गुरफटला होता. जेट लॅगमधूनही खरं म्हणजे तो बाहेर आला नव्हता. त्याचं डोकं जड होतं. थकवा जाणवत होता. अंग गळून गेलं होतं. दिल्ली नि चार्लस्टन ही दोन्ही ठिकाणं पृथ्वीच्या दोन बाजूला असल्यामुळे एके ठिकाणी दिवस असतो तेव्हा दुसरीकडे रात्र असते. पण विमानानं हे अंतर झटपट कापल्यामुळे चार्लस्टनला पोचल्यावर तिथे दिवस असतो तेव्हा शरीराला मात्र दिल्लीच्या वेळापत्रकाची सवय असल्यामुळे ती रात्र असते. साहजिकच दिवसा झोप येणं, अस्वस्थता आणि अशक्तता वाटणं वगैरे तक्रारी त्याला भंडावून सोडत होत्या. यातून ठीक व्हायला सात-आठ दिवस तरी लागणार होते. साहजिकच या स्थितीत आणखीच भांबावल्यामुळे त्याच्या तोंडून 'येस सर' निघून गेलं.

"ऑल राइट, यू हॅव इनफ टु कीप युअर सेल्फ बिझी," म्हणून डॉ. टेलर तरातरा स्वत:च्या केबिनकडे गेले.

सतीश त्याच्या स्वत:च्या केबिनमध्ये गेला. नकळत त्याच्या चेहरा पडला. डॉ. टेलर असे कसे वागतात? इकडे तर विचारपूस करतात. पण

मोकळेपणानं बोलत मात्र नाहीत. दोन मिनिटं अघळपघळ का बोलू नये यांनी? पण तो हे बोलणार कुणापाशी? सांगणार कुणाला? अन् सांगून उपयोग काय? इतरांनी त्याला वेड्यात काढलं असतं. म्हणाले असते त्यांनी कुणाशी, किती आणि कसं बोलावं हा त्यांचा वैयक्तिक प्रश्न आहे. ते ठरविण्याचा इतरांना काय अधिकार? त्यातून कुणी टेलरना काही सुचवलं तरी त्यांनी कशाला इतरांची पर्वा केली असती? शिवाय इतरजण तरी कुठे मिळून मिसळून वागत होते? त्या परक्या वातावरणात कुणीतरी आपलेपणानं बोलावं असं त्याला वाटत होतें. पण इथे पाहावं तर जो-तो आपल्याच कामात, स्वत:च्याच करिअरच्या नादात होता.

संपूर्ण वातावरणच बदलून गेल्यामुळे त्याला चुकल्याचुकल्यासारखं होत होतं. हवापाण्यापासून ते इथल्या टीव्हीच्या कार्यक्रमापर्यंत, वर्तमानपत्रांपासून ते घर-दुकानं-गल्ल्यापर्यंत सर्वच काही इथं निराळं होतं. माणसं, त्यांची भाषा, त्यांचे उच्चार, त्यांच्या रीतीभाती वगैरे इथलं सारच त्याला अपरिचित होतं. त्यामुळे सहानुभूतीची, आपुलकीची तीव्र गरज वाटत होती. झक् मारली अन् इथे आलो असं त्याला कितींदा वाटून गेलं. ऑल इंडिया इन्स्टिट्यूटमध्ये पीएच. डी. करून मोठ्या महत्त्वाकांक्षेनं तो इथं आला खरा, पण अल्पावधीतच त्याचा हिरमोड झाला होता.

काल एकदाचं पोस्टर प्रेझेन्टशन झालं. या पोस्टर प्रेझेन्टशनमध्ये अध्यापक, तंत्रज्ञ, रिसर्च फेलोज्, विद्यार्थी-विद्यार्थिनी इत्यादींनी आपापल्या गटाच्या संशोधनाची माहिती देणारे तक्ते तयार करून सुबकपणे प्रदर्शित केले होते. त्या तक्त्यांच्या बाजूला थांबून, पाहायला येणाऱ्यांना आपल्याला प्रयोगांची आणि निष्कर्षांची माहिती दिली होती. पण डॉ. सतीशला जेट लॅगमुळेच की काय कशातच रस वाटला नव्हता. शिवाय धडपड आणि खर्च खूप असला तरी संशोधनाचा दर्जा त्याला फारसा अव्वल वाटला नव्हता. तांत्रिक प्रगती होती. पण इथले पॉलिग्राफस्, इलेक्ट्रॉन मायक्रोस्कोप्स् स्पेक्ट्रो फोटोमिटर्स, इम्युनोसायटोकेमिकल टेक्निक्स्, रेडिओइम्युनोॲसेज् वगैरे प्रकार त्याला तसे नवीन नव्हते. एकंदरीत पोस्टर प्रेझेन्टेशन पाहून झाल्यानंतर त्याच्या अपेक्षांचा बुडबुडा फुटला होता म्हटलं तरी चालेल.

साहजिकच परक्या वातावरणामुळे झालेली त्याची घुसमट आणखीच तीव्र झाली होती. राहून राहून त्याला एकच प्रश्न पडत होता, ही माणसं

आपल्याला वाळीत टाकल्यासारखी का वागवतात? विशेषत: संशोधनातील यांचा वकूबही यथातथाच असताना एवढी अकडतात कशाला? की आपण गोरे नसल्यामुळे हे असे वागतात?

त्यातच त्याला त्याच्या विधवा आईची आठवण येत होती. विमानतळावर त्याला निरोप द्यायला आलेल्या आईच्या डोळ्यांतील अश्रू आठवले की, एकदम त्याच्या पोटात कालवाकालव होई. तिला रक्तदाबाचा विकार असताना आपण आपली महत्त्वाकांक्षा पुरी करण्यासाठी तिला एकटी सोडून झालो आणि तिनंही आपल्या प्रगतीसाठी स्वत:च्या काळजावर दगड ठेवून आपल्याला इकडे यायला अनुमती दिली. आईच्या काळजीच्या आणि वियोगाच्या पार्श्वभूमीवर इथलं वातावरण जणू त्याच्यावर कुठल्या तरी जन्मीचा सूड उगवत होतं.

वैतागून डॉ. सतीश उठला. आधीच भणभलेलं त्याचं डोकं एअरकंडिशनरच्या गारठ्याची सवय नसल्याने आता ठणकू लागलं होतं. 'कॉशन वेट फ्लोअर'चा बोर्ड मांडलेल्या नुकत्याच पुसलेल्या ओल्या चकचकीत फरशीवरून पाय घसरू न देण्याची खबरदारी घेत तो पलीकडच्या लाँज (कँटीन)मधील कॉफी मशीनपाशी आला. त्या व्हेंडिंग (विक्रेता) मशीनमध्ये त्यानं क्वॉर्टर नाणं टाकलं. एक्स्ट्रा लाइटनर (दूध) सह ग्लासमध्ये 'गळलेली' कॉफी घेतली अन् धीमी पावलं टाकत तो स्वत:च्या कॅबिनमध्ये परत आला.

कॉफी संपली. पण मन कशातच लागेना! कसा-बसा उरलेला वेळ काढून तो डॉर्मिटरीत परत आला. पण खोलीत जावंसंही त्याला वाटेना. तो तसाच टीव्हीसमोरच्या कोचावर जाऊन बसला. लॉबीतल्या टीव्हीवर अमेरिकन फुटबॉलचा गेम चालला होता. डॉ. सतीश आणखीनच विटला. चॅनेल बदलण्याची शक्यताच नव्हती. तीन-चार पोरं कमालीच्या उत्कंठेनं तो गेम पाहात होती. खांद्यावर मोठाली पॅड्स बांधलेले, डोक्यावर हेल्मेटसारखं काही तरी घातलेले ते अत्यंत आडदांड, धटिंगण खेळाडू कसला आटापिटा करीत चित्रं हालत होती आणि कंटाळलेले डोळे उघडे होते एवढंच! पण शेवटी तेही मिटले... नकळत त्याला तिथल्या तिथे लॉबीतल्या त्या कोचावरच डुलकी लागली. सतीशच्या झोपेतदेखील त्याचं मन स्वस्थ झालं नसावं! त्याच्या आईचा चेहरा, दिल्लीचं त्याचं साधंसुधं घर, डॉर्मिटरीतल्या मुलामुलींचे

अल्लड चाळे, वगैरे आलटूनपालटून डोळ्यांसमोर नाचत होते. मधूनच त्याला दिसलं की संशोधनात त्याला यंग सायंटिस्टचा पुरस्कार मिळालाय. मध्येच दिसलं की तो कुणातरी अमेरिकन युवतीच्या बाहुपाशात आहे. मध्येच त्याला खमंग चिकन तंदुरी खाल्ल्याचा भास झाला तर मध्येच कुठल्यातरी उन्मादक अशा न्यूड फ्लोअर शो ला जाऊन बसल्याचा... अशा निद्रा-स्वप्नांच्या हिंदोळ्यात तो झोके घेत असतानाच मध्येच कुणी तरी मोठ्यानं ओरडलं तशी सतीशला एकदम दचकून जाग आली. टी.व्ही. मधल्या फुटबॉलला ती दाद होती हे काही क्षणांनी त्याच्या लक्षात आलं. चिडून त्या खेळाडूंना आणि त्या प्रेक्षकांना त्यानं मनातल्या मनात शिव्यांची लाखोली वाहिली.

■

आता झोप लागणं शक्य नव्हतं. आळसावलेल्या शरीराला आळोखेपिळोखे देत त्यानं कंटाळून घड्याळात पाहिलं. बरं झालं, एकदाचे आठ वाजले! पण अरेच्या! बाहेर तर अजून एवढा ठणठणीत उजेड आहे! हा कंटाळवाणा दिवस संपत का नाही एकदाचा? त्याचवेळी त्याच्या लक्षात आलं की दिवस असो की रात्र आता के.के. चा सहाय्यक येईलच. तो मनोमन सुखावला. नेमक्या त्याच क्षणी गोरापान, निळ्या डोळ्यांचा आणि भुऱ्या केसांचा तो तरुण डॉर्मिटरीच्या दरवाज्यातून आत शिरताना डॉ. सतीशच्या दृष्टीला पडला. त्या तरुणाच्या अंगावरील पांढरा शुभ्र युनिफॉर्म पाहून तो के.के. चा सहाय्यकच असल्याचं त्यानं सहज ताडलं.

सतीशला एकदम हायसं वाटलं. के.के. कडे काहीतरी चमचमीत खायला मिळणार, या विचारसरशी त्याची जीभ वळवळू लागली. तोंडाला पाणी सुटलं. त्याला स्वत:चं थोडं नवलच वाटलं. गरिबीत दिवस काढून सुध्दा त्याला आजच्या सारखा अनुभव पूर्वी कधी आला नव्हता. या क्षणी सगळा संकोच, सारी भीड नाहीशी झाली होती. खायचं आणि चमचमीत पोटभर खायचं, ह्या एकाच विचारानं तो भारला गेला होता. खायला आलेला एकटेपणा कमी होणार आणि या एकाकी जिवाला मनमुराद चविष्ट जेवणावर ताव मारायला मिळणार, ह्या एकाच कल्पनेनं तो एकदम एक्साइट झाला होता. उत्तेजित झाला होता!

सतीशचा आडाखा अर्थातच अचूक होता. तो गोरागोमटा, निळ्या

डोळ्यांचा वीस-बावीस वर्षांचा तरुण म्हणजे के.के.च्या सहाय्यक पीटरच होता. के.के.कडे कुणी येणार असलं तर त्याना कॉलनी हाऊसला घेऊन येण्याच काम त्याच्याकडे येणार हे जवळजवळ ठरलेलंच होतं. हे काम त्यानं पुष्कळदा अन् तेही मोठ्या हौसेनं केलं होतं. खरं तर या कामात त्याला रिलीफ वाटे. इंटरेस्ट वाटे. के.के.कडे इंडियन्सप्रमाणेच विविध देशांचे, विविध धर्मांचे, विविध वंशाचे लोक येत. जगाच्या कानाकोपऱ्यांतून येणाऱ्या त्या लोकांची ओळख करून घ्यायला पीटरला खूप मजा वाटे. शिवाय किचनमधून तेवढा वेळ सुटका मिळायची ती वेगळीच!

त्याच्या दिशेनं येणारा मध्यमवयीन माणसाप्रमाणे टक्कल पडू लागलेला अन् इतर सर्वांमध्ये स्वतःच्या वेगळेपणामुळे पटकन उठून दिसणारा तो आशियाई देशातला तरुण म्हणजे के.के. चा पाहुणा डॉ. सतीशच असणार हे पीटरनंही लगेच ओळखलं

'आर यू डॉ. सतीश? आपणच डॉ. सतीश का?''

''येस... येस ... आय ॲम डॉ. सतीश देसाई.....''

सतीशनं घाईघाईनं होकार दिला. जणू काही अन्यथा ती जेवणाची संधी निघून गेली असती!

''आय ॲम पीटर! के.के. कडून आलोय तुम्हाला डिनरसाठी घेऊन जायला...''

उमद्या पीटरकडे बघून आता पुरेशा खुललेल्या सतीशनं मोठ्या उत्साहानं पीटरला स्वतःबद्दल माहिती पुरवली. पीटरनंही त्याला स्वतःचा एक-दोन वाक्यात परिचय दिला. तसा सतीश आणखी जरा मोकळा झाला. म्हणाला, ''अक्षरशः केव्हा एकदा या वातावरणातून बाहेर पडतो असं झालं होतं!''

पीटर मनमोकळं हसला आणि सतीशला गाडीकडे घेऊन गेला. पीटरच्या त्या दिलखुलास हास्यामुळे सतीशला कोरड्या अमेरिकनांच्या मध्ये हे ओॲसिस मिळाल्याचा सुखद धक्का बसला.

पीटरच्या नव्याकोऱ्या डॅटसनमध्ये बसताना उगीचच हसं व्हायला नको, म्हणून सतीशनं आधीच उघड केलं की अशा गाड्यांमधलं त्याला काहीच माहीत नव्हतं. म्हणाला, ''या प्रकारच्या गाडीत मी प्रथमच बसतोय. दरवाजा उघडणं, बंद करणं, लॉक करणं यातलं काहीही मला माहीत

नाही.'' अर्थात तरीही त्याला क्षणभर काहीसं गांगरल्यासारखं झालंच. नकळत स्वत:च्या आर्थिक पार्श्वभूमीच्या जाणिवेनं तो ओशाळला. पण पीटरनं अखेरपर्यंत कुचेष्टेचा चकारशब्दही काढला नाही. अगदी अदबीनं त्यानं सतीशला दरवाजा उघडून दिला अन् तो बसल्यावर बंद केला. स्वत: शांतपणानं व्हीलवर बसून सीटबेल्ट बांधून घेतला आणि गाडी सुरू केली. त्याची अदब पाहून डॉ. सतीश पुन्हा एकदा उत्तेजित झाला. पीटरला त्यानं मनातल्या मनात अगदी मनापासून धन्यवाद दिले.

कोर्टने ड्राइव्ह मागे टाकून कॅलहन स्ट्रीटवरून वेगानं ईस्ट बे वर पोचताच पीटरनं डावीकडच्या छोट्या रस्त्यावर गाडी वळवली. हिरव्या पार्श्वभूीवर पांढऱ्या अक्षरात रंगवलेली प्रायलो स्ट्रीटची पाटी डॉ.सतीशच्या नजरेला पडली.

दुसऱ्याच क्षणी गाडी उभी करत पीटरनं समोरच्या इमारतीकडे बोट दाखून म्हटलं, हे कॉलनी हाऊस रेस्टॉरंट. अस्सल ब्रिटिश बांधकाम आहे. १८१६ साली वॉटरफ्रंट वेअरहाऊस म्हणून बांधलेली ही इमारत. तिचा जीर्णोदार करून हे रेस्टॉरंट एस्टॅब्लिश केलंय. खास ऐतिहासिक आणि खानदानी वातावरण हे इथलं सर्वात मोठ्ठं वैशिष्ट्य!

पीटरच्या नजरेतून गौरवाची भावना ओसंडत होती.

ऐतिहासिक आणि खानदानी वातावरण हे शब्द ऐकताच बरंचसं आयुष्य दिल्लीत गेलेल्या डॉ.सतीशच्या डोळ्यांपुढे लाल किल्ला उभा राहिला. राष्ट्रपती भवन उभं राहिलं. त्याला जाणवलं की त्या वास्तूंसमोर वॉटरफ्रंट वेअरहाऊसच्या नूतनीकरणातून तयार झालेलं ते रेस्टॉरंट म्हणजे अक्षरश: गोठा होतं. दरिद्री पण बुध्दिवान भारताचं प्रतिनिधित्व करणाऱ्या डॉ. सतीशला एरवी आपल्या पार्श्वभूमीची आणि भारतीय संस्कृतीची लाज वाटत असली आणि मनात त्यामुळे न्यूनगंड निर्माण झालेला असला तरी या क्षणी दरिद्री भारताच्या ऐश्वर्यवान, वैभवसंपन्न इतिहासाचा आणि वारशाचा गर्व वाटला.

पण त्या क्षणी कॉलनी हाऊसकडे कुतुहूलानं पाहात नजरेमध्ये कौतुक व बोलण्यात प्रशंसा आणण्यात तो यशस्वी झाला.

आत शिरताना पीटरनं पुढे माहिती दिली, ''लो कंट्री फर्माईश म्हणजेच अमेरिकेच्या दक्षिणेकडे प्रचलित व लोकप्रिय असलेले खाद्यपदार्थ.

लो कंट्री फर्माईश आणि लोकल सी-फूडसाठी कॉलनी हाऊस दूरदूरपर्यंत प्रसिध्द आहे.''

■

आत शिरताच डॉ. सतीशला जाणवलं की कॉलनी हाऊस आतून मात्र गोठ्यासारखं नव्हतं. त्याचे अंतरंग, रचना, सजावट सारंच केमालीचं विलासी होतं. आतमध्ये पाच प्रशस्त बँक्वेट रूम्स आणि शिवाय स्वतंत्र आणि अतिशय भव्य असा वाइन सेलार होता. प्रत्येक बँक्वेट रूम म्हणजे अतिप्रचंड व राजेशाही असं जेवणाचं दालन होतं. वाइन सेलारच्या बाहेर



फॉर्मल ड्रेसची सक्ती असल्याची स्पष्ट सूचना होती. साहजिकच आत जाणारे पुरुष फुल सुटाबुटातले आणि बायका, खास फ्रॉक, स्टॉकिंग्ज आणि उंच टाचांच्या सँडल्समधल्या होत्या. ही सारी मंडळी अर्थातच सरंजामशाहीवर पोसलेली असणार याबद्दल डॉ.सतीशला संदेह नव्हता.

पीटरनं किचनचा दरवाजा ढकलताच गरम हवेचा झोत अंगावर आला. सतीशची विचारांची साखळी त्या गरम भपकाऱ्यानं एकदम तुटली. तोही पीटरच्या मागोमाग किचनमध्ये शिरला.

"डॉक, आय शाल बी देअर इन अ मोमेंट. डॉक्टर, मी आता येतो... बस हं प्लीज बी सीटेड इन माय ऑफिस, "सर्व्हिंग काऊंटरच्या मागून त्याला उद्देशून आलेल्या आवाजाच्या दिशेने त्याची मान वळली पण के.के. ला त्यानं ओळखलंच नाही! तो तसाच एक-दोन पावलं पुढे गेला. पण मग लागलीच त्याला स्वत:ची चूक उमगली. त्याच्या लक्षात आलं की, डोक्यावर शेफची पगडी घातलेला, घामानं भिजलेला, पांढऱ्या युनिफॉर्ममधला तो काळासावळा चेहरा के.के. चा होता. के.के. त्याच्याकडे पाहून हात हलवीत होता.

लगेच त्यानं के.के. ला प्रतिसाद दिला व के.के. च्या ऑफिसमध्ये जाऊन बसला. डॉ. सतीशला आता "मंझिल" मिळाल्याचा आनंद झाला.

परवाच डॉ. टेलरनी इथल्या परक्या वातावरणात डॉ. सतीशला एकाकीपणा वाटू नये म्हणून त्याची व के.के. ची ओळख करून दिली होती. के.के. नायडूचं डॉ. टेलरनी पुष्कळच कौतुक केलं होतं. अर्थात एका स्वयंपाक्याला डॉ. टेलरनी एवढं महत्त्व द्यावं हे सतीशला असयुक्तिक वाटलं होतं. कारण भारतात असं घडताना पाहिलं नव्हतं. पण के.के. कडे आपल्याला कदाचित पुढे-मागे चमचमीत जेवण करता येईल या सुप्त आशेने आणि अपेक्षेमुळे त्यानं नाराजीचा सूर आतल्या आत दाबून टाकला होता. डॉ. टेलर किंवा के.के. बद्दल त्याला राग नव्हता. पण एवढं कौतुक अनपेक्षित होतं. कारण डॉ. टेलरसारख्या प्रतिष्ठाप्राप्त संशोधकानं के.के. सारख्या स्वयंपाक्याच्या पाककलेचंही वारेमाप जे कौतुक केलं, ते कौतुक भारतात खानसाम्याचं किंवा स्वयंपाकिणीचं करतात, तसलं 'प्रोत्साहनपर' नव्हतं. तो मनापासून आणि खरोखरच आदरानं केलेला गौरव होता. त्यामुळे डॉ. सतीशला हे सारं पचायला अन् पटायला अवघड होतं. पण

के.के नं जेव्हा आत्मीयतेनं जेवणाचं निमंत्रण दिलं तेव्हा असल्या विचारांना जागाच नव्हती.

बसल्या बसल्या डॉ. सतीशच्या डोक्यात विचार घोळत होते तसेच त्याची नजरही चौकसपणे सगळं निरखीत होती. अशा वातावरणात तो पहिल्या प्रथमच आला होता.

सर्वप्रथम लक्ष आकर्षित करून घेत होते ते सुटाबुटातले वेटर्स! त्यांच्या धावपळीमध्येच काही कृष्णवर्णीय स्त्रियांचं सफाईचं काम चालू होतं. शेफचे सहायक फ्रूट्स, सॅलड्स, सॉस, फिश, लँब, बीफ, चिकन, सिंपस्, पोर्क, इत्यादी अनेक प्रकारच्या डिशेस तयार करण्यात गुंतले होते. वेगवेगळ्या स्टेजेसमधील ते पदार्थ कुणी शिजवीत होता तर कुणी स्मोक करीत होता. त्यामुळं संपूर्ण वातावरणात सतत बदलणारा मिश्र दर्प भरून राहिला होता.

तेवढ्यात नीट कापलेली सेलरी, टोमॅटो, कांदे वगैरेनीं भरलेली नि वरून मेयोनेज सॉस पसरलेली सॅलडची डिश घेऊन एक तरुणी त्याच्यापाशी आली. तिचे पिंगट सोनेरी केस, घारे डोळे, गोरा पान वर्ण, लालचुटूक ओठ, लाडिक हास्य आणि मधाळ नजर पाहून डॉ. सतीशला आपण परीच पाहतोय असं वाटलं. अशा तऱ्हेचं लावण्य त्यानं परीकथांमध्येच वाचलं होतं अन् केवळ कल्पनेत व सिनेमात पाहिलं होतं. डॉ. सतीश तिला पाहून बावचळला, विरघळला, पाघळला.

"हाय! हाऊ आर यू?" म्हणून तिनं सॅलडची डिश त्याच्यासमोर टेबलावर ठेवली. मिठ्ठासपणे त्याच्या नजरेला नजर भिडवत मग तिनं विचारलं, "व्हॉट वुड यू लाइक टु हॅव डॉक? वाइन, जिन, व्होडका, स्कॉच?"

"नो-नो थँक्स," म्हणून सतीश बावचळून तिच्याकडे बघतच राहिला. भान हरपून तिचं सौंदर्य, तिचं तारुण्य अधाशी नजरेनं आणि अजागळ आविर्भाव करीत पीतच राहिला.

त्याच्या त्या विनोदी विक्षेपाकडे दुर्लक्ष करून ती तरुणी "ओ.के." म्हणत परत फिरली. अशा बाबींना तिथे कुणी फारसं महत्त्व देत नसे.

खोकल्या-शिंकल्याकडे करावं तसंच असल्या बाबींकडे दुर्लक्ष केलं जायचं.

ती परत फिरते तोच के.के. आत आला. ''तुला काय फिक्स करू? स्कॉच?''

के.के. च्या बोलण्यानं सतीश भानावर आला. चेकाळून गेल्यामुळे त्यानं म्हटलं, ''एनी थिंग यू गिव्ह अ‍ॅण्ड आय शाल टेक.'' पण लागलीच आपल्या उत्स्फूर्त विनोदामध्ये व्याकरण दोष तर नव्हता ना हे त्यानं मनातल्या मनात पडताळून पाहिलं. तसंच आपण तिच्याकडून स्कॉच न घेता के.के. कडून स्वीकारली म्हणून मघाची ती परी नाराज तर होणार नाही? अशीही त्याच्या मनात शंका उद्‌भवली. पण के.के. नं स्कॉच भरली तसे सारे विचार बाजूला पडले आणि के.के. नं चीअर्स म्हणण्याची वाट न बघता त्याचा ग्लास तोंडाला लागला!

मग लक्षात येताच त्यानं के.के. ला विचारलं, ''तुम्ही नाही घेत?''

डॉ. सतीश, मला सवड नाही, पण तू अगदी आरामात हवी तेवढी घे. निदान माझ्याकडे तरी फॉरमॅलिटी ठेवू नको. माझ्याकडे पुष्कळ जण येतात. पण फॉरमॅलिटी मात्र नाही चालत. तू देखील कंटाळा येईल तेव्हा तेव्हा अगदी इनफॉर्मली जरूर येत जा.

त्याच्या बोलण्यानं सतीशला परांच्या गादीवर उबदार पांघरुणात लोळत असल्यासारखं वाटलं.

के.के. बोलत होता, तेवढ्यात शेफच्या गणवेषातील सुमारे सव्वासहा फूट उंचीचा एक दणकट तरुण आत आला. घाम पुसत पुसत त्यानं टेबलावरची 'कॅमल लाइट' पेटवली. त्या तरुणाच्या देहामध्ये कृष्णवर्ण जवळजवळ नव्हताच. त्वचा गोरी, डोळे घारे, केस, दाढी, मिशा, अंगावरची लव, सर्वकाही भुरं होतं.

या नव्या नमुन्याकडेही सतीशची नजर खिळून राहिली ! नवलाने पाहणाऱ्या सतीशला मग के.के. नं त्या तरुणाचा परिचय करून दिला. '' ही इज फ्रॅंकलीन द बेस्ट मॅन आय हॅव, अ‍ॅण्ड ही इज डॉ. सतीश फ्रॉम डेल्ही, इंडिया. हॅज कम अ‍ॅज अ पोस्ट डॉक फेलो. (हा माझा उत्तम सहकारी फ्रॅंकलीन आणि हा डॉ. सतीश पोस्ट डॉक्टरेट फेलो!''

के.के.च्या नजरेत उभयतांबद्दल कौतुक होतं. ''ओह दॅट्स् ग्रेट. बरं झालं तुमची भेट झाली! हॅपी टु हॅव यु हिअर!'' रांगड्या दिलेरीच्या सहज

स्वरात तो तरुण म्हणाला.

फ्रँकलीननं हस्तांदोलनासाठी पुढे केलेला हात हातात घेण्यासाठी डॉ. सतीश उठला. ''हॅपी टु मीट यू' म्हणत त्यानं फ्रँकलीनशी हस्तांदोलन केलं तेव्हा फ्रँकलीनच्या दणकट केसाळ पंजाशी स्वत:च्या सावळ्या गव्हाळी रंगाच्या तुकतुकीत लहानसर पंजाची त्याच्या मनात नकळत तुलना झाली.

फ्रँकलीननं मान वेडावत हाश्श्य-हुश्श्य करत निथळणारा घाम पुसला, तसं त्याला काय हवंय हे चाणाक्ष के.के. च्या लगेच लक्षात आलं.

''मेरी बीअरचा एक जार घेऊन ये!'' त्यानं बाहेर कामात असलेल्या कृष्णवर्णीय तरुणीला सांगितलं.

लगेच निळसर काचेच्या भल्या मोठ्या जारमधून पांढराशुभ्र गाऊन घातलेली काळी कुळकुळीत हसतमुख लठ्ठ मेरी बीअर घेऊन आली. सतीशकडे पाहून तिनं उजव्या हाताची बोटं हलवून 'हाय' केलं आणि जार ठेवून ती निघून गेली.

दीड-दोन लिटरच्या त्या जारकडे आणि पाठमोऱ्या मेरीकडे आळीपाळीनं बघणाऱ्या डॉ. सतीशकडे पाहत फ्रँकलीननं घटाघट एक तृतीयांश जार संपवला आणि मोठ्ठ्यानं हसत म्हणाला, ''हिचा मेंदूवर काही परिणाम होत नाही, बाथरूममध्ये निघून जाते.''

अजस्त्र फ्रँकलीनच्या पहाडी व्यक्तिमत्त्वानं दबून गेलेल्या सतीशनं स्वत:ची केंट शिलगावली. खूप मोठा झुरका मारून त्यानं छातीचा पिंजरा फुगवला. धूम्रकांडाच्या 'थिअरी व एक्स्पिरिअन्स'च्या आधारे दडपणावर मात केली!

पाच मिनिटं गप्पा मारून बीअर संपवून ताजातवाना झालेला फ्रँकलीन कामाला निघून गेला.

थोड्याच वेळात के.के. नं डॉ. सतीशसाठी जेवण मागवलं. भारतीय आणि अमेरिकन पदार्थांनी भरलेल्या ताटाला न्याय द्यायचा आग्रह करून के.के. परत कामाला लागला.

व्हिस्कीचे ग्लासमागून ग्लास हळूहळू रिते करत डॉ. सतीशनं त्या चविष्ट पदार्थांचा समाचार घ्यायला सुरुवात केली.

मध्येच डॉ. सतीशला कंपनी देण्यासाठी म्हणून के.के. दोन मिनिटं येऊन थोडीशी सॅलड खाऊन गेला.

सतीशचं जेवण संपतं न संपतं तोच डेझर्टची खास के.के. नं बनवलेली डिश आली. स्ट्रॉबेरीचं अन् ब्ल्यू बेरीचं कधीच न खालेल्लं ते आईस्क्रीम सतीशला अतिशय आवडलं. के.के. च्या आदरातिथ्यानं सतीश तृप्त झाला.

के.के. ची सारखी धावपळ चाललेलीच होती. वारंवार फोन घणघणत होते आणि मसूमस-बेलपेपर्सपासून ते लॉबस्टर्स श्रिंप्सपर्यंत विविध खाद्यपदार्थांचे भाव, त्यांची उपलब्धता, त्यांचा दर्जा वगैरेबद्दल फोनवरूनच के.के. बोलणी करीत होता. सारं काही हॉटेल व्यवसायाशी निगडित होतं.

ड्यूटी संपवून दुसऱ्या दिवशीच्या खाद्यपदार्थांच्या पूर्वतयारीबद्दल सूचना देत के.के नं युनिफॉर्म उतरवला. आणि मग मनसोक्त खाऊन-पिऊन तृप्त झालेल्या डॉ. सतीशला बरोबर घेऊन तो त्याच्या टोयोटाकडे आला. सतीशला डॉर्मिटरीत परतण्याची घाई नसल्याची खात्री केल्यावर आणि तो व्यवस्थित गाडीत बसल्यावर के.के. नं गाडी सुरू केली. ■



गाडी सुरू झाली तसे रस्त्यावरचे दिवे मागे पळू लागले. रात्रीची ती श्रीमंती पाहत पाहत सतीश अधिकच धुंद झाला. आकाशाला गवसणी घातल्यासारखं वाटलं.

ब्लॉसम अपार्टमेंट्स्च्या कॉम्प्लेक्समध्ये शिरताच के.के. नं गाडीचा वेग कमी केला आणि स्वत:च्या अपार्टमेंटसमोर गाडी उभी केली.

दोघे अपार्टमेंटकडे आले तसे के.के. नं. लॅच उघडत म्हटलं, "डॉ. सतीश, हा माझा साधासुधा रेसिडेन्स."

"ब्युटिफुल! सुपर्ब!" उत्स्फूर्तपणे सतीशनं दाद दिली. स्कॉचमुळे त्याच्या मनावरचं दडपण पूर्णपणे निघून गेलं होतं. साध्या जमिनीवरून चालताना देखील त्याला स्पंजवरून चालल्यासारखं वाटू लागलं होतं. पण त्यामुळेच दरवाजातून आत पाऊल टाकताच अंथरलेल्या जाड मऊ गालिच्यामुळे तो एकदम धडपडलाच.

"टेक इट इझी" म्हणत के.के. नं त्याला आधार दिला.

के.के. चं घर फिरून पाहताना डॉ. सतीश थक्क झाला. लालबुंद वॉल टु वॉल कार्पेट, अप्रतिम फर्निचर, अतिसुंदर अभिजात कलेनं परिपूर्ण म्युरल्स (भित्तिचित्रं), असंख्य ममेंटोज (पदकं-भेटवस्तू), शेकडो पुस्तकांनी भरलेली, कलाकुसरींनी नटलेली कपाटं, सर्व सोयींनी परिपूर्ण किचन, बेडरूम, बाथरूम... सर्वच के.के.च्या गडगंज श्रीमंतीची कल्पना आणून देणारं आणि के.के. च्या दर्दी स्वभावाची जाणीव करून देणारं होतं!

के.के. त्याला वरच्या मजल्यावर घेऊन गेला. वर के.के. ची स्वत:ची अतिप्रशस्त बेडरूम होती. पलीकडे आणखी दोन बेडरूम्स होत्या. प्रत्येक बेडरूमला ॲटॅच्ड रेस्टरूम (स्नान व स्वच्छतागृह) होती. दुसऱ्या बाजूला बाल्कनी होती.

बाल्कनीत उभं राहून जेव्हा पलीकडे दिसणारं दृश्य सतीशनं पाहीलं तेव्हा तो मंत्रमुग्ध झाला. स्वच्छ आणि थंड वातावरण! अंधाराच्या चादरीवर चमणारे तारे, मर्क्युरी लॅम्पस्, सोडिअम व्हेपरचे पिवळे लॅम्पस् आणि हे सारं ओढून घेऊन खेळणारी, खळखळणारी वॅपू खाडी! "खरोखर स्वर्गीय सौंदर्य आणि स्वर्गसुख, यापेक्षा आणखी काय वेगळं असू शकतं?". सतीश स्वत:शीच पुटपुटला.

सतीश भारल्यासारखा समोरचं दृश्य पाहत असताना, के.के. नं

त्याला रेस्टरूमला जायचं असल्यास विचारलं. अमेरिकेत पोचल्यापासून रेस्टरूम किंवा मेन्स म्हणजे प्रसाधनगृह आणि एलेव्हेटर म्हणजे लिफ्ट हे डॉ. सतीशच्या आता पक्कं ध्यानात राहिलं होतं. तो लगेच बाथरूमला जाऊन आला.

बेडरूममधल्या ड्रेसिंग टेबलावर ठेवलेले स्वतःच्या पत्नीचे आणि मुलीचे असे फोटो सतीशला दाखवल्यावर एका रुबाबदार वृध्द राजेशाही पोषाखातील व्यक्तीचा फोटो दाखवत के.के. नं म्हटलं, ''हे माझे ताता-आजोबा. सोमनिलयम संस्थानाचे शेवटचे महाराज''.

''हो? म्हणजे तुम्ही रॉयल फॅमिलीतले आहात? सतीश आश्चर्यानं उडालाच. क्षणभर त्याचा स्वतःच्या काना-डोळ्यांवर विश्वासच बसेना!

''होय'' म्हणून के.के. नं त्याला मग स्वतःच्या आई-वडिलांचे फोटो दाखवले. वडिलांच्या खादीच्या पेहरावाकडे निर्देश करून त्यानं म्हटलं, ''नान्नगारूंचा राज्याभिषेक झालाच नाही. युवराजच राहिले. ही वॉज एम. पी....नाऊ ही इज नो मोअर.'' मग थोडंसं गूढ हसत के.के. नं म्हटलं, ''बरं का डॉ. सतीश आम्ही आता फक्त नावापुरते राजे. नामधारी राजे. अर्थात, बैल जसा अशक्त झाला तरी बेडकाएवढा होत नाही तसेच आम्हीही... अजून सामान्य माणसांच्या जीवनसंघर्षाची आम्हांला झळ नाही बसलेली''.

सतीशनं मान हलवली. तो समजला होता त्याप्रमाणे के.के. साधा स्वयंपाकी नाही हे त्याला कळून चुकलं.

''पण सतीश, पैसा नेहमी दुय्यम असतो... अन् दुय्यमच स्थान द्यावं त्याला आयुष्यात!''

ते ऐकताना सतीशला अचानक राग आला. के.के.ला विचारावंसं वाटलं, 'खायला-प्यायला घातलंस म्हणून हा सगळा उपदेश? की मी गरीब म्हणून? कुणा कोट्यधीशासमोर 'ब्र' तरी काढू शकशील का? बरं पैसा दुय्यम वाटतो तर अमेरिकेत येऊन राबतोयस ते काय झक मारायला?.....' पण प्रत्यक्षात मात्र त्याच्या तोंडून एकही शब्द निघाला नाही.

सतीशच्या मनात काय चाललंय याची कल्पना नसल्यामुळे के.के. बोलतच होता. खरं म्हणजे एका प्रकारे स्वतःशीच बोलत होता. स्वतःशीच संवाद साधीत होता. सतीशचं केवळ निमित्त होतं. विशेष म्हणजे डॉ.

सतीशचे कानही आता के.के. साठी बंद झाले होते. के.के.च्या त्याच्या मते ढोंगी अन् पोकळ उपदेशात आणि बापजाद्यांच्या जिवावर मिरवलेली प्रौढी ऐकण्यात त्याला अजिबात स्वारस्य नव्हतं. तेवढ्यात कॉलबेल वाजली. डॉ. सतीशनं घड्याळात पाहिलं. साडेअकरा झाले होते. लगेच ते दोघेही लगबगीनं खाली आले. कारण त्या श्रीमंती थाटामध्ये, घरच्या कामासाठी नोकर-चाकर मात्र अजिबात नव्हते.

के.के. नं दार उघडलं, तसे एक-एक करीत तब्बल सात मित्र-मैत्रिणींचा ताफा घरात घुसला. त्या घोळक्यातल्या पीटर आणि फ्रँकलीनला सतीशनं लगेच ओळखलं. त्या 'परी'लाही ओळखलं. शिवाय एक जोडपं होतं. ती दोघं अगदीच तरुण होती. त्या पांचाव्यतिरिक्त बुल्गानिगसारखी हनुवटीवर टोकदार दाढी असलेला एक महागलेलठ्ठ तरुण होता अन् स्लीव्हलेस स्वेटर घातलेली एक तरुणी होती.

सर्वजण आत आले तसे के.के. व डॉ. सतीश दोघेही आत येऊन सोफ्यावर बसले. के.के. नं मग त्यांच्याशी त्या सर्वांची ओळख करून दिली.

के.के. च्या शेजारी स्लीव्हलेस स्वेटर आणि टाइट जीन घातलेली आणि सोफ्यावर पाय ठेवून बसलेली तरुणी ट्रेसी होती. तीही दुसऱ्या एका हॉटेलात शेफचं ट्रेनिंग घेत होती. टोकदार दाढीवाला तो गलेलठ्ठ तरुण मायकेल होता. त्यानं एव्हाना गालिच्यावर बसकण मारून आतल्या खोलीतून भरून आलेला व्हिस्कीचा ग्लास रिता करायला सुरुवात केली होती. ते तरुण जोडपं होतं टॉम आणि सॅली.

टॉम कायदा शिकत होता तर मायकेल हॉटेल मॅनेजमेंट. त्या दोघांना मिळून न्यूयॉर्कला एक मोठ्ठं हॉटेल सुरू करायचं होतं. सॅली अगदीच कोवळी, नाजुक, अगदी शाळकरी मुलगी दिसत होती. पण तिला म्हणे सहा महिन्यांची मुलगी होती! त्या परीनंही आतापर्यंत ठाण मांडून जीन प्यायला सुरुवात केली होती. तिचं नाव रोझी होतं.

ह्या बिनधास्त गँगच्या दिलखुलास गप्पा, त्यांचं निर्भीड मोकळं वागणं, त्यांच्या आवडी-निवडी, त्यांची स्वप्नं यांनी सतीश वेडावून गेला. त्यांची ती शारीरिक जवळीक पाहून त्याची कानशीलं गरम झाली. तो रोमांचित झाला.

डॉ. सतीशला त्यांच्या मित्रमंडळींची आठवण झाली. बालपणी, "देशाची सेवा करणार," "गरिबांना मदत करणार," "शाळेचं नाव मोठं करणार," "गावाची शान वाढवणार" वगैरे तारे तोडणाऱ्या त्याच्या बहुतेक मित्रांनी अखेर पोटभरतीची ढकलगाडी कशीबशी चालवली होती. मित्रच नव्हे तर गुरुजन, वडीलधारे, प्रतिष्ठित, सारेच जण एकीकडे उदात्त स्वप्नांचा उपदेश पाजत पाजत स्वत: मात्र संधी मिळताच त्याच स्वप्नांचा गळा घोटत होते.

त्याला तो आठवीच्या वर्गात असताना घडलेली ती घटना आठवली.......जेवणाची सुट्टी लागली होती. सर्वजण आपापले डबे उघडून खायला बसले होते. सतीशही डबा उघडून बसला होता. एवढ्यात त्यांच्याच वर्गातला गुप्ता तिथे येऊन टपकला आणि काहीच कारण नसताना सतीशची छेडछाड केली. सतीश गांगरला. गोंधळला. त्याला कळत नव्हतं की, गुप्ता असं का वागत होता. पण थोड्या वेळानं त्याच्या ध्यानात आलं होतं, की गुप्ताला आवडणारी सरोज सतीशच्या मागे मागे असल्यामुळे गुप्ता भडकला होता. पण महत्त्वाची बाब म्हणजे मेल्याहून मेल्यासारखं झाल्यामुळे त्यानं जेव्हा प्रिन्सिपॉलकडे तक्रार केली तेव्हा त्यांनी उलट सतीशचीच कानउघाडणी केली होती. कारण गुप्ताचे वडील संस्थेचे चेअरमन होते!

त्यामुळे मित्रच नव्हे तर त्याचे शिक्षक, ते संस्थाचालक, ते नेते आणि त्यांच्या बोलण्या-वागण्यातील ती प्रचंड तफावत आज त्याला प्रकर्षानं जाणवली. विद्यार्थ्यांना, लोकांना....थोडक्यात, इतरांना तेवढा सगळा उपदेश... इतरांसाठी तेवढा सत्य, अहिंसा, समानता, सचोटी, परोपकार, बंधुभाव, मानवता, सर्वधर्मसमभाव, सामाजिक बांधिलकी, भूतदया, सेवा, त्याग अशा अनेक शब्दांचा भोंदू जयघोष आणि स्वत:चं मात्र त्यांच्याशी पूर्णपणे विसंगत वर्तन!

ते ढोंगी वातावरण, ती गरिबी, ती सदानकदाची टंचाई, त्या पै-पैसाठी खाव्या लागलेल्या खस्ता, ती त्याच्या आईची आणि त्याची गांजवणूक सारं त्याला आठवलं.

सर्व बाजूंनी ओढग्रस्त आणि दडपणूक झालेल्या त्याच्या गांजलेल्या मनाला ही स्वैर आणि मनसोक्त चंगळ पाहून एकदम उभारी आली.

इथं ना आदर्शांचा घोषना त्याच आदर्शांची निर्लज्ज पायमल्ली. मोठी स्वप्नं बाळगण्याचा आटापिटाही नाही आणि नसता मोठेपणा दाखविण्याचा दांभिक हव्यासही नाही. शिकायचं,कष्ट करायचे, ते पैशांसाठी. स्वत:च्या सुखासाठी. इतरांबद्दल खोटा पुळका दाखवणं नाही. जाता जाता कुणाला मदत केली तर त्याची टिमकी वाजवत बसण्याचा प्रकार नाही.

त्याच्या मनात आलं, आपल्याकडे कसा ढोंगीपणा हाडीमासी भिनलाय. मुलांनीं शिकायचं मुळात लोकसेवेसाठी. नेत्यांनी सत्ता मिळवायची लोकसेवेसाठी. व्यापाऱ्यांनी नफा कमवायचा तोही सेवेसाठी! जणू काही सेवेशिवाय जीवनाला अर्थच नाही! सेवा करणं हाच जीवनाचा आद्य आणि अंतिम हेतू आहे! डॉक्टरपासून ते राष्ट्रपतीपर्यंत सर्वांना, सेवा केल्याशिवाय गत्यंतर नाही! टोयोटातून फिरणारा डॉक्टर रुग्णसेवा करतो आणि लाखो रुपये कमावणारे सिनेमातले, नटनट्या कलेची सेवा करतात! लेखक साहित्यसेवा करतात,तर गायक संगीतकलेची! क्रीडापटू क्रीडेची, तर वकील न्यायदेवतेची! या सेवाभावातील विसंगतीची मेख अशी, की सर्वच जण सेवा करतो म्हणतात, सेवा करून घेतो असं मात्र कुणीच म्हणत नाही!

याउलट इथे. शब्दांचे बुडबुडे नाहीत, दांभिक दावे नाहीत. सारं काही सरळसोट. मुळात जीवन मजेसाठीच आहे, उपभोगासाठी आहे हीच पक्की धारणा, अन् तीही उघड. छुपी नाही. त्यामुळे जास्तीत जास्त सुखासाठी, जास्तीत जास्त व हुशारीनं पैसा मिळवणं व पैसा मिळवण्यासाठी शिक्षण, नोकरी वगैरे जे जे जमेल ते ते करणं हेच सर्वसामान्य तत्त्व. कुणीही ते सहसा नाकारताना दिसत नाही. त्यामुळे कामात ढिलाई नाही. कर्तव्यात कुचराई नाही. चुकारपणा नाही, तसाच कामाचा मोबदला घेताना भीडभाड नाही, ढिलेपणा नाही. कुणी कुणाकडून अवास्तव 'सेवेची' अपेक्षा ठेवीत नाही आणि तशी कुणी अपेक्षा ठेवलीच तर त्या तसल्या अपेक्षेला कुणी भीक घालीत नाही!

सतीशला त्याच्या परिचयाच्या मुली आठवल्या. त्यांचं वागणं कसं नेहमी चोरटं असायचं. खोटीच शालीनता आणि खोटाच संकोच असायचा. या उलट ट्रेसी, सॅली, रोझी, सगळ्या कशा बिनधास्त,मनमोकळ्या दिलखुलास आणि हसतमुख!

अमेरिकनांचा हा मनसोक्त आनंद घेत स्वैर जगण्याचा गुणविशेष

त्याला अतिशय आवडला. स्वातंत्र्याच्या या नव्या परिचयानं त्याला एकदम मोकळं वाटू लागलं.

दडपणरहित बेबंद आनंदाच्या कल्पनेत विहरत विहरत तो स्वत:तच हरवला असताना त्याच्याकडे ट्रेसीचं लक्ष गेलं. तिला वाटलं आपल्यातलं कुणी याच्याशी मिसळत नसल्यामुळे हा असा एकटाच बाजूला मख्खपणे बसलाय. ती तिच्या जागेवरून उठून सतीशच्या शेजारी येऊन बसली आणि आपण होऊनच तिनं गप्पा सुरू केल्या.

ट्रेसी जवळ बसली तसा सतीश एकदम बावचळला. पण तिचे भारतातल्या संस्कृतीबद्दलचे प्रश्न ऐकून त्याला थोडं नवलही वाटलं आणि कंटाळाही आला. वाटलं प्रसंग इतका मजेचा असताना कशाला हे भारतातल्या संस्कृतीचे डोईजड होणारे विचार? कशाला हवी ती तिथल्या दारिद्र्याची आठवण? कशाला हवी ती स्वास्थ्य बिघडवणारी विरक्तीच्या लोढण्यांची मान मोडणारी ओझी? कशाला हवी ती नकारघंटेची डोकेदुखी? पण तिच्या सहवासासाठी सतीशला तेही मंजूर होतं! तोंडाला येतील ती उत्तरं देत तिचं आंगोपांग न्याहाळण्यात, तिच्या समीपतेत, तिच्या स्पर्शात तो धुंद झाला. त्या मोहक आणि मधाळलेल्या संगतीत आणि हरवलेल्या अवस्थेत वेळ कसा निघून गेला त्याला कळलंच नाही.

रात्रीचे दोन वाजले तसे बाकी सर्वजण निघून गेले. फक्त ट्रेसी तेवढी मागे थांबली. सतीशलाही तिच्या गोऱ्या गोऱ्या, मुलायम, सुखद जवळिकीसाठी तिथंच राहावंसं वाटू लागलं. त्याच्या सुदैवानं परत जायला त्याच्याकडे वाहन नव्हतं! रात्री थांबायला ही उत्तम सबब होती. त्यातून कुणाकडे लिफ्ट मागावी तर त्याच्या डॉर्मिटरीच्या बाजूला जाणारं कुणीचं नव्हतं. सगळं कसं मस्त जमून आल्यासारखं त्याला वाटलं. तेवढ्यात के.के. नंही त्याला रात्री राहून सकाळी जाण्याबद्दल सुचवलं तेव्हा तो वरकरणी हो-ना करीत, आढे वेढे घेत पण अंतर्यामी एका पायावर तयार झाला. पण दुर्दैवानं वरच्या मजल्यावरच्या बेडरूममध्ये झोपण्याची सोय झाल्यामुळे ट्रेसीच्या सहवासाची इच्छा प्रयासानं दाबून त्याला वर जाणं भाग पडलं. के. के. नंच त्याला वर जाऊन आराम करायला सांगितल्यामुळे त्याचा नाइलाजच झाला. शिवाय ट्रेसीनं आराम करायला सांगितलं तेव्हा त्याचा निरुपाय झाला. बेडवर गुपचूप पडून राहणं भाग पडलं! बेडलॅम्प ऑफ करून पडला असताना

सतीशच्या मनात आलं, के.के मध्ये असं काय आहे जे आपल्यामध्ये नाही? तरीही हा एवढा गर्भश्रीमंत आणि आपल्या नशिबी मात्र गरिबी, असं का? तो मऊ मऊ उबदार बेड त्याला आता टोचू लागला. त्याला झोप येईना. त्याच्या जिवाची तगमग होऊ लागली. तो तसाच या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत राहिला.

उंची स्कॉच, स्वादिष्ट जेवण, आपुलकीची वागणूक, ट्रेसीचा उत्तेजक सहवास अन् आता फुलासारखी शय्या असूनही सतीश स्वत:च्या परिस्थितीच्या व अतृप्त इच्छांच्या चटक्यात होरपळत होता. त्यानं आतापर्यंत खूप कळ काढल्यामुळे आता त्याला राहवत नव्हतं. प्रत्येक सुख मिळेल तिथून आणि मिळेल तसं ओरबाडून काढून घ्यावं, उपभोगावं या विचारानं तो अधीर झाला होता. विशेषत: त्याच्यातला नर तर त्याक्षणी फारच उफाळून आला होता.

या मन:स्थितीत भर पडली ती खाली चाललेल्या कुजबुजीमुळे. त्याच्या मनात आलं, "खाली काय चाललं असेल ते सांगायला कुणा ज्योतिषाची गरज नाही! पैशाला दुय्यम स्थान आहे म्हणत खोऱ्यानं पैसा ओढतोय, आता रात्रभर रतिसुख भोगभोगून झालं की उद्या सकाळी 'ब्रह्मचर्य हेच जीवन' ची ढेकर देईल हा के.के.!" सतीश स्वत:शीच चरफडला.

बराच वेळ झाला तरी खाली उजेडच होता. कुजबूजही ऐकू येत होती. पुन्हा सतीशच्या मनात आलं आपण जीव तोडून राबराबून शिकलो तरी आपली परिस्थिती कायम फाटकी व तंगीची. या उलट ह्या स्वयंपाक्याच्या घरी मात्र लक्ष्मी-सरस्वतीबरोबर रंभा, मेनका उर्वशीही पाणी भरताहेत! त्या विचारासरशी स्वत:च्या मेंदूच्या तळातून लहानपणी शिकलेल्या, पाठ केलेल्या संस्कृत सुभाषितांच्या पंक्ती त्याच्या कानात घुमू लागल्या. "विद्या बंधुजने विदेश गमने विद्या महादेवता। स्वदेशे पूज्यते राजा विद्वान सर्वत्र पूज्यते।

विद्या ददाति विनयम् विनायात् याति पात्रता। पात्रत्वात् धनमाप्नोति धनात् धर्मम् तत: सुखम्।। सब भंकस है साला......! सब झूठ है! सब धोका है!" सतीश स्वत:वरच चिडला!

खालच्या खोलीतला प्रकाश आता मंदावला. पण कुजबूज वाढली. सतीशनं मनगटावरच्या घड्याळ्यात पाहिलं. रेडियमचे काटे चार वाजल्याचं

दाखवत होते. तो अस्वस्थ झाला. त्याचं कुतूहल जागं झालं.के.के. आणि ट्रेसी आता कोणत्या अवस्थेत असतील? त्याच्या डोळ्यांपुढे कल्पनाचित्रं तरळू लागली. के.के. आणि ट्रेसीच्या शृंगाराची ती कल्पनाचित्रं प्रतिक्षणी उत्तान होऊ लागली. कामशास्त्राची आणि कामक्रीडेची एक एक पायरी ओलांडू लागलीं. चुंबनं,आलिंगनं वाढत गेली. समीपता वाढली. आणि निकटता वाढत गेली. सतीशच्या अंगातून त्याला अंर्तबाह्य पेटवणारे गरम प्रवाह वाहू लागले. त्याच्या धमन्या उडू लागल्या. त्याच्या ह्रदयातली धडधड वाढली. प्रेमाचा आवेग वाढतच चालला होता. शारीरिक ओढीची तीव्रता वाढतच चालली होती. एक एक वस्त्राचा अडथळा बाजूला पडत के के आणि ट्रेसी उन्मादाच्या उत्कट क्षणी आले तसा सतीश एकदम शहारून गेला. त्याला आता राहावेना. उठून त्यानं कानोसा घेतला. हळूच जिन्यातून ती उत्तान कामक्रीडा मनसोक्त पाहावी या विचारानं तो पेटून उठला. भारला गेला. काय पाहायला मिळेल या कल्पनेनं अधीर झाला. त्याच्या छातीचे ठोके आणखी वाढले. ओठ थरथरू लागले. डोळे विस्फारले. सदसद्विवेकबुध्दी वितळली. आपण काय करतोय, आणि जे काही करतोय ते योग्य की अयोग्य, याचा विवेक विरघळला. कोणताच पोच त्याला राहिला नाही. त्या भारल्या अवस्थेत त्याच्या नकळत एका विलक्षण आवेगानं पण तरीही सावधपणानं त्याचं शरीर मांजराच्या पावलांनी जिन्यापाशी सरपटलं.

हपापल्या नजरेनं डॉ. सतीशनं हळूच डोकावून खालच्या खोलीत पाहिलं!... त्याक्षणी जे दिसलं त्यानं तशाही अवस्थेत त्याचा चेहरा एकदम पडला. मान झटकन खाली गेली. खजील होऊन तो परत बेडवर येऊन पडला. त्याच्या संपूर्ण व्यक्तित्वावरच जणू काही घणाघात झाला होता. संपूर्ण अस्तित्वाचा, तर्काचा, विचारांचा, दृष्टिकोनाचा, त्याच्या ज्ञानाचा अख्खा पायाच उखडला गेला होता! कामभावनेनं वखवखलेल्या नजरेत इतकं झणझणीत अंजन पडावं असं काय पाहिलं होतं सतीशनं?

के.के. त्याच्या रायटिंग टेबलावरच्या टेबललॅम्पची शेड खाली करून बसला होता आणि बाजूला कोचावर पेननं स्वत:च्या केसांशी चाळा करीत भगवद्गीतेच्या मोठ्या अन् आकर्षक पुस्तकात बोट ठेवून ट्रेसी के.के.शी बोलत होती. बेडवर पडल्या पडल्या सतीश खिन्न झाला. के.के. व ट्रेसीच्या वागण्यानं जसा धक्का बसला तसाच त्याचा विरसदेखील झाला. अंदाज

चुकला याची खंत वाटली. शृंगाराचा भंग झाल्याची खिन्नताही आली. कसंबसं त्यानं स्वत:ला समजावलं. आज नाही तर लवकर पुन्हा कधी सुखाचा शोध आणि वेध चालूच ठेवायचा! थोड्या वेळानं ट्रेसी गेल्याचा आवाज आला. आजचं प्रकरण संपलं! त्याला आपसूक झोप लागली.

■

ट्रेसी गेल्यानंतर के.के. सोफ्यावरच लवंडला. पडल्या पडल्या डोक्यात ट्रेसीचे विचार घोळत होते. तिच्याशी जे प्रदीर्घ बोलणं झालं आणि तिच्या अंतरंगाची जी ओळख झाली त्यानं त्याला माणुसकीच्या खऱ्या व हृदयंगम स्वरूपाची, अवीट सौंदर्याची आणि अतर्क्य सामर्थ्याची उत्साहित करणारी अनुभूती आली होती. ट्रेसीबरोबरच्या त्या ऊहापोहानं त्याच्या स्वत:च्या अस्तित्वालाही जणू परीसस्पर्श झाला होता. तो अंतर्बाह्य चैतन्यानं भरून गेला होता.

ट्रेसीची तळमळ सच्ची होती. शालेय शिक्षणापलीकडे ती शिकली नव्हती, घरची पार्श्वभूमी विद्याविदांची नव्हती पण असं असलं तरी चौकसपणा होता. चिकित्सक वृत्ती होती. भावना उत्कट होत्या. स्वभाव पारदर्शक होता आणि बुद्धी तरतरीत व तेजस्वी होती. सतीशसाठी 'परी' असलेली ट्रेसी के.के. साठी अशी होती!

वास्तवात तिचे वडील साधे बांधकामावरचे मजूर होते आणि आई एका स्टोअरमध्ये हेल्पर होती. 'रेड नेक' म्हणून उच्चभ्रूंकडून हिणवला जाणारा असा हा समाजातील काबाडकष्टकऱ्यांचा स्तर. पण या साऱ्या अडचणींमध्ये तिनं स्वत:चा निरागसपणा व स्वत:ची उमेद कोमेजू दिली नव्हती.

आज गीतेबद्दल चर्चा करताना तर तिनं एक फारच मूलभूत प्रश्न विचारला होता. के.के. च्या दृष्टीने एखाद्या पंडितालाही लाजवील असा तो प्रश्न ऐकून के.के. थक्क झाला होता! अंतर्बाह्य हलून गेला होता.

"समाजात वावरणारे राजकीय, आर्थिक, सामाजिक गुन्हेगार, त्यांच्या गुन्ह्यांचा पल्ला आणि गांभीर्य, समाजातील रूढी, संकेत, मूल्यांचा पगडा, राज्यघटना, कायदे, शासन यंत्रणेची सुरक्षायंत्रणा, गुप्तहेर खाती वगैरे बाबी सुसूत्रतेनं नियंत्रित करण्याचा असा एखादा मार्ग खरोखरच आहे का?

समाजाचं दायित्व पत्करणारे विचारवंत, नेते, शासक असा मार्ग शोधण्याचा प्रयत्न करण्यात यशस्वी झाले आहेत का?

ह्या तिच्या प्रश्नावर त्यानं राजधर्माचं त्याला नव्यानं होत चाललेलं आकलन तिच्यासमोर मांडलं होतं. ज्याचं जीवन वैयक्तिक स्वार्थाच्या पलीकडे असतं त्याची दृष्टी धर्मातीत ,विज्ञानातीत आणि कोणत्याही विचारप्रणालीच्या अतीत असते. अशा व्यक्तीचं जीवन अमूर्त ऊर्जानिर्मितीचं केंद्र बनतं! त्याचं अस्तित्व इतरांना त्यांच्याच अंतरंगातून प्रेरणा देतं. त्याना प्रोत्साहित करतं. त्याचं अस्तित्व रूढी, अहंकार व विविध विचारप्रणालींच्या पलीकडील उदात्ततम अनुभवाचा साक्षात्कार व प्रचीती देणारं असतं. त्याच्या चैतन्यदायी प्रभावानं संकुचिततेची पकड ढिली होते. सदसद्‌विवेकबुद्धीच्या वाटा मोकळ्या होतात. आत्मज्ञानाचा प्रकाश अंतर्बाह्य पसरू लागतो. जीवनाची फरफट संपते. जीवन स्वतंत्र होतं. अशा स्वतंत्र व्यक्तींकडून त्याच्या क्षेत्रानुसार कायदा, वैद्यक, शिक्षण वैगेरे विविध क्षेत्रांमध्ये मानवकल्याणाचे महामार्ग खुले करणारी मार्गदर्शक तत्वं तयार केली जातात. त्यांना अनुसरून राज्यघटना म्हणजेच नवा राजधर्म तयार होतो. तसेच त्याला अनुसरून विविध क्षेत्रांच्या विकासाची वाटचाल वेगानं होऊन लोकांना त्यांचा उपयोग व्हावा यादृष्टीनं नवे कायदे योजना आणि नियमांचे तपशील तयार होतात.

पूर्वीच्या काळी व्यक्तिजीवन समाजकल्याणाला पोषक होण्याच्या दृष्टीनं व्यावहारिक संकेत व रूढी तयार होत. नीतिनियम तयार होत. हे सर्व म्हणजे मूलभूत स्वरूपाच्या कल्याणाकडे, आत्मज्ञानाकडे सामान्य व्यक्तीलाही घेऊन जाणाऱ्या छोट्या वाटा होत.

आजही तुझ्या प्रश्नाला उत्तर हेच आहे. फक्त गतकाळापेक्षा आजच्या आचारविचारांचा तपशील वेगळा असेल.

त्याच्या ह्या सविस्तर स्पष्टीकरणानं ती प्रभावित झालेली दिसली तरी तिला ते सारं संपूर्णपणे पटलेलं मात्र दिसलं नव्हतं. तिच्या मनातली शंका कायम होती. साहाजिकच त्यानं, तिला तिच्या प्रश्नामागे तसंच काही कारण होतं का, विचारलं. त्या प्रश्नामागील पार्श्वभूमी विचारली.

मग थोडे आढेवेढे घेऊन संकोचत तिनं ती हकीकत त्याला सांगितली होती. " मी नऊ वर्षांची होते तेव्हाची हकीकत आहे ही. त्या दुर्दैवी संध्याकाळी मी पोहून घरी आले होते. घरी कुणी नव्हतं. कॉलबेल वाजली

तेव्हा बेसावधपणे मी दरवाजा उघडला. लागलीच एक आडदांड हैवान आत घुसला. मला काय घडतंय याची नीट कल्पना येण्यापूर्वीच त्यानं माझ्या शरीराचा ताबा घेतला. जीवघेण्या धडपडीनंतर आणि प्राणपणानं प्रतिकार करण्याचा बऱ्याच वेळा प्रयत्न करीत राहिल्यानंतर पुढील सारं काही भयानक वेगानं घडलं. भीती, धक्का, अपमान, लज्जा आणि अखेर मरणप्राय वेदनांनी मी बेशुद्ध झाले....

त्यानंतर दोन महिने मी हॉस्पिटलमध्ये ॲडमिट होते. मम्मी आणि डॅडी रोज येत. त्यांच्या डोळ्यांत अपराधीपणाची खिन्न जाणीव असे. आपल्या मुलीचं आपण रक्षण करू शकलो नाही याची तीव्र खंत असे. त्या भयानक प्रसंगाच्या जबर धक्क्यामुळे मला रोज झटके येऊ लागले. रात्रभर झोप लागेनाशी झाली. रोज झोपेचं इंजेक्शन घ्यावं लागे. केवळ सुदैवानं आणि डॉक्टर्स, नर्सेस व इतर स्टाफच्या आपुलकी नि आत्मीयतेनं माझ्यात सुधारणा झाली. त्यांच्या अथक परिश्रमामुळे आणि निरलस सेवेमुळे दचकणं, किंचाळणं, ओरडणं कमी कमी होत गेलं. वैद्यकशास्त्राची प्रगती आणि सहृदय डॉक्टर-नर्सेसमुळे मी व्यवहारात वावरण्याइतपत बरी झाले हे खरं. पण पुढे पुढे मला जाणवू लागलं की समाजातील केवळ अशाच प्रकारच्या नव्हे तर इतरही गुन्ह्यांचे प्रमाण कमी झाल्याशिवाय आपल्याला खरी स्वस्थता लाभणार नाही. निरागस मुलींना निर्भयपणे वावरता येऊ लागल्याशिवाय माझ्या आत्म्याला खऱ्या अर्थानं समाधान मिळणार नाही...

बोलता बोलता तिच्या डोळ्यांत त्या अघोरी अनुभवाच्या आठवणीनं अश्रूही आले आणि त्याचबरोबर समाज निकोप बनवण्यासाठी झटण्याचा कृतनिश्चयही.

ते सारं ऐकताना के.के. ला तो स्वत:च त्या अनुभवातून जात असल्यासारखं वाटलं होतं. स्वत:च्या आकलनाची व्याप्ती किती मर्यादित आहे व आपल्या शब्दांमधील सामर्थ्याचा अभाव किती वास्तव आहे या दाहक जाणिवेनं तो अस्वस्थ झाला होता. ट्रेसीच्या अनुभवानं त्याला जणू काही दिवास्वप्नातून, स्वप्नरंजनातून पोकळ आत्मश्लाघापूर्ण शब्दांवडंबरातून लाथ मारून जागं केलं होतं. त्याला दुबळेपणाची जाणीव देत देतच त्याच्या पुढील आव्हानांचा अंतर्भेद करून दाखवला होता! मानवी मुक्तीच्या मार्गातील अडथळे किती भयानक असू शकतात आणि तथाकथित श्रेष्ठतम तत्त्वज्ञानं

देखील मुक्तिपर्व आणण्याच्या दृष्टीनं किती कुचकामी ठरू शकतात, याची अंतर्बाह्य ढवळून काढणारी जाणीव दिली होती. शब्दांच्या मागे अनुभूती नसेल म्हणजेच खरीखुरी आत्मप्रचीतीची ताकद नसेल तर ते शब्दच कशी लोढणी बनतात याचा प्रत्यय आज ट्रेसीमुळे त्याला आला होता.

पडल्या पडल्या हे सारे विचार डोक्यात घोळत असताना के.के. चे अंत:चक्षू उघडले. प्रत्येक नवा अनुभव पचविल्याशिवाय पर्याय नाही. ज्ञानाच्या अथांग आणि कार्यप्रसवा प्राप्तीसाठी प्रत्येक नव्या अनुभवाच्या भट्टीत जुनं शब्दज्ञान तावूनसुलाखून घेण्याशिवाय प्रत्यंतर नाही. याच प्रकारे मुक्तीपर्वाच्या दिशेनं एक एक पाऊल पुढे पडू शकेल! कारण अशा अनुभवांच्या दायित्वामुळेच आपण संकुचित व्यक्तित्वातून व्यापक अस्तित्वामध्ये स्थित्यंतरित होतो आणि अखेर आपण व्यक्ती म्हणून संपून केवळ विश्वात्मक अस्तित्वाने शिल्लक राहू शकतो..... स्वत:च्या चिरफाडल्या जाणाऱ्या संकुचित अस्तित्वाला समेष्टीची शक्ती प्राप्त होते आणि आपण साक्षात् सामर्थ्य बनून राहतो!

"ट्रेसी! तू एकटी नाहीस! वेदनेच्या या खोल समुद्रातून प्रचंड उसळीसरशी आपण सारेजण बाहेर येऊ. सारी होळपळणारी, असहाय माणसंही जेव्हा आपल्याबरोबर यातनांच्या गर्तेतून बाहेर येतील तेव्हाच आपलं मन शांत होईल. किंबहुना अशा तऱ्हेनं सतत धडपडत राहणं हेच आपलं खरंखुरं जीवन आहे. "के.के. अचानक निश्चयी स्वरात स्वत:शीच बोलला.....त्याचे डोळे विस्फारले. अंग वजनरहित झालं. साऱ्या घटना जणू काहीं आतूनच निर्माण होऊन पुन्हा आतच लयाला चालल्या होत्या. त्यानं घड्याळ पाहिलं. पाच वाजले होते. तो दार उघडून पोर्चमध्ये आला. त्याच्या अंतर्यामीची पहाट त्याला उगवतीला दिसली. त्याच्या मनात आलं ही पहाट लाखो लोकांच्या हृदयाकाशात फटफटेल यात शंका नाही. थोडा वेळ त्याच मन:स्थितीत बाहेर येरझारा घालून तो आत परत आला.

स्वत:चं आवरून झाल्यावर त्यानं सतीशला उठवलं.

डॉ. सतीश आवरून खाली आला तसा के.के. त्याला त्याच्या डॉर्मिटरीत घेऊन गेला. डॉ.सतीशला पोचवून परत येताना त्याच्या लक्षात आलं की सतीशच्या वागण्यात पुष्कळच फरक पडला होता. तो कालच्या सारखा मोकळा वागत नव्हता. "प्रत्येक मन म्हणजे अत्यंत अथांग अशी

अंधारी गुहा असते हेच खरं. केवळ गुरुत्वाकर्षण बनून, चुंबकीय क्षेत्र बनून, अवकाश बनून आणि काळ बनूनच ह्या असंख्य गुहांचा थांग... या अंधाऱ्या गुहांचं स्वरूप जाणता येईल अन् पालटता येईल...! त्याचे विचार शब्दरूप घेऊन त्याच्या जाणिवेत विसावले.

■

ट्रेसीवरील बलात्काराची हकीकत ऐकल्याला फार दिवस लोटले नव्हते. मनातलं वादळ आणि त्या वादळाचा जोर कमी झाला नव्हता. जीवनाचं सार्थक करण्याची ओढ ढिली झाली नव्हती. अमेरिकेतल्या ह्या समस्या आणि भारतातले भूकबळी, हुंडाबळी यांची तुलना थंडावली नव्हती. अमेरिकेतील व्यसनाधीनता आणि भारतातील विषारी दारूचे बळी यांची सांगड घालण्याची धडपड मनात अखंड चालू होती. अमेरिकेतील अण्वस्त्रनिर्मिती आणि भारतातील बेसुमार जंगलतोड यांनी मन खवळत होतं.



अमेरिकेतील कुटुंब संस्थेची तोडमोड आणि भारतातील रस्त्यावरची बेवारशी पोरं यांच्या समस्यांशी मेंदू झुंजत होता.

के.के. चं अस्तित्व म्हणजे एक महासागरच बनत चालला होता. दैवी आणि दानवी प्रवृत्तींचं मंथन चाललंच होतं. त्यातून तयार होणारं हलाहल आणि अमृत आणि त्यांचे परिणाम यांच्यावर त्याचं नियंत्रण नव्हतं.

विचारांच्या वावटळीवर आरूढ व्हायला निघालेलं त्याचं जीवन वेगवेगळे टप्पे पार करत धडाडत्या वेगानं पुढे सरकत होतं. सोमनिलयम ते चार्लस्टन हा प्रवास असा धबधब्याप्रमाणे चालला होता.

पण तशातही के.के. समतोल विचार करण्याचा आणि अचूक कृती करण्याचा आटोकाट प्रयत्न करीत होता.

आज दोघा सिनेटर्सना घेऊन तो कॉलनी हाऊसमध्ये शिरला तेव्हा त्याला बराच उशीर झाला होता. परंतु फ्रँकलीनला पूर्वकल्पना असल्यामुळे आणि कामाबाबत फोनवरून तपशीलवार सर्व सूचना दिलेल्या असल्यामुळे महत्त्वाचं काही अडून राहिलं नव्हतं.

तरीही सिनेटर्सना स्पेशल डायनिंगमध्ये बसवून उरलेलं सारं रांगेला लावायला तो किचनमध्ये जाऊन आला.

त्या दोन्ही सिनेटर्सना भारताबद्दल पुष्कळ आस्था होती. त्यामुळे ते के.के. कडे येत. गप्पा,विश्रांती, भारतीय जेवण सारं काही मनाप्रमाणे होई. के.के. कडे येण्यात विशेष आनंद वाटायचा तो त्याच्याबरोबर त्यांना उत्तम संवाद साधता यायचा म्हणून. त्याच्याशी बोलताना इंडियाबद्दल मनमोकळेपणानं बोलता येत असे. शिवाय त्यांची अशी खात्री होती की के.के. ला त्याच्या अफाट अनुभवामुळे आणि चिंतन-वाचनामुळे वस्तुनिष्ठ वृत्ती व दृष्टी होती व तिचा त्यांना भारताबद्दलची मतं ठरवण्यात आणि भूमिका घेण्यात अतिशय उपयोग पडेल.

किचनमधून आलेल्या के.के. नं, दोघाही सन्मान्य मित्रांना सूप घ्यायची विनंती केली आणि त्यांची औपचारिक माफी मागून आताच पीटरनं त्याच्याकडे दिलेलं कामिनीचं पत्र वाचायला सुरुवात केली.

पत्र वाचताना के.के. च्या चेहऱ्यावर होणारे फेरफार पाहून त्याच्या सिनेटर दोस्तांची बरीच करमणूक झाली. हलक्या आवाजात बोलत ते सूप पीत होते आणि के.के.च्या हावभावांमागे काय लपलं असेल, याचा वेध घेत

होते... पत्र वाचून झाल्यावरही के.के. दोन-चार मिनिटं काहीच बोलला नव्हता!

कामिनीचं पत्र वाचून झालं तसे के.के.नं डोळे मिटले....अन् गप्प राहिला. त्याच्या डोळ्यांपुढे कामिनीची शालीन मूर्ती उभी होती! उभयतांच्या लग्नाच्या वेळचं रूप त्याच्या नजरेसमोर उभं राहिलं. कामिनीच्या डोळ्यांतली सोज्वळता आणि निष्कपट भाव त्याच्या अंत:करणाला विलक्षण ओढ लावत. त्यावेळची कामिनीची नजर म्हणजे आजवरच्या उत्कट अनुभवातला एक अत्युत्कट अनुभव होता. हृदयात जपून ठेवलेल्या त्या अमूल्य ठेव्याची त्याला तिच्या पत्रानं पुनर्प्रचीती आली! तो मोहरून गेला. तिच्या नजरेत कमालीची तृप्ती आणि समाधान जसं होतं तशीच तिच्या त्या गहिऱ्या डोळ्यात अनंताची अवीट आसही होती! तिच्या डोळ्यात आपुलकी होती, गोडवा होता अन् पुरुषार्थाला दिलेलं सुसंस्कृत आव्हानही होत. करुणा होती तसा लाघवीपणाही होता. त्यांच्या विवाहाच्या वेळी उभयतांची नजरानजर झाली तेव्हा स्वत:ला नकळत तो अनिमिष नेत्रांनी तिच्याकडे पुन्हा पुन्हा पाहत राहिला होता. त्याचा पुरुषी अहंकार गळून पडून तो जणू काही तिच्यामध्ये विरघळून गेला होता. या क्षणी के. के. त्या साऱ्या कहाणीत हरवला. इंग्लंडमधील वास्तव्याच्या शेवटाला आलेल्या त्या खास प्रपोजलची त्याला आठवण झाली. एरवी असलं पत्र त्यानं कचऱ्याच्या टोपलीत टाकलं असतं. कारण लग्न,प्रपंच वगैरेबद्दल त्यानं तोपर्यंत विचार केला नव्हता. परंतु योगायोग म्हणजे त्याला प्रपोज करण्यात आलेली मुलगी म्हणजे दुसरी तिसरी कुणी नसून त्याची शाळेतली मैत्रीण कामिनी रेड्डीच होती! तिचा फोटो इतक्या अनपेक्षितपणे दृष्टीला पडल्यामुळे त्याला आश्चर्याचा अत्यंत सुखद धक्का बसला होता! शाळेतील टीन एज मैत्रीचे ते मंतरलेले क्षण डोळ्यांपुढे उभे राहिले होते. अंतर्बाह्य मोहरून टाकणाऱ्या तिच्या भेटीची सुप्त स्मृती अचानक ताजी झाली होती! शाळेच्या गॅदरिंगच्या वेळी कामिनीशी त्याची पहिली भेट झाली होती. किती विलक्षण योगायोग होता तो! ऐनवेळी प्रॉम्प्टर न आल्यामुळे प्रॉम्प्टर म्हणून नाटकाला संवाद सांगण्यासाठी नाटकाच्या विंगेत तो उभा होता आणि स्टेजवरून आत येणाऱ्या कामिनीशी अचानक त्याची दृष्टिभेट झाली होती! नाटकाचा एक एक अंक संपत गेला तसं त्या उभयतांच्या भावजीवनातलं अवीट नाट्य साकार होत गेलं होतं! नाटक

संपलं, गॅदरिंग संपलं पण त्या दोघांच्या भेटीगाठीतून मधुर जीवनसंगीताची अनोखी महफिल रंगू लागली. हृदयस्पंदांच्या लयी जुळत होत्या. ताल मिळत होते, आणि अंत:करणं उत्कट प्रेमानं ओसांडून जात होती. उभयतांचा प्रत्येक क्षण परस्परांच्या ओढीनं आणि विचारानं सुगंधित झाला होता!

पण त्या वसंताच्या मधुर क्षणांना ग्रीष्माची आंच लागली! त्या गुलाबी दिवसांना ग्रहण लागलं! प्रेमाची ती नाजुक वेल कोमजली, सुकली!

खरं म्हणजे सीनियर केम्ब्रिज पास होऊन केटरिंग कॉलेजला गेल्यानंतर त्यानं तिला पुष्कळ पत्रं लिहिली होती. बॅडमिंटन, ट्रेकिंग, स्विमिंग,कॅम्पिंग अशा अनेकानेक प्रसंगात अनुभवलेला तिचा गोड सहवास त्याला विसरता येणं शक्य नव्हतं. ती त्याच्या रोमारोमात भिनली होती. तिच्या स्पर्शाच्या आठवणीनं तो हृदयाची धडधड अनुभवायचा, तसा तिच्याबरोबरच्या प्रत्येक क्षणाच्या स्मरणानं तो उत्तेजित व्हायचा. पण...शेवटपर्यंत त्याला तिच्याकडून प्रतिसाद मिळाला नाही! संगमामध्ये मिसळलेल्या नद्या पुन्हा पूर्णपणे वेगळ्या झाल्या होत्या...

पण तिच्या प्रपोजलनं अनपेक्षितपणे या नद्यांचा परत संगम झाला होता. प्रेमाच्या वेलीला बहर आला होता. जीवनप्रवाहाचा उगमच जणू पुन:प्रत्ययाला आला होता. कामिनी हा त्याच्या अस्तित्वाचा चैतन्यदायी गाभा त्याला परत गवसला होता. तेवढ्यापुरती कटुता बाजूला ठेवून सर्वांच्या उपस्थितीत त्याच्या विवाहाचा समारंभ यथासांग पार पडला होता. इंग्लंडला त्यांनी उभयतांनी जो काळ व्यतीत केला तो पुन्हा एकदा दोघांचंही जीवन पल्लवित करणारा अत्यंत आनंदाचा काळ होता. त्यानं मुद्दामच तिला कधीही संबंध तोडण्यामागचं कारण विचारलं नव्हतं... तिला तसूभरही दु:ख होईल असं सारंच त्यानं टाळलं होतं. पण हे सुख फार काळ टिकलं नव्हतं. जेमतेम सात-आठ महिन्यात एकामागून एक अपघातांना सुरुवात झाली. प्रथम कामिनीचे वडील आजारी पडले. कॅन्सर डिटेक्ट झाला. कामिनीला भारतात परतावं लागलं. त्याच दरम्यान नान्नगारूंना हृदयविकाराचा झटका आल्यामुळे कामिनीला सोमनिलयममध्ये राहणं लांबलं. केशवेंद्राच्या निधनामुळे सोमनिलयम लगेच सोडता येईना. मग प्रसूतीची तारीख जवळ आली. नंतर प्रसूती. मधूचा जन्म.....एकूण ताटातूट एके ताटातूट! यात भर म्हणूनच की काय एरवी दुरावा होता तरी ताताना आणि अम्माला त्या दोघींचा लळा

लागला. अन् त्यांनी आर्जवानं त्या दोघींना तिथे राहण्याचा आग्रह केला होता. कामिनी आणि त्यानं मग विशेषत: तातांच्या सुखासाठी हेही अग्निदिव्य पार करणं पत्करलं होतं. शिवाय काही दिवसांनी सारं बदलेल अशी आशाही होती. पण काळ ह्यातल्या कोणत्याही भावनेनं लिप्त न होता पुढे सरकत राहिला होता!

जीवन एक न संपणारी होरपळ बनलं होतं. एक न संपणारी यातायात आणि न सुटणारं कोडं बनलं होतं.

या घडीला ताता, अम्मा, कामिनी मधू एकीकडे तर तो होता त्यांच्यापासून दूर इथे, चार्लस्टनमध्ये. मनाची घालमेल होती. स्वत:शी प्रामाणिक राहण्याची अपरिहार्य फलश्रुती म्हणून... स्वत:ला सावरण्याचा प्रयत्न करत, आलेला क्षण तो जगत होता. ना सुखी ना दु:खी, ना यशस्वी ना अयशस्वी, ना संन्यस्थ, ना संसारी, ना स्वत:च्या व्यवसायात रमत ना व्यवसायाशी प्रतारणा करीत. ना मुक्त ना बध्द!

कामिनीच्या पत्रामध्ये असं काय होतं ज्यामुळे के. के. एवढा अंतर्मुख झाला? प्रथमच कामिनीनं तिच्या अज्ञात पैलूंबद्दल लिहिलं होतं. तिची आणि त्याची शालेय जीवनात ताटातूट झाली तिचं कारण तिनं लिहिलं होतं. एका ख्रिश्चन धर्मोपदेशकाच्या संपर्कात आल्यानंतर तिनं संपूर्ण आयुष्यभर अविवाहित राहून समाजसेवा करण्याचा निश्चय केल्यामुळे तिनं मोठ्या कष्टानं, जड अंत:करणाने त्याचा विचार मनातून काढून टाकला होता. एवढ्या वर्षानंतर तिनं केलेला रहस्यभेद त्याच्या सर्व धारणा, त्याच्या कल्पना ढवळून टाकणारा होता! पुढे तिनं त्याच्या पत्राला अनुलक्षून सोमनिलयमची सारी हकीकत कळवली होती.

ज्या अंतरात्म्याचा कौल मानून तिनं नन् बनायचा निश्चय केला व वैयक्तिक जीवनाची स्वप्नं स्वत:च फटकारली त्याच अंतरात्म्याचा कौल त्यानं मानल्यामुळे तो आज इतरांसह होरपळत होता ... आणि ज्या प्रामाणिकतेनं जीवन जगताना उभयतांची पुनर्भेट झाली त्याच प्रामाणिकपणामुळे आताही सर्वांची भेट होईल ... असा निर्विवाद युक्तिवाद तिनं मांडला होता. तिच्या पत्रानं एकाच वेळी त्याची आंतरिक शक्ती आणि प्रामाणिकता गौरविली होती, जागृत केली होती आणि त्याचबरोबर नव्या क्षितिजांची चाहूल मार्मिकपणे

त्याच्या नजरेस आणली होती, त्याच्याच हृदयातले अनेक बंदिस्त कप्पे तिनं हळुवारपणे उघडून त्याला दाखवले होते. इंग्लंडमध्ये तिच्या प्रपोजलनं जसा त्याच्या अस्तित्वाचा हरवलेला भाग त्याला परत मिळवून दिला तद्वतच पण वेगळ्याच उंचीवर तिच्या पत्रानं त्याला दृष्टीची नवी परिमाणं दिली होती.

के. के. नं डोळे उघडले!

■

गुपचूप जेवत बसलेल्या पाहुण्यांची आणि मित्रांची त्यानं माफी मागितली आणि त्यांच्याबरोबर जेवायला सुरुवात केली. गप्पा मारता मारता तिघांचं जेवण चाललं होतं. अमेरिका-भारत संबंध, अमेरिका-सोव्हिएट युनियन संबंध, गुन्हेगारी अशा अनेक विषयांवर गप्पा चालल्या होत्या.

के. के. नं अमेरिकेचा कम्युनिझम विरोध आणि सोव्हिएट युनियनमधील ठोकळेबाज व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी करणारा समाजवाद दोहोंवर ताशेरे झोडले होते. अमेरिकेतील त्याच्या मते कंझ्युमरिझम म्हणजेच भोगवादाचा समाचार घेताना कृत्रिमपणे दहशतीने व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा व आवडीनिवडीचा संकोच करणारी समाजवादी चळवळदेखील कशी ठिसूळ पायावर उभी असल्यामुळे तपशिलाच्या संदर्भात असफल होणार आहे हे त्यानं निर्भीडपणानं सांगितलं होतं. संपूर्ण मानवी इतिहासातील उत्तम ते घेणं आणि त्याचा सर्वत्र आविष्कार करणं हे मानव कल्याणासाठी अत्यावश्यक असल्याचं सांगून त्यानं त्यासाठी मन आणि बुध्दी विशाल होण्यातील अनन्यसाधारण महत्त्व त्यांच्यासमोर मांडलं होतं. आत्मज्ञानामार्ग विश्वकल्याणाचा मार्ग असल्याचं सांगितलं होतं.

त्याच्या मित्रांनी त्याचं म्हणणं ऐकून घेतलं खरं पण ते स्वप्नरंजनच वाटलं. त्यांनी तसं त्याला स्पष्ट सांगितलंदेखील. शिवाय आत्मज्ञानाचा आग्रह म्हणजे मागच्या दारानं हिंदू धर्माचाच जागतिक प्रभाव वाढवण्याचा प्रकार आहे असंही मत मांडलं.

के. के. ला जाणवलं की अजूनही त्याचे शब्द लुळेच होते. 'कालाय तस्मै नम:' तो स्वत:शीच पुटपुटला.

त्याचं जेवण संपायला आलं. एवढ्यात अचानक धाड्-धाड्-धाड्... गोळीबारासारखा आवाज आला. गोळीबार! ... कोण आहे? कोण करतोय? काय झालं? ... भीती आणि दहशत यांनी अचानक गोंधळ माजला. सर्वजण

हादरले. वातावरणात कोलाहल माजू नये म्हणून के. के. तात्काळ उठला आणि सर्वांना ते होते तिथेच बसून शांत राहण्याचं आवाहन करून वायुवेगानं आवाजाच्या दिशेनं धावला. त्याच्या मागोमाग रोझी, फ्रँकलीन आणि त्याचे मित्रही धावले. बुलेटप्रुफ काचेच्या भल्यामोठ्या दरवाजातून त्यांना बाहेर असलेली दहाबारा मवाल्यांची आणि चटोर तरुणींची टोळी दिसली. त्या टोळीच्या मध्यभागी एक तरुणी रक्ताच्या थारोळ्यात पडली होती आणि तिच्या बाजूला हातात पिस्तूल घेतलेला एक मवाली उभा होता!

दुसऱ्याच क्षणी के. के. बाहेर पडणार एवढ्यात फ्रँकलीननं त्याच्या दंडाला धरून त्याला मागे खेचलं व ओरडला,''शेफ! डोंट गो... प्लीज, आत्ता जाऊ नकोस.''

''होय... दे आर गँगस्टर्स ... मोबाइक गँगस्टर्स ... दे वुईल किल यू..., दे आर क्रुएल.''

रोझी आणि त्याचे मित्रही ओरडले.

भूकंपामुळे प्रचंड वडाचं झाड गदगदा हलावं तसा फ्रँकलीन थरथरत होता. त्याच्या तोंडून शब्द फुटत नव्हता. मोठ्या मुश्किलीनं तो म्हणाला,''इव्हन पोलिसदेखील हेल्पलेस असतात त्यांच्यापुढे.''

फ्रँकलीनसारख्या भीमकाय माणसाची बोबडी वळलेली पाहून आणि इतरांचा तो ओरडा ऐकून के. के. घाबरण्याऐवजी एकदम चिडला. ''डोंट स्टॉप मी! धीस इज अ मुमेंट टू ॲक्ट!'' म्हणून झपकन हिसका देऊन स्वत:चा दंड फ्रँकलीनच्या राकट पंजातून त्यानं सोडवून घेतला अन् नजरेचं पातं लवण्याचा आतच तो तीरासारखा बाहेर धावला.

त्याला बघताच मवाल्यांच्या टोळीतल्या एकानं रिव्हॉल्व्हरला हात घातला... पण पुढे काय घडतंय हे कळायच्या आतच के. के. च्या रिव्हॉल्व्हरमधून विद्युतगतीनं सुटलेल्या गोळ्यांनी तीन-चार जणांना रक्तबंबाळ केलं! इतरांना क्रॅक्ड कोकेनच्या अंमलामुळे स्वत:चाच तोल सांभाळणं कठीण झालं होतं! लगेच पुढे धावत जाऊन त्यानं त्या मवाल्यांना तुडवून काढलं आणि त्यांची शस्त्र काढून घेऊन फ्रँकलीनला हाक मारली. त्या मवाल्यांची दशा बघून धीर आलेला फ्रँकलीनही धावला. त्याच्याकडे शस्त्र देत त्यानं त्या तरुणीला उचललं आणि रेस्टॉरंटमध्ये आणून रोझीला लगेच

पोलिसांना व ॲम्ब्युलन्सला फोन करायला सांगितलं.

हळूहळू सारा गोंधळ संपला. रेस्टॉरंटमधल्या ज्याच्या-त्याच्या तोंडी दिवसभर तोच विषय होता. जो तो के. के. चं कौतुक करीत होता. पण काहीजणांचं म्हणणं असं होतं की त्यानं तसं मॅड ॲडव्हेंचर - वेडं साहस करायला नको होतं व यापुढे करू नये. नंतर कामाच्या व्यापात दिवस सरला. रात्रीचे अकरा वाजले. दिवसभरातल्या घटनांनी के. के. ला थोडाफार थकवा जाणवत होता, पण त्या जखमी तरुणीला वाचवण्याचं समाधान खूप होतं!

तो बाहेर पडला.

■

गाडीत बसताना के. के. च्या मनात आलं, उद्या रेव्हरंड बेट्झकडे जायचं आहे. आपल्याला भगवद्‌गीतेवरील चर्चेत भाग घ्यायचा आहे. गीतेवरील प्रश्नांना उत्तरं द्यायची आहेत.

त्याच्या मनात आलं, गीतेचा अर्थ किती सरळ आहे! स्वत:मधल्या आणि समाजातील अधोगामी वृत्तीशी लढा, त्रुटींविरुध्द लढा, दोषांविरुध्द लढा, संकुचितपणाविरुध्द लढा, दुबळेपणाविरुध्द लढा. त्यातूनच काळातीत अशा स्वत:च्या खऱ्याखुऱ्या आणि विशाल अस्तित्वाची प्रचीती येते. दुसऱ्याच क्षणी त्याला हेही जाणवलं, की देश-काल- परिस्थितीप्रमाणे संदर्भ बदलले की सोपी उत्तरंदेखील दुर्बोध बनतात! शिवाय गीतेमधील चातुर्वण्य, स्वधर्म, कर्मफलत्याग, जन्ममृत्यूचा फेरा व त्याच्यापासून मुक्ती वगैरे संकल्पना आणि त्यांचे वेगवेगळे अन्वयार्थ यामुळे खूपच गोंधळ माजलेला आहे. वास्तविक जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून सुटका म्हणजे देहबुध्दीपासून, अज्ञानातून, माया व अविद्येपासून सुटका... परंतु हे समजायला अशक्य आहे कारण ते फक्त प्रचीतीला येऊ शकतं. आकलनात नाही!

उद्याच्या चर्चेमध्ये एक स्पष्ट सांगायचं त्यानं ठरवून टाकलं. गीता सार म्हणजे मनाच्या स्थित्यंतराची अवस्था. संकुचितपणाचे विशालपणात परिवर्तन. दृष्टी, विचार, भावना, वासना अधिकाधिक कल्याणकारी बनणं हेच गीतेचं सार! शारीरिक, मानसिक, बौद्धिक, आर्थिक आणि सामाजिक कार्य अधिकाधिक कल्याणकारी बनणं हेच गीतेचं सार! अन्य सारा तपशिलाचा भाग कालसापेक्ष आहे. गीतेचं सार विश्वाला मार्गदर्शक आहे. पण तिच्यातील प्रत्येक शब्दाचा आग्रह आणि अभिनिवेश मात्र योग्य नव्हे.

किंबहुना धर्मसंप्रदाय, वंश, विचार आणि वैयक्तिक संकुचित स्वार्थाची चाकोरी विरघळलेल तशी नवी विविधतापूर्ण अन् अभिनिवेशशून्य विश्वसंस्कृती साकार होईल, बहराला येईल हेच गीतेचं गुह्य आहे!

त्याचवेळी के. के. ला जाणवलं की जे जे काही घडत होतं त्याचा वैयक्तिक व संकुचित दृष्टीनं जेवढा म्हणून अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करावा तेवढं तेवढं मनावरच ओझं वाढत जातं. ज्या क्षणी स्वत:च्या संकुचित अस्तित्वातील व्यर्थ्य उमगतं त्या क्षणी प्रगाढ शांती मिळते. प्रत्येक मानवमात्राच्या वैयक्तिक अस्तित्वाच्या मुळाशी असलेल्या ऊर्जास्रोताची प्रत्यक्ष प्रचीती येते. वैश्विक बंधुभावाचा रोम अन् रोम उजळून टाकणारा अनुभव येतो. निर्भयता व सामर्थ्यानं अस्तित्व भरून राहतं! सूर्यपान करता करता माणूस सूर्यमय बनतो!

ब्लॉझम अपार्टमेंट येताच नित्याच्या सवयीनं गाडीचा वेग कमी करून त्यानं गाडी वळवली. दरवाजा उघडून तो आत आला तोच फोन वाजला. त्यानं फोन घेतला. "हॅलो" त्यानं मोठ्या अदबीनं म्हटलं.

"यू बास्टर्ड... सन् ऑफ बीच..." समोरचा माणूस हीनतम शिव्यांचा वर्षाव करत होता. ..." तुला ठार मारू आम्ही कुत्र्या"

के. के. त्या अनपेक्षित शिवराळपणानं नक्कीच हादरला. पण क्षणभरातच दुसऱ्याच क्षणी,

"डू व्हॉट यू वॉंट, कम ऑन किल मी - काय वाटेल ते कर - ये मला ठार मार." म्हणून त्यानं फोन ठेवला. मग त्यानं फोन करून सदर धमकीची पोलिसांना हकीकत कळवली. त्याचप्रमाणे दुपारी जी झटापट झाली त्या टोळीचे साथीदारच ही धमकी देत असणार हा अंदाजही सांगितला. पण एवढं सगळं झालं आणि पोलिसांकडे असलेल्या टोळ्यांची रेकॉर्डस् असली तरी माफियाचा दरारा व प्रभाव पाहता पुढे काय होईल याचा भरंवसा नव्हता.

पण के. के. ला हा सारा धोका अनपेक्षित नसल्यामुळे येणाऱ्या प्रसंगाला तोंड देण्याची त्याची तयारी होती.

त्यानं मग कपडे बदलले आणि विष्णुसहस्रनाम म्हणत तो बाल्कनीत येऊन बसला. हल्ली तो झोपण्यापूर्वी विष्णुसहस्रनाम म्हणू लागला होता.

विष्णुसहस्रनाम म्हणून झाल्यावर तो आत आला आणि टी.व्ही. लावून बसला. सी. एन्. एन्. न्यूज चॅनेलवर काही वेळ बातम्या

बघितल्यानंतर त्याच्या लक्षात आलं की सुष्ट आणि दुष्ट यांची विभागणी अगदी काटेकोरपणाने करणं कठीण झाल्यामुळे पुष्कळदा सुष्टच सुष्टाला मारतो! त्यामुळे ''संकुचिततेतून विशालतेकडे'', हे तत्त्व ''असतो मा सद्गमय, तमसो मा ज्योतिर्गमय, मृत्योर्माडमृतं गमय'' या तीनही तत्त्वांप्रमाणेच महत्त्वाचं पण समजायला सोप आहे. ते प्रचलित करायला हवं.

■

रेव्हरंड बेट्झनी कॉफीपात्र टी-पॉयवर ठेवता ठेवता समोर पाहिलं. डॉ. टेलर नेहमीप्रमाणे झपझप चालत आत येत होते. रेव्हरंड बेट्झकडे पाहून त्यांनी नेहमीचं परिचयाचं हास्य करून त्यांना विश केलं.

रेव्हरंड बेट्झनीही डॉ. टेलरना आपादमस्तक न्याहाळून स्मितहास्य केलं आणि डॉ. टेलरचं स्वागत केलं. कुणालाही भेटल्यानंतर आपादमस्तक न्याहाळण्याची रेव्हरंड बेट्झची सवय होती. या त्यांच्या खास लकबीद्वारे समोरच्या व्यक्तीला ते जणू गुंडाळून खिशात घालत! कच्चे बच्चे लोक यामुळे सहज त्यांच्या प्रभावाखाली येतच. पण विद्वानमंडळीही या लकबीमुळे



त्यांच्यासमोर दबून राहत. धर्मोपदेशक असलेले रेव्हरंड बेट्झ् बहुश्रुत, विद्वान आणि जगभर फिरलेले होतेच, पण त्यांच्या वागण्यात एक प्रकारचा छद्मीपणा होता. स्वत:ला उच्च पातळीवर ठेवण्याची त्यांच्या पेशाला गरजही वाटल्यामुळे ही लकब त्यांनी आत्मसात केली असावी.

डॉ. टेलरांबरोबर थोडसं टक्कल पडलेला एक सडपातळ तरुण होता. एशियन वैशिष्ट्य असलेला तो तरुण कोण असावा याबद्दल रेव्हरंड बेट्झ्ना अंदाज बांधावा लागला नाही. कारण त्यापूर्वीच डॉ. टेलरनी त्याच्याशी त्यांची ओळख करून दिली.

" हा माझा रिसर्च असोसिएट, डॉ. सतीश देसाई. दिल्लीहून आला आहे."

"हाय! हाऊ डू यू डू? प्लिझ्ड् टू हॅव यू हिअर - या या तुम्हाला इथं पाहून आनंद झाला" म्हणत रेव्हरंड बेट्झ्नी डॉ. सतीशशी शेकहँड केला.

"प्लिझ्ड् टू मीट यू" म्हणून बुजरेपणानं हसत सतीशनं प्रतिसाद दिला.

एवढ्यात आणखी पाहुणे आलेले पाहून रेव्हरंड बेट्झ् "एक्स्क्यूज मी" म्हणून दरवाजाकडे वळले.

"हे रेव्हरंड बेट्झ् ... अतिशय हुशार आणि उदारमतवादी आहेत. त्यांच्यामध्ये धार्मिक सहिष्णुता आहे. कडवेपणा नाही. दर रविवारी ते अनौपचारिक बैठक भरवतात. बैठकीचा हेतू वेगवेगळ्या धर्मांमध्ये अंडरस्टँडिंग आणि जिव्हाळा वाढवणं आणि गैरसमज दूर करणं हा असतो. बैठकांमधून अगदी मनमोकळी चर्चा होते, हे विशेष!" डॉ. टेलरनी सतीशकडे पाहून भुंवया उंचावत डॉ. बेट्झ्ची प्रशंसा केली.

"माणूस तरुण आहे..." काहीतरी बोलायचं म्हणून सतीश त्यांच्या जाड भुवयांकडे पाहत म्हणाला. "हो! असेल चाळिशीचा... माझ्या मानानं नक्कीच तरुण!" पिकलेल्या केसांतून डोकावणाऱ्या स्वत:च्या गोऱ्या तुकतुकीत टकलावरून हात फिरवीत डॉ. टेलर हसून उद्गारले.

त्यांच्या जाड केसाळ भुंवया आणि काहीसे पुढे आलेले वाकडेतिकडे दात पाहून डॉ. सतीशची नेहमीसारखी करमणूक झाली. पण त्यानं चेहऱ्यावर तसे भाव उमटू दिले नाहीत.

"रेव्हरंड बेट्झ्नी सूर्यशक्तीचा वापर करून मोठ्ठंच नावीन्य दाखवलंय." मंदगतीने फिरणाऱ्या काळ्या रंगाच्या सीलिंग फॅनकडे निर्देश करून डॉ. टेलर म्हणाले,

"डॉ. टेलर, तुम्ही फारच गुणग्राहक आहात..." त्यांनी केलेली के. के. ची ही अशीच अवास्तव स्तुती त्याला आठवली, तो नकळत बोलून गेला. डॉ. टेलरांच्या कपाळाला सूक्ष्म आठी पडली. पण ते काही बोलणार एवढ्यात "प्लिज हेल्प युवरसेल्वज् लेडीज् ॲण्ड जेंटलमेन," म्हणून रेव्हरंड बेट्झ्नी कॉफीच्या किटलीतून स्वत:साठी एका कपात काळी कॉफी ओतली. डॉ. सतीशनं स्वत:साठी आईस कोल्ड टी ओतला. डॉ. टेलरच्या ते लक्षात येताच त्यांनी म्हटलं, "इंडियामध्ये तुम्ही चहात क्रीम आणि साखर घालून चहा पिता ना? अन् तो ही गरमागरम?"

सतीशला क्षणभर दूध आणि साखर घालायचा मोह झाला. पण... तेवढ्यात डॉ. बेट्झ्ही म्हणाले,"ओ या, गरम चहा मिळेल ना! मायक्रोवेव्हमध्ये लगेच गरम होईल."

पण सतीश बावरला, "नो, नो आता सवय होतेय मला..." म्हणून त्यानं काळ्या कुळकुळीत गार गार चहाचा कप तोंडाला लावला. त्याच्या मनातून मात्र ढाब्यामधल्या गरमागरम दुधाळ आणि मसालेदार चहाची आणि या चहाची तुलना झालीच!

स्वत:ची ही परिस्थितीशी जुळवून घेण्याची सवय! गरिबीमुळे अंगवळणी पडलेला हा बिनशर्त ॲडजेस्ट व्हायचा स्वभाव.

तो चरफडला. तो काळा चहा घशाखाली जाताना सौम्य मळमळ दाबून टाकून वरकरणी काहीच न दाखवता सतीश बाजूच्या सोफ्यावर बसला.

त्या भव्य दिवाणखान्यामध्ये इराणी पध्दतीचा नक्षीदार मऊ गालिचा अंथरलेला होता. दिवाणखान्याला भल्यामोठ्या खिडक्या होत्या. पण त्यांची काचांची तावदानं बंद केलेली होती. आता त्याच्या ध्यानात आलं की ती संपूर्ण खोली एअरकंडिशंड आहे. एव्हाना बरेच पाहुणे जमा झाले होते. विविध देशीचे, विविध धर्माचे आणि विविध वंशाचे. तेही चहा, कॉफी, कोक वगैरे हातात जागा मिळेल तिथे घेऊन बसून घेत होते. बहुतेक सर्व बसले तसे रेव्हरंड बेट्झ् दिवाणखान्याच्या एका कोपऱ्यात उभे राहिले. हातात गीतेचं इंग्रजी भाषांतर घेऊन त्यानी प्रास्ताविक करायला सुरुवात केली तसे श्रोते

एकदम शांत होऊन ऐकू लागले.

मध्येच थांबून सतीशकडे पाहत रेव्हरंड बेट्झ्नी विचारलं, ''डॉक, आर यू हिंदू?'' त्या अकस्मात आलेल्या प्रश्नानं सतीश गांगरला. आपण काय सांगावं? मी सेक्युलर आहे म्हणून? की नास्तिक आहे म्हणून...? की सर्व धर्मांचा सन्मान करतो म्हणून? हिंदू आहे म्हटलं तर आपण एकटे पडू असंही त्याला वाटून गेलं. पण मग चाचरत तो बोलून गेला, ''येस, मी हिंदू आहे... पण...''

''फाईन, मग माझं काही चुकलं तर प्लीज मला करेक्ट कर...'' रेव्हरंड बेट्झ्मध्येच त्याला तोडत म्हणाले.

''मोठ्ठाच मानभावी आहे हा रेव्हरंड,'' सतीश स्वत:शीच पुटपुटला. तेवढ्यात दरवाजातून आत शिरणाऱ्या के. के. कडे त्याचं लक्ष गेलं. त्या दोघांची दृष्टादृष्ट होताच के.के. नं रूबाबदारपणे हसून नंतर सर्वांवर नजर फिरवली आणि सर्वांना उद्देशून उशीर झाल्याबद्दल सर्वांची माफी मागितली.

''हाय, के.के. कम ऑन यू आर नॉट व्हेरी लेट'' म्हणून रेव्हरंड बेट्झनी के.के. ला प्रास्ताविक करण्याबद्दल विनंती केली. सतीशच्या आता लक्षात आलं की कोपऱ्यातला तो मोठा कोच खास के.के. साठी ठेवलेला होता.

डुलत डुलत जाऊन के.के. उजवा पाय डाव्या मांडीवर घेऊन ऐटीत त्या कोचावर बसला. त्याचा काळासावळा रंग, कुरळे केस, काहीसं बेढब पोट, त्याचा तो मोठ्ठ्या डिझाइनचा भडक शर्ट, पायातल्या कोल्हापुरी चपला, मिशीवर तर्जनी फिरवण्याचा त्याचा चाळा सारं काही एकदम डोळ्यात भरणारं होतं. रेव्हरंड बेट्झ्नी त्याचं जे स्वागत केलं ते लक्षात घेता के.के.नं तिथे स्वत:चं एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केलं होतं हे सतीशच्या लक्षात आलं. सतीशने इकडेतिकडे नजर फिरवली, बहुतेकांच्या डोळ्यात के.के.बद्दल आदरयुक्त कुतूहल दिसत होतं.

के.के. नं रेव्हरंड बेट्झ्चे आणि श्रोत्यांचे, ही संधी दिल्याबद्दल आभार मानून भगवद्गीतेवर प्रास्ताविक केलं आणि त्यानं निश्चित केलेली आगळीवेगळी स्थितप्रज्ञावस्थेची संकल्पना हीच भगवद्गीतेचा आत्मा असल्याचं निक्षून सांगितलं.

त्याच्या प्रास्ताविकानंतर प्रश्नोत्तरांना सुरुवात झाली. मध्येच,

काहीतरी सुचल्याप्रमाणे डॉ. टेलरंनी विचारलं,''आज जगामध्ये शांततेची गरज असताना अर्जुनाला युध्द करण्याचा आदेश देणाऱ्या गीतेची काय गरज आहे? उलट ती त्याज्यच नाही का? अर्जुनच बरोबर नव्हता का?'' त्या प्रश्नानं के.के.ची चर्या एकदम बदलली. त्याचे डोळे वेगळ्याच तेजानं लकाकू लगले. तात्काळ त्यानं डॉ. टेलरना उद्देशून म्हटलं,''डॉ. टेलर तुम्ही विचारताहात हे? विश्वास बसत नाही! दुसऱ्या महायुध्दात हिटलरविरुध्द लढलेले ते लढवय्ये तुम्हीच का? अहो हिंसा आणि अहिंसा ही मानव जातीचा विनाश आणि प्रगतीच्या संदर्भात पाहायला हवी ना? तटस्थपणे मानवी विनाश पाहत बसणं म्हणजे अहिंसा नव्हे! तो भ्याडपणा आहे डॉ. टेलर! असला भ्याडपणा म्हणजे हिंसेला केलेली अप्रत्यक्ष मदतच! किंबहुना ती हिंसाच होय. गीता म्हणते, संकुचित देहबुध्दीपायी जे कराल त्याला काहीही नाव दिलंत तरी ते अधोगतीला कारणीभूत होतं आणि म्हणून आत्मज्ञानाच्या प्रकाशात निस्पृहपणे वैश्विक कल्याणासाठी जे निर्भयपणानं जे कराल तेच मुक्तीचं साधन ठरेल! अर्जुनाचा प्रश्न, त्याची स्थिती ही देहबुध्दीनं आणि अविद्येनं लिप्त झालेल्या मोहग्रस्तांची प्रातिनिधिक स्थिती होती! विचार करा डॉ. टेलर, एखाद्या न्यायाधीशानं त्याच्या खुनी भावाला फाशी न देण्याचं ठरवलं तर तुम्ही अहिंसक म्हणून त्याचा उदो उदो कराल का? अथवा त्यानं कायद्यानुसार आपल्या भावाला खुनासाठी देहांत शासन फर्मावलं म्हणून त्या न्यायाधीशाची हिंसक म्हणून तुम्ही निर्भर्त्सना कराल का? गीतेमध्ये, व्यक्तीच्या विशालतम, उदात्तम आणि निर्भय जीवनाची सर्वोच्च अवस्था परावाणीने दिग्दर्शित केलेली आहे. गीतेमध्ये मानवाच्या सर्वंकष आणि प्रत्यक्ष स्थित्यंतराची, मुक्तीची प्रचीतीपूर्ण हमी आहे. गीता ही दृष्टी देणारी, दृष्टी उघडणारी महान संजीवनी आहे. स्थळ-काळातीत आणि शब्दातीत, विचारातीत व भावनातीत अशी ती चिद्प्रेरणा आहे. म्हणून विश्वसंस्कृतीच्या उदयाची पूर्वअट म्हणजे इतर आचार, विचार, पूजापध्दती, अभ्यास, प्रयोग वगैरे काहीही केलं तरी अखेर गीतासार आत्मसात करणं हीच आहे!

त्याला तशा प्रकारे अधिकारवाणीनं बोलताना ऐकून डॉ. टेलरही क्षणभर अवाक् झाले. पण इथे प्रश्न सत्य जाणण्याचा होता. प्रत्यक्ष प्रमाणाच्या मागे लागण्यात त्यांचं आयुष्य गेलं होतं. त्यांनीही उलट सवाल केला, ''पण मिस्टर के.के., तुम्ही तर साधे स्वयंपाकी! तुमच्या तोंडी ह्या

शौर्याच्या गप्पा ऐकून शौर्याची तुमची व्याख्याच तर वेगळी नाही ना, असा दाट संशय येतो. आम्ही प्रत्यक्ष प्रमाणावरच विश्वास ठेवणारी माणसं! तुम्ही म्हणता तशा निर्भयी जीवनाची प्रत्यक्षानुभूती जर तुम्हाला असली असती तर तुमच्या साहित्यिक शब्दांमध्ये स्वारस्य वाटलं असतं पण एरवी ... इट्स ऑल होक्स. भोंगळपणा आहे!

डॉ. टेलरचा तो सडेतोड पवित्रा पाहून प्रथमच सतीशला कौतुक वाटलं.

तेवढ्यात बाजूच्या खुर्चीवर बसलेला फ्रँकलीन उभा राहिला.

"एक्स्क्यूज मी, म्हणून त्यानं रांगड्या भाषेत, हातवारे करत डॉ. टेलरना उद्देशून बोलायला सुरुवात केली. आदल्या दिवशी बदमाशांच्या टोळीला एकट्या के.के.नं गारद केल्याच्या प्रसंगाचं रोमांचकारी चित्र त्यानं जसंच्या तसं उभं केलं. बोलताना तो फारच उत्तेजित झालेला दिसत होता. त्याला योग्य शब्दही सुचत नव्हते. त्याचे केसाळ हात आणि धिप्पाड देहच ऐकणाऱ्याचं लक्ष वेधून घेत होता. शेवटी तो म्हणाला, "डॉ. टेलर, बाकी मला के. के. चं म्हणणं फारसं कळत नाही... पण निर्भयतेबद्दल म्हणाल तर मात्र ते बोलण्याचा अधिकार के.के.ला नक्कीच आहे! हजारोंच्या सोबतीने लढणाऱ्या तुमच्यासारख्या सैनिकापेक्षाही!"

डॉ.टेलर स्तंभित झाले! निरुत्तर झाले! प्रत्यक्ष प्रमाण एका झटक्यात त्यांच्यासमोर आलं होतं! खिलाडू वृत्तीनं तात्काळ हार स्वीकारली त्यांनी! इतर सर्वांप्रमाणे त्यांच्याही डोळ्यात आता के.के विषयीचं कौतुक अन् तेही अधिक प्रमाणात चमकलं.

"पण आमच्या धर्मातदेखील कुठे दुसऱ्यावर अन्याय करायचा उपदेश आहे? उलट माफ करा पण तुम्ही हिंदूच अस्पृश्यतेसारखं महापाप करता आणि न्याय-अन्यायावर एवढा काथ्याकूट करता. वैश्विक दृष्टी आणि वसुधैव कुटुंबकम् म्हणताना तुम्ही तुमच्याच देशबांधवांना आणि धर्मबांधवांना पशूपेक्षाही खालचं जिणं जगायला लावता, त्याचं काय? शिवाय ज्या गीतेनं तुमच्या देशात, तुमच्या धर्मात काही इष्ट परिवर्तन घडवलं नाही, अन् तेही हजारो वर्षांत, त्याच गीतेमध्ये वैश्विक कल्याण साधण्याची चिद्प्रेरणा आहे म्हणता यात भयानकच विसंगती नाही का?" रेव्हरंड बेट्झ् आता वादात उतरले.

सतीश चकित झाला. रेव्हरंड बेट्झ्चा तो युक्तिवाद त्याला नि:संशय बिनतोड वाटला. त्यांच्या बोलण्यात निश्चितच तथ्य असल्याचं त्याला जाणवलं. त्याच्याही मते, आध्यात्मिक उंचीची उत्तुंग शिखरं पार केल्याचा दावा करणाऱ्या भारतामधलं वास्तव मात्र त्या दाव्याशी पूर्णपणे विसंगतच होतं.! रेव्हरंड बेट्झ्नी चांगलं वस्त्रहरण केलं आपल्या ढोंगी संस्कृतीचं आणि तिचं प्रतिनिधित्व करणाऱ्या ह्या के.के.चं असं त्याला मनोमन वाटलं. त्याच्या गरिबीला आणि गांजवणुकीला जबाबदार असणाऱ्या संस्कृतीवर आणि ह्या धनाढ्य उपदेशक के.के. वर त्याच्या वतीने रेव्हरंड बेट्झ्नी चांगला आसूड मारल्याचा त्याला मन:स्वी आनंद झाला! के.के. आता खजील होऊन पडतं घेतो की बेताल होऊन, बेभान होऊन रेव्हरंड बेट्झ्चा पाणउतारा करून स्वत:चं हसं करून घेतो याच्याकडे त्याचं लक्ष लागलं!

पण के.के. नं यातलं काहीच केलं नाही!

दिलखुलासपणे हसून के.के उत्तरला, "रेव्हरंड बेट्झ्, तुमचे प्रश्न खरोखरच मार्मिक आहेत. तुमच्या पहिल्या प्रश्नाचं उत्तर असं की सत्य कोण सांगते यापेक्षा ते सत्य आहे की नाही हे महत्त्वाचं असतं. संस्कृतमध्ये एक सुभाषित आहे. "विषादप्यमृतं ग्राह्यम् अमेध्यादपि कांचनम्।। अमित्रादपि सद्वृत्तम् बालादपि सुभाषितम्।।" अर्थात विषापासून अमृत, घाणीतून सोनं, शत्रूपासून सद्वार्ता आणि लहानापासूनही हितोपदेश ग्रहण करणं श्रेयस्कर आहे. आता प्रश्न असा आहे की, तुमच्या म्हणण्याप्रमाणे जे आम्ही आचरणात आणत नाही ते आमचं म्हणणं योग्य असल्याचं कळल्यावर तुम्ही स्वीकारणार की धार्मिक दुरभिमानापायी ते लाथाडून आमच्या वागणुकीवर ताशेरे ओढून स्वत:चा अहंकार चुचकारणार? तुमच्या दुसऱ्या प्रश्नाचं उत्तर असं की, गेल्या पाच हजार वर्षांत गीतेचा परिणाम दिसला नाही तरी तो येत्या पाच-पन्नास वर्षांत दिसणार नाही, असं मुळीच नाही! लाखो वर्षांपूर्वी तयार झालेला ज्वालामुखी असो की करोडो वर्षांपूर्वी तुटलेला एखादा तारा, कोणत्या गोष्टीचा कधी व कसा परिणाम होईल हे त्या गोष्टींच्या अगोदरच्या परिणामावर ठरतंच असं मुळीच नाही! वास्तविक गीतेच्या बाबतीत तुमचा प्रश्न गैरलागू आहे. कारण गीतेचा परिणाम झाला नाही असं म्हणणं हा शुद्ध दिवांधपणा आहे. शंकराचार्य,ज्ञानेश्वर, रामदास,टिळक,गांधी, विवेकानंद सर्वच महात्म्यांना गीता ही मार्गदर्शन करीत आलीय! किंबहुना गीतेमुळेच अजून भारतीय

संस्कृती टिकून आहे व जगाच्या कल्याणासाठी झटते आहे.

दुसरी बाब अशी की अस्पृश्यता भारतात होती तशी गुलामगिरीची प्रथा तुमच्या देशात. सतीची प्रथा भारतात होती तशी वीच हंटिंगची प्रथा तुमच्याकडे. भारतात ज्ञानेश्वरांचा छळ झाला तर पाश्चात्य जगात गॅलिलिओचा. गांधीजी भारतात हुतात्मे झाले तर अब्राहम लिंकन तुमच्या देशात.

परंतु प्रश्न एकमेकांची उणीदुणी काढून अहंकार चुचकारायचा नाही. कटुत्व वाढवण्याचा नाही. प्रश्न समस्या सोडविण्यासाठी अचूक प्रयत्न करण्याचा आहे. संकुचितपणाकडून विशालत्वाकडे जाणं हे त्यासाठी अत्यावश्यक आहे आणि गीतेमध्ये हा संदेश आहे म्हणून गीतेचं सार मी महत्त्वाचं मानतो.

लक्षात ठेवा की भारतातल्या कित्येक विकृतींना परकीयांची आक्रमणे, अत्याचार, जुलूम, बलात्कार, अमानुष लुटमार तोडफोड, विध्वंस, धार्मिक छळ, सक्तीची धर्म परिवर्तनं, इत्यादी जबाबदार आहेत. या आक्रमणापोटीच समाजात भीती आणि दहशत पसरली. रानटी टोळ्यांपासून स्त्रीच्या शीलरक्षणासाठी बालविवाह, बुरखा, सती, केशवपन वगैरे प्रथा पसरल्या. जोहार झाले. ज्ञानाच्या भांडारांची अपरंपार नासधूस करून आक्रमकांनी भारतातील उत्तम म्हणून जे जे काही होतं ते ते सारं नष्ट करायचा सपाटा चालवला....शतकानुशतकं, केलेल्या जाळपोळीमुळे व विध्वंसामुळेच ज्ञानविज्ञानाचा, शिक्षणाचा आणि कारागिरीचा पाया नष्ट झाला. त्यामुळेच अंधश्रद्धा वाढली. भीती आणि दहशत यांच्या शतकानुशतकांच्या रानटी गदारोळात भारतातील संस्कृतीचे लचके तुटले. ती जखमी झाली. तुम्ही ज्या विकृती दाखवत आहात त्या बहुतेक साऱ्या जखमा जगानं दिलेल्या आहेत, हे लक्षात ठेवा. आमची आजची हलाखी आक्रमकांच्या हैदोसामुळे व लुटमारीमुळे झाली.

'आत्मनो मोक्षार्थ जगद्हिताय च।' अर्थात स्वत:चं आणि साऱ्या मानव समाजाचं एकदमच कल्याणं साधणं, ह्या मूलभूत पायावर आधारलेली भारतीय संस्कृती छिन्नविच्छिन्न झाली तरी अजूनही गीता दीपस्तंभासारखी जगाला मार्गदर्शकच आहे.

आई ज्याप्रमाणे मुलांनी छळ केला तरी, त्यांचं कल्याणच करते

ाचप्रमाणे भारतीय संस्कृती, साऱ्या जगानं जरी तिचे लचके तोडले व िच्यावर अनन्वित अत्याचार केले तरी जगत् कल्याणाचाच उद्घोष करतेय.

मनुष्यजीवनाला समेष्टीच्या कल्याणाचं परिमाण दिलं की अण्वस्त्रनिर्मिती, र्णव्यवस्था ,जातिव्यवस्थेतील दोष, अस्पृश्यता, कौटुंबिक जीवनातील टुता, सती, केशवपन, हुंडाबळी, बलात्कार, बालविवाह, बालकामगार, ाहारातील दोष, अंधश्रद्धा, शिक्षणपद्धतीतील भयंकर उणिवा, शोषण, दूषण इत्यादी तुमच्या-आमच्याकडच्या समस्या वेगानं नाहीशा होऊ ागतील. किंबहुना होऊ लागल्यात.

रेव्हरंड बेट्झ दिङ्मूढ झालेले दिसले.

सतीशनं आजूबाजूला पाहिलं. के.के. चं ते सविस्तर स्पष्टीकरण पताच क्षणभर शांत असलेले श्रोते दुसऱ्याच क्षणी त्या स्पष्टीकरणावर जबुजू लागले होते...

त्यांच्यातल्या काहींच्या प्रश्नाच्या अनुरोधानं के.के. नं पुढे स्पष्ट केलं. 'धर्मातीत... इत्यादी संज्ञा मी वापरतो. त्यांचा अर्थ धर्महीन, विज्ञानहीन, किंवा चारहीन असा नसून धार्मिकता विज्ञान आणि विचारांच्या शुष्क चौकटींच्या भिनिवेशाच्या अतीत असा आहे. आत्मज्ञानामुळे आत्मानात्म विवेक येतो त्यामुळे विचार आणि भावना वैश्विक होतात. असं होण्यामुळेच एक िश्चन, एक मुसलमान आणि एक हिंदू तिघे मिळून आग्यारीमध्ये जाण्याची क्यता निर्माण होऊ शकते! हाच उद्याचा धर्माविचारातीत प्रचीतीरूप श्वधर्म! आणि हाच खरा वेदान्त!

रेव्हरंड बेट्झच्या चेहऱ्यावरचा बेरकी मुखवटा गळून पडला. जणू ांचं मन दांभिकतेच्या ओझ्यातून मुक्त झालं. डोळे निरागसपणे हसू लागले! ड़े बसलेले डॉ. टेलर अक्षरश: भारावून गेले होते. त्यांचे डोळे अश्रूंनी डबले होते.

सतीशनं ते पाहिलं आणि त्याला आश्चर्य वाटलं! एवढे बुद्धिवादी क असे भारावून कसे जातात? के.के. जे बोलला त्याची प्रचीती आली ी गोष्ट वेगळी. काहीही घडलेलं नसताना असलं पाघळणं त्याला पसंत हतं. अशामुळेच बुवा लोकांचं फावतं असंही त्याला वाटे. शिवाय समोर सुख भोगता येतं ते भोगावंच मग त्याला कुणी काहीही म्हणो असं त्याचं विक्शन होतं. स्वप्नरंजनात उमेदीची वर्षं वाया घालवून स्वत:चं आयुष्य

खराब करण्यात त्याला मुळीच स्वारस्य नव्हतं.

■

थोड्या वेळानं आभारप्रदर्शन होऊन सभा संपली आणि आलेले लोकही हळूहळू निघून गेले. सर्वांचा निरोप घेऊन गाडीत येऊन बसल्यावर के.के. नं सवयीनुसार स्टिरिओ सुरू केला. स्टिरिओवर गाणं होतं.

"आगाज है क्या मेरा
अंजाम है क्या मेरा
है मेरा मुकद्दर क्या
बतला दे के मै कौन हूँ"

गाण्याचे ते स्वर कानी पडताच स्वत:ची खरी परिस्थिती स्टिरिओ ऐकवत असल्याचं त्याला जाणवलं. चर्चा उत्तम झाल्याचं जवळजवळ सर्वच श्रोते त्याला म्हणाले हे खरं, पण पुढे काय?

नाटक संपल्यावर त्यातल्या राजाची जशी अवस्था होते तसं के.के चं झालं होतं. नटाला ते अपेक्षित असतं, पण के.के. ला ते असह्य होत होतं.

कुठेतरी खोलवर त्याला सारखा सल जाणवत राहिला. अगदी तोंडापुढे असलेलं पेय कुणीतरी ओढून घ्यावं असं त्याला वाटत होतं. त्या बैठकीत तो एवढे बोलला तरी स्वत:लाच त्याबद्दल साशंकता असल्याचं त्याला जाणवलं. काहीही घडताना दिसत नव्हतंच पण शिवाय, तसं कोणतंही चिन्हंदेखील नव्हतं. सर्वच्या सर्व लक्षणं होती विनाशाचीच! पण का कुणास ठाऊक एखाद्याचा पाठलाग करावा तशी विश्वकल्याणाची जाणीव त्याच्यामागे लागली होती, कितीही ठरवलं, अगदी दारू जरी प्याली तरी ती जाणीव त्याला सोडत नव्हती.

पुष्कळदा वाटे की आपण मृगजळाच्या मागे धावतो आहोतच पण दुर्दैव असं की थांबणंही आपल्या हातात नाही. बरं, सर्वच्या सर्व संत-महंतांच्या अनुभववर्णनात आढळणारी ती अवस्था अजून त्याच्यापासून कोसो दूर होती की अस्तित्वात नव्हती हेही कळत नव्हतं. कौटुंबिक जीवनातले तणाव चिरफाड करून टाकतील असे होते. पण त्याच्या डोक्यावर करकचून पट्टी बांधून काळपुरुष त्याला, त्याच्या आप्तांना फरफटत नेत होता... फरफटत... फरफटत... अज्ञात भविष्यकाळात! काळापुढे कुणाचीही डाळ

शिजत नव्हती!

खोट्या चलनी नाण्याप्रमाणे आपल्याला सुचणारे विचार जर निष्प्रभच ठरत असतील तर त्या विचारांना फेकून का द्यायचं नाही? वास्तवाच्या बेड्या तोडू न शकणारे नपुंसक विचार घेऊन आपण आत्मवंचनाच करीत नाहीये का? पण ते नपुंसक विचार सोडून देऊन वासनेनं वखवखलेलं, वासनातृप्तीच्या दाव्याला बांधलेलं जीवनही जगता येत नाहीय आपल्याला. त्रिशंकू झालोय आपण? किती काळ राहणार असे? आत्मज्ञानी स्थितप्रज्ञ कालातीत असतो पण आपण मात्र अजून रखडतोयच. कालातीत बनणं तर सोडाच आपण कोणत्याच प्रकारे प्रभावी ठरत नाही. फक्त पैसे मिळतायत. परिस्थितीवर मात करण्याऐवजी पैसे मिळवत स्वत:च्या भावनांची अन् अस्तित्वाची घुसमट असहायपणे सहन करत निरुपायानं जगणं नशिबी आलंय आपल्या!

मग अचानक के.के. ला स्वत:चंच हसू आलं. एखाद्या रडव्या पोराप्रमाणे किंवा एखाद्या हिस्टेरिकल तरुणीप्रमाणे आपण आपल्या जखमाच सारख्या चाटत बसलोय, गोंजारत बसलोय.

जेवढं त्यांच्याकडे आपण पुन्हा पुन्हा लक्ष देतोय तेवढ्या तेवढ्या त्या आपल्याला त्रास देताहेत. आय मस्ट फाईट. आय मस्ट कॉंकर. मला लढायचंय. मला जिंकायचंय. आय ॲम एवॉरिअर. मी एक लढवय्या आहे. आय वुईल वीन. मी नक्की जिंकणार. माय वुंडस आर माय ऑरनॅमेंटस्. जखमा ही माझी आभूषणं आहेत. आय ॲम प्राऊड ऑफ देम. मला त्यांचा अभिमान आहे. विश्वकल्याणासाठी झटणं हा खरा धर्म आहे. त्यासाठी लढत राहणं व जिंकत जाणं हेच आवश्यक आहे. बाकीची रड नको. बाकीची किरकिर नको. उद्घोष हवा तो विजयाचा!

त्या विचारांनी त्याला उभारी आली आणि डॉ. टेलरांच्या डोळ्यांतील संमती-सहमतीचे ते भाव आठवले.

■

इकडे डॉ.टेलर रेव्ह. बेट्झ्च्या घरची मीटिंग संपवून तडक स्वत:च्या घरी निघाले. डॉ. टेलर अत्यंत काळजीपूर्वक त्यांची जुनाट व्होल्व्हो चालवीत होते. ॲशले नदीवरचा तो पूल कसा गंभीर आणि पोक्त म्हाताऱ्यासारखा भासत होता. त्यांची व्होल्व्हो पुलावरून निघाली तसा गुड्गुड् गुड्गुड आवाज

होत राहिला, तो पूल संपेपर्यंत हे नेहमीचंच होतं. मजबुतीसाठी बसवलेल्या जाड फळ्या पुलावर वाहन येता-जाताना प्रत्येक वेळी न चुकता अशी तक्रार करीत...

पुलाखाली ॲशले नदीचं पात्र कसं विलोभीय दिसत होतं. पण त्याच्याकडे पाहायला देखील डॉ. टेलर या क्षणी तयार नव्हते. दक्षिण-पूर्वेकडे वाहत जाणाऱ्या त्या निळ्याशार पाण्याकडे किंवा पश्चिमेच्या बाजूला असलेल्या छोट्या-छोट्या लोभसवाण्या बोटींकडे बघायला त्यांना आवडलं नसतं असं नव्हे. पण ड्रायव्हिंगच्या वेळी डॉ. टेलर नेहमीच अतिसावध व्हायचे. प्लँटेशन अपार्टमेंटस्‌समोर असलेल्या मागे पडली तशी चारी बाजूंना पाहत त्यांनी गाडी त्यांच्या घराकडे वळवली.

गाडी उभी करून ते गाडीबाहेर पडले, तेव्हा त्यांच्या मनात लेस्लीचा विचार आला. साठीच्या घरातल्या डॉ. टेलरना लेस्लीचं फार कौतुक होतं. बत्तीस वर्षांच्या जेम्सनंतर तब्बल सोळा वर्षांनी थंडीच्या दिवसांतल्या त्या बेसावध गुलाबी क्षणांमुळे अचानक लेस्लीला या जगाचं आमंत्रण मिळालं होतं!

ते स्वत:शीच हसले.

खिशातून किल्ली काढून त्यानी लॅच उघडलं आणि एकदम त्यांच्या लक्षांत आलं आज लेस्लीला कामावर जायचं होतं! स्वत:च्या हिमतीवर तिनं एका स्टोअरमध्ये काम मिळवलं होतं. ती भेटणार नाही म्हणून नकळत ते थोडे खट्टू झाले. पण त्याचबरोबर त्यांना अभिमानही वाटला. हो, सर्वच मुलं सुट्टीत आणि जमेल त्या वेळात काहीतरी नोकरी व्यवसाय करतात. हे खरं असलं तरी लेस्ली त्यांच्या लाडाची होती ना! तिच्या त्या धडपडीचं त्यांना मनापासून कौतुक वाटलं.

आत येऊन त्यानी रेकॉर्ड प्लेअर लावला. अमेरिकन चेंबर म्युझिकच्या लहरींनी त्यांची छोटीशी बंगली भरून गेली. आजकाल ते घरी आले की प्रथम रेकॉर्ड प्लेअरच लावत. टी. व्ही. बघायचा त्यांना उबग आला होता.

टोनी, त्यांचा थोरला मुलगा कायद्याच्या प्रॅक्टिससाठी न्यूयॉर्कमध्ये स्थानिक झाल्याला आता आठ वर्षं झाली. मागोमाग दोन वर्षांनी जेम्स् सर्व्हेअर म्हणून कोलंबियाला गेला. ते जेव्हा घरी परतत, तेव्हा लेस्लीची मात्र हमखास भेट होई. पण गेल्या तीन-चार वर्षांत तिचं भेटणं कमी झालं होतं.

मैत्रिणी, बॉयफ्रेंड, लायब्ररी, जिम किंवा नोकरीसाठी ती संध्याकाळी बाहेर पडू लागली होती. त्यांची बायको दुपारच्या वेळात पोहायला जाई. लेस्ली नसली की घर कसं ओकं ओकं वाटायचं. एक प्रकारची मरगळ एका तऱ्हेची उदासीनता आसमंतात भरून राहायची. ऐसपैस तीन बेडरूम्स्, लिव्हिंग रूम, किचन... घर खायला यायचं!

त्यामुळे त्यांना संगीत चालू असलं की जरा बरं वाटायचं.

डॉ. टेलरनी फ्रीज उघडून ऑरेंज ज्यूसची बाटली काढली. तेवढ्यात फोनची घंटा वाजली. त्यांनी घड्याळात पाहिलं. साडेसहा वाजले होते, रिसीव्हर कानाला लावून त्यांनी नकळत फेऱ्या मारायला सुरुवात केली. फोनची वायर खूप लांब असल्यामुळे फोनवर बोलताना त्यांना हॉलभर चकरा मारता येत.

"हॅलो, मे आय स्पीक टु लेस्ली प्लीज?" त्यांनी तात्काळ लेस्लीच्या मित्राचा आवाज ओळखला. तुटकपणे, "ती घरी नाही," म्हणून त्यांनी खाडकन् फोन ठेवला.

स्वत:चा आवाज जरा त्रासिक बनल्याचं त्यांना जाणवलं, पण त्यांनी फारशी पर्वा केली नाही. त्या बॉयफ्रेंडच्या फोननं त्यांना वैतागच आला होता. त्यांच्यापासून लेस्ली दुरावण्याला तोही कारणीभूत होताच. केवळ लेस्लीला तो आवडतो या विचारानं त्यांनी स्वत:ची समजूत घातली होती एवढंच. पण या संमिश्र भावनांनी त्यांची घालमेल झाली. ते हळवे झाले.

बघता बघता लेस्ली वयात आली. स्वतंत्र झाली. स्वत:चे निर्णय स्वत: घेऊ लागली. सारे निर्णय... कपडे, स्पोर्टस्, डेटिंग, करिअर सारे निर्णय!

का कुणास ठाऊक, अचानक त्यांना इंडियाची आठवण झाली. १९६२ साली ते शास्त्रज्ञांच्या एका गटाचे सदस्य म्हणून भारतात गेले होते. सहा आठवडे राहिले होते. त्यावेळी अगदी प्रकर्षानं जाणवलेली कौटुंबिक नाती त्यांना आठवली. ऋणानुबंधांची ती विविधरंगी पखरण, तिच्यातला जीवन भरून टाकणारा तो ओलावा त्यांना आठवला.

इथल्या बेफाम स्वातंत्र्यानं, माणसाच्या आत निर्माण होणारी पोकळी, रखरखीत कोरडेपणा, त्यातून येणारी अधांतरी जीवनातील अस्वस्थता त्यांना झोंबली. स्वत:शी त्यांनी प्रतिवाद करण्याचा प्रयत्न केला. स्वतंत्रवृत्ती गैर नाही, स्वत:ची जबाबदारी घेणं योग्यच आहे, वगैरे वगैरे. पण त्यांना जमेना.

या साऱ्या स्वातंत्र्याच्या हव्यासातून पदरी काय पडतं? एकाकीपणा, एकलकोंडेपणा! परस्परांचे अंतरंग सांधणारे रेशीमधागे-हरवलेला एकाकीपणा!

डॉ. टेलर एकदम उदास झाले. ह्या उतारवयात आपल्याकडे पैसा-अडका, नावलौकिक, मानमरातब सर्व काही आहे. पण आत्मीयतेचा ओलावा मात्र नाही. अखंडपणे आपण तृषार्त आहोत, अनसॅटिस्फाइड आहोत. तृषाग्नित जळत आहोत! स्वतंत्र एवढे की दोरी तुटलेल्या पतंगासारखे! ते तसेच बसून राहिले. त्याचवेळी त्याना रेव्हरंड बेट्झच्या घरी झालेल्या गीतेवरील चर्चेची आठवण झाली. के.के. च्या बोलण्याचा सारांश त्यांच्या मनात घोळू लागला. पण त्याचा नेमका मथितार्थ हा उदासपणा, यामध्ये त्यांना संबंध जोडता येईना.

तसा त्यांना अनेक गोष्टींत रस होता. संशोधनाबरोबरच त्यांना नाटक, संगीत, फिशिंग खूप आवडायचं. टाइमपास करण्याची समस्या नव्हती. मित्रमैत्रिणीही होत्या. मजेत पबमध्ये जाऊन बसलं तरी वेळ कसा भुर्रकन उडत होता. पण त्यांना हे सारं अलीकडे समाधान देऊ शकत नव्हतं.

गीतेवरील चर्चेत भाग घेण्यासाठी जाण्यापूर्वी त्यांनी त्यांचं होमवर्क अगदी शालेय विद्यार्थ्याप्रमाणे मन लावून केलं होतं. गीता दोन वेळा नीट वाचली होती आणि टिपणं, शंका लिहून काढल्या होत्या. पण त्यात त्यांना आजच्या त्यांच्या जीवनाशी संबंधित असं काहीही सापडलं नव्हतं. इतर अनेक वैचारिक-धार्मिक ग्रंथांप्रमाणे गीताही त्यांना पोकळ आणि अवास्तव वाटली होती. तर्कदुष्ट वाटली होती. पण कधी नव्हे ते के.के. च्या ॲप्रोचनं, विचारपद्धतीनं मात्र ते प्रभावित झाले होते. त्याचा ॲप्रोच, त्याचा दृष्टिकोन त्यांना प्रॉमिसिंग (आश्वासक) वाटला होता. पण या आताच्या खिन्न घडीशी या ॲप्रोचची सांगड कशी घालायची?

गीतेच्या संदर्भात त्यांना वाटे की स्थितप्रज्ञावस्था म्हणजे सर्वसामान्य प्रवृत्तीशील भाव-भावनांना नकार. वाटे की असं 'जीवन' म्हणजे खऱ्या जीवनालाच नकार. पण के.के. च्या विश्लेषणानं वेगळ्याच उंचीवरून त्यांच्या या संशयाच निराकरण- त्यांनी न विचारता-बोलण्याच्या ओघात झालं. सर्व वैयक्तिक इच्छा-आकांक्षा, मतं-मतांतरं, आवडी-निवडी, श्रद्धा-अश्रद्धा यांच्या पलीकडे अभिनिवेशशून्य होणंही आपण समजत होतो, तशी नकारात्मक बाब नाही हे त्यांना थोडं थोडं लक्षात येऊ लागलं. उलट स्थितप्रज्ञावस्था

ही माणसाच्या उत्क्रांतीची नैसर्गिक आणि सर्वोच्च परिणती आहे. बायॉलॉजिकल इव्होल्यूशनच्या पुढची पायरी आहे असं त्यांना वाटू लागलं. धर्माबद्दल त्यांच्या मनात कधीच अभिनिवेश नव्हता, विशेष भावुकपणाही नव्हता. पण विज्ञान आणि तर्कशुद्ध विचारांच्या बाबतीत ते निश्चितच आग्रही होते. पण के.के. च्या ॲप्रोचमध्ये त्यांना विज्ञानाला विरोध नसल्याचंही जाणवलं आणि त्याचबरोबर रिडक्शनिस्ट ॲप्रोचशिवाय (प्रत्येक बाबीच्या सुटा सुटा-अलग अलग विचार करण्याच्या पद्धतीशिवाय) विश्वाला गवसणी घालणाऱ्या सिंथेसिसचं (सर्वसमावेशक एकात्म विचारांचं अस्तित्व) ठळकपणे जाणवलं! वैज्ञानिक संशोधनातील बौद्धिक आनंद त्यांनी पुष्कळ अनुभवला होता. पण त्या आनंदामध्ये स्वार्थ आणि भावनेची आर्तता नसल्याचं त्याला नेहमीच जाणवलं होतं. अणुविज्ञानाच्या उद्‍गात्यांना अणुबॉम्बनिर्मितीला आळा घालता आला नाही. ते हतबल ठरले. तसंच हजारो शास्त्रज्ञांना विश्वाच्या एकात्मतेच्या व प्रेमाच्या प्रक्रियेत सहभागी होता आलं नाही. राजकीय अरिष्टांवर व अन्यायावर मात करता आली नाही. ही बाब ते कधीच नजरेआड करू शकले नाही. के.के.च्या दृष्टिकोनामध्ये त्यांना, व्यक्तीला बौद्धिक, भावनिक आनंदाच्या हमीबरोबरचा संपूर्ण विश्वाच्या आंतरिक एकात्मतेचा प्रत्यय आणून देणारी प्रभावी शक्ती दिसली. मानवी जीवनाच्या सर्व स्तरांवर परिणाम करणारी क्षमता दिसली. व्यक्ती व समेष्टी जीवनात समृद्धी आणि प्रगल्भता आणण्याची ऊर्जा दिसली. ते एकदम उत्तेजित झाले.

आजपर्यंतच्या त्यांच्या धडपडीचं सोनं झाल्यासारखं वाटलं. वैज्ञानिक संशोधन, नाटक संगीतातून, मित्र-मैत्रिणींच्या सहवासातून आनंद लुटण्याची धडपड, तसंच आतापर्यंत त्यांनी केलेलं वाचन, ऊर फुटेपर्यंत केलेली चर्चा सारं काही अचानक फलद्रूप झाल्यासारखं वाटलं. त्यांनी जे जे केलं ते ते सर्व आज एका नव्या अनुभूतीत सार्थकी लागण्यासारखं वाटलं. एकाच वेळी त्या सर्व धडपडीतून ते मुक्तही झाले अन् त्यांना त्या धडपडीचा आत्माही गवसला, गाभाही सापडला. सत्य, परोपकार, बंधुत्व, अहिंसा, प्रेम, सर्वच खोट्या व निरुपयोगी भासणाऱ्या शब्दांना अचानक उत्कट अनुभूतीचं अचूकतेचं व वास्तवतेचं नवं परिमाण लाभलं.

गीतेमध्ये वर्णन केलेलं मनावर संयम ठेवण्याचं तंत्र, प्रत्येक बाबीचा

मूलभूत विचार करून नित्य काय आणि अनित्य काय याची निश्चिती करण्याची पद्धत, स्वत:च्या वैयक्तिक अस्तित्वाचं सर्वस्व चित्स्वरूपी ईश्वराच्या चरणी अर्पण करून भक्ती करण्याचा मार्ग आणि स्वभावधर्मानुसार स्वत:च्या क्षेत्रामध्ये ईश्वरपूजा समजून काया-वाचा-मने, कर्तेपणा ईश्वराकडे असल्याने, फळाचा कर्ताही तो असल्याचं जाणून कार्य करीत राहणं या चार मार्गांपैकी त्यांना नित्यानित्य विवेक आणि त्या अनुरोधानं काम करीत राहणं सोयीचं वाटलं. मग या दृष्टीनं विचार करता करता त्यांच्या लक्षात आलं की आपण यापुढे आपल्या संशोधनात नव्या उमेदीनं रसही घेऊ शकतो आणि वैज्ञानिकांच्या जगामध्ये या नव्या दृष्टीचं महत्त्वदेखील सिद्ध करू शकतो. त्यांना जाणवलं की सरकारी व इतर फंडांवर चालणारं संशोधन आणि त्या संशोधनात रमणारे वैज्ञानिक असहाय आहेत. बरेच जण लाचार आहेत. त्यामुळेच केमिकल वॉर, न्युक्लिअर वॉर, स्टार वॉर अशा एकापेक्षा एक भयंकर गोष्टींच्या समस्या जगाला भेडसावीत आहेत. त्यांच्या मनात आलं, की वैज्ञानिकांच्या जीवनाला जर हे नवं परिमाण मिळालं, तर ते मानव कल्याणाच्या विरोधात संशोधनाची फळं वापरली जाणार नाहीत यासाठी अजिंक्य सामर्थ्यानं उभे ठाकतील! त्यांच्या मनात या जाणिवेनं विलक्षण आत्मविश्वास संचारला. गीतेच्या दृष्टिकोनातील ताकद त्यांना प्रथमच जाणवली. असहाय आणि भ्रष्ट वैज्ञानिकांच्या व्यक्तिजीवनामध्ये, वैज्ञानिक संशोधनाच्या बजबजपुरीमध्ये आणि संपूर्ण मानवी समाजाच्या जीवनात या प्रत्ययकारी दृष्टिकोनानं किती सर्वंकष स्थित्यंतर घडून येऊ शकतं या विचारानं ते रोमांचित झाले. त्यांना प्रकर्षानं जाणवलं की संकुचित पातळीवर काम करणारा बाह्यत: अगदी निरुपद्रवी भासणारा माणूस प्रत्यक्षात किती भयंकर उत्पातांना कारणीभूत असू शकतो, तसंच वैयक्तिकतेच्या अतीत जगणारा कोणत्याही क्षेत्रातील अगदी सामान्य माणूस संपूर्ण मानवजातीच्या उत्कर्षाला कसा कारणीभूत असू शकतो!

हिंसा आणि अहिंसेच्या संदर्भात के.के नं मांडलेल्या त्या सोप्या विधानातील प्रगल्भ आशय त्यांच्या एकदम ध्यानात आला.

ते विलक्षण प्रफुल्लित झाले.आपण आनंदानं नाचू... गाऊ... हुंदडू... असं त्यांना वाटू लागलं! हजार हत्तींचं बळ संचारल्यासारखे ते हवेत तरंगू लागले.

त्या विलक्षण अवस्थेत फोनची ट्रिंग ट्रिंग त्यांना काही काळ ऐकूच गेली नाही. मग एकदम उठून त्यांनी फोन घेतला. "हॅलो, कुड आय स्पीक टू डॉ. टेलर? के.के.चा आवाज ऐकून ते आणखीनच खूश झाले. "स्पीकिंग" ते उत्तेजित स्वरात उद्‌गारले.

"डॉ. टेलर मला कॅलिफोर्नियाला जायचं आहे. काही व्यावसायिक कामासाठी. तेव्हा मी संडेच्या मीटिंगला येऊ शकणार नाही रेव्हरंड बेट्झकडे"

ते ऐकून डॉ. टेलर किंचित निराश झाले. के.के. च्या सहवासात जास्त राहावं असं वाटायला आणि त्याच्या सहवासाला मुकायला एकच गाठ पडली होती! मिस्टर के.के. आय ॲम सो डिसअपॉइंटेड ...आपली भेट होणार नाही... मला इतकी उत्कंठा लागलीय तुम्हाला भेटायची ... इतकं बोलायचं आहे तुमच्याशी... मिस्टर के.के. आय ॲम एक्स्टॅटिक. तुमच्या मुखातून जणू काही आम्हाला अमृताचा लाभ झालाय त्या मीटिंगमध्ये..."

" डॉ. टेलर तुम्ही फारच प्रशंसा करताहात"

" के.के. तसं मुळीच नाही. के.के. ... मला जाणवतंय की द मोस्ट ब्युटिफुल ॲण्ड ऑल सो द मोस्ट पॉवरफुल थिंग्स् आर फ्री! अत्यंत विहंगम आणि विलक्षण सामर्थ्याचा आविष्कार कपर्दिकही खर्च न करता होतो मनुष्याच्या आयुष्यात! थँक्स टु यू! थँक्स अ लॉट!"

"तुम्ही म्हणता ते खरं असेल तर मला खरोखरच आनंद आहे. पण डॉक्टर, मला स्वत:लाच अजून खूप दूरचा पल्ला गाठायचाय..."

"पण ते काहीही असलं तरी 'नराचा नारायण होणं' म्हणजे काय याची मला तुमच्यामुळेच प्रचीती आली. एरवी ही अनुभूती... वाटतंय तुमच्या रूपानं आध्यात्मिक गुरुभेटला..." ते हळवे झाले.

"छे छे ! डॉ. टेलर! वुई आर सोल मेटस्!"

"के.के. आय ॲम सो ग्लॅड! कॅलिफोर्नियाहून तुम्ही आलात की मला प्लीज फोन करा. मला तुम्हाला भेटायचंय..."

"जरूर. सर्टनली. ओ.के.बाय बाय!"

"बाय, थँक यू!"

डॉ. टेलर उठले. त्यांनी गीतेचा या नव्या दृष्टीनं पुन्हा अभ्यास करायचं ठरवलं आणि त्याचबरोबर स्वत:च्या क्षेत्रातील वैज्ञानिक, न्युक्लिअर आणि

केमिकल वेपन्सच्या क्षेत्रात काम करणारे वैज्ञानिक अण्वस्त्रविरोधी चळवळीतील कार्यकर्ते आणि केमिकल वॉरविरोधी चळवळीतले सक्रिय सभासद यांच्याशी संपर्क साधायचं ठरवलं.

ऑरेंज ज्यूस तसाच होता, तो संपवून त्यांनी स्वत:ची पत्त्यांची डायरी काढली, टेलिफोन डिरेक्टरी काढली आणि संबंधित संस्था आणि व्यक्तींचे फोन नंबर व पत्ते शोधायला सुरुवात केली.

■

कॅलिफोर्नियाला जायला निघालेला के.के. झपझप विमानतळाच्या आत शिरला. अमेरिकन एअरलाइन्सच्या काऊंटरकडे जाऊन के.के. नं आपलं तिकीट दाखवलं आणि विमानाच्या दरवाजाला विमानतळाच्या दरवाजाशी जोडणाऱ्या त्या बंदिस्त पुलामध्ये-ट्रॅन्झिटमध्ये तो शिरला.

समोरच्या इंडिकेटरवर सीट बेल्ट बांधायची सूचना येताच त्यानं सीट बेल्ट बांधला आणि खिडकीतून सहज बाहेर नजर टाकली. दूरपर्यंत वेगवेगळ्या कंपन्यांची अनेक विमानं उभी होती. शिवाय काही विमानं आकाशातून उतरत होती, तर काही उड्डाण करायच्या तयारीत होती. काहींनी आकाशात झेप घेतलेली होती. खाली वेगवेगळ्या प्रकारच्या नावीन्यपूर्ण कॅरिअर्समधून सामानाची ने - आण चालू होती.

अमेरिकेतल्या त्या अत्याधुनिक यंत्रसज्जतेच्या पार्श्वभूमीवर आपल्या देशातल्या परिवहनाचं चित्र त्याच्या नजरेपुढे उभं राहिलं. का कुणास ठाऊक पण अलीकडे त्याच्या मनात अशी तुलना वारंवार होऊ लागली होती.

वास्तविक बालपणापासून त्याला कधीही एस.टी. बस किंवा रेल्वनं प्रवास करावा लागला नव्हता. कार, किंवा विमान... गमतीसाठी मोटरसायकल, घोडा आणि सायकलदेखील,पण बस,बैलगाडी,रेल्वे प्रवास मात्र नाही!

परंतु मद्रासला असताना तसंच मुंबई,बंगलोर वगैरे मोठ्या शहरात गेला असताना एस.टी. स्टॅंड्स्, रेल्वे स्टेशन वगैरेतून भरपूर भटकायला वाव होता. त्या ठिकाणी असणारी गर्दी, तिथली अस्वच्छता कंगालपणा त्याच्या मनात ठसलेली होती. सायकल रिक्षावाल्यांची दैना त्याच्या हृदयात कोरली गेली होती. त्याच्या मनात आलं केवळ तंत्रज्ञानाची प्रगती म्हणजे खरी प्रगती नव्हे, भौतिक सुबत्ता म्हणजे खरी उन्नती नव्हे... बाह्य सौंदर्यपेक्षा अंतरंगच शुद्ध हवे हे सारं काही खरं... पण तरीही या विचारांचा आधार घेऊन

स्थितप्रज्ञतेचा हवाला देऊन कमालीच्या गलिच्छ, बेपर्वा, बेजबाबदार, असहाय किंवा हिंस्त्र जीवनाकडे दुर्लक्ष करणं योग्य आहे काय? स्थितप्रज्ञतेच्या नावाखालील हा कमालीचा संकुचितपणाच नव्हे काय? अध्यात्माचा विलक्षण विपर्यास नव्हे काय? रेव्हरंड बेट्झच्या प्रश्नाला आपण बौद्धिक पातळीवर दिलेलं उत्तर अपूर्ण आहे! जेव्हा गीतेच्या दृष्टीचा डोळे दिपवणारा आविष्कार प्रत्येकाच्या जीवनात दिसेल, आध्यात्मिक दृष्टी आणि भौतिक वैभव यांचा मनोहर संगम पाहायला मिळेल तेव्हाच रेव्हरंड बेट्झच्या प्रश्नाचं उत्तर पूर्ण होईल. विकृतीची आणि दौर्बल्याची लक्तरं लोबत असताना आम्ही कितीही प्रचीतीच्या गप्पा मारल्या तरी त्यामुळे फार तर सभा गाजवता येतील, क्वचितच गुरुपण मिळेल,बुवाबाजीही करता येईल. पण प्रत्यक्षात ते नपुंसक स्वप्नरंजन आणि आत्मवंचनाच ठरेल! किंबहुना संकुचित आत्मद्रोही असा आत्मप्रचीतीचा विपर्यासच गेल्या हजारो वर्षांच्या अंधारयुगाला आणि भोगवादी हिंस्त्रतेच्या प्रादुर्भावाला जबाबदार आहे. कालगती अशी की हजारो वर्षं भारतातील आत्मज्ञानाचे महास्त्रोतदेखील वासना-विकाराच्या झंझावाताशी झगडताना तात्काळ यशस्वी झाले नाहीत. पण आज असं दिसतंय की बेबंद स्वैराचाराची आणि निर्दय आणि नृशंस नीचतेची सर्व वादळं खरा स्थितप्रज्ञ भारत पिऊन टाकेल, पचवून टाकेल!

के.के. विचारांच्या आवर्तनात असतानाच त्याच्या शेजारी कुणी तरी आलं म्हणून त्यानं मान वळवली.

■

त्याच्या बाजूच्या सीटवर बसणारी ती तरुणीही भारतीयच होती. पाश्चात्य पेहरावातल्या त्या सुंदर स्त्रीनं हस्तांदोलनासाठी हात पुढे करत आपण होऊन स्वत:ची ओळख करून दिली. ''आय ॲम डॉ. गायत्री; गायत्री माथूर''.

''आय ॲम के.के. नायडू!''

''ओ, आय सी! के.के. नायडू तुम्ही शेफ तर नाही?''

''शेफच आहे. का बरं?''

''नाही म्हणजे मी तुमच्याबद्दल पेपरमध्ये वाचलं होतं.... 'इंडियानाऊ'या इथल्या पेपरामध्ये तुमचा फोटोदेखील पाहिल्यासारखं वाटतंय''

''अच्छा अच्छा''तिच्या अघळपघळ बोलण्यानं त्याला बरं वाटलं. बोलण्याच्या ओघात मोकळेपणानं तिनं स्वत:बद्दल बरीच माहिती दिली. ती



मूळची मुंबईची महाराष्ट्रीय, नवरा इंजिनीयर कानपूरचा. तो नोकरीसाठी मुंबईत असल्यानं आणि माटुंगा भागातच राहत असल्यानं बसस्टॉपवर प्रथम दोघं भेटली. पुढे या भेटींची परिणती प्रथम परिचय, मग प्रेम आणि पुढे प्रेमविवाहात झाली! मुंबईमध्ये छोट्याशा चाळीत तिचे आई-वडील आणि भाऊ अजून राहत होते.

तिच्या अघळपघळ स्वभावाच्या पार्श्वभूमीवर तिची ती फॅशनेबल केशवेशभूषा आणि त्यातून ओसांडणारी अमेरिकन संस्कृतीची नक्कल मात्र के.के. ला खटकली. पण त्याच्या मनात विचार आला. व्यावहारिकदृष्ट्या आणि वरपांगी पाहिलं तर आपणदेखील अमेरिकनांची नक्कल करतोच ना? अंतरंग कुठे कळतात फक्त बाह्य रूपावरून?

गप्पांच्या ओघात थोड्या मिष्किलपणे के.के.नं डॉ. गायत्रीला

म्हटलं, "तुमच्यासारख्या सुशिक्षित आणि निष्णात डॉक्टरांची खरी गरज भारतात असताना, तुम्ही इथं राहणं हे विसंगतच आहे. तुमच्या शिक्षणावर भारत सरकारनं अन् पर्यायानं भारतीय जनतेनं एवढा पैसा खर्च केलाय, पण ह्याचा काहीच विचार न करता तुम्ही इथं अमेरिकेत कशाला राहिला आहात? लाखो लोकांची उत्तम सेवा करत, त्यांचे आशीर्वाद, त्यांचा दुवा घेऊन भारतात राहायचं सोडून तुम्ही इथे राहण्यात काय हंशील आहे? काय विशेष लाइफ आहे इथं तुम्हाला?"

त्याच्या प्रश्नातली खोच कळायला तिला वेळ लागला नाही. अशा प्रश्नांची तिला आत्तापर्यंत बहुधा सवय झालेली असावी. लगेच तिनं उत्तर दिलं, "मि.नायडू, फारच खवचट आणि बेरकी दिसताय की हो तुम्ही! अहो, आम्ही दुवा घेत तिथे राहिलो नाही किंवा देशवासीयांच्या उपकाराला जागलो नाही यात आमची काही चूक नाही! इंडियात राहणंच अशक्य झाल्यावर 'लाइफ'चा मुद्दा येतोच कुठे? इंडियात सर्व्हायव्हलच अशक्य झाल्यामुळे परदेशात लाइफ असो वा नसो माणूस बाहेर पडतोच! अर्थात् शक्य झालं तर आणि संधी मिळेल तेव्हा!"

स्वत:च्या बोलण्यावरील के.के. च्या डोळ्यांमध्ये अविश्वासाची प्रतिक्रिया पाहून तिच्या डोक्यात सणक गेली. एकदम चिडून तिनं म्हटलं, "मी मुंबईत लहानाची मोठी झालेय. निदान मुंबईमध्ये तरी आमच्यासारख्या मध्यमवर्गीयांना राहण्यासारखी परिस्थिती अजिबात नाहीय. देशाच्या काना-कोपऱ्यांतून नशीब काढायला लोक मुंबईत येतात. पण प्रत्यक्षात पदरी काय पडतं? बहुतेक सारे गुराढोरांचं जिणं जगतात. सारं जीवनच कसं लाचार, लबाड, कंगाल, किळसवाणं, हिडीस! रोगट मुंबईत 'सक्सेसफुल' होणारे फारच विरळा! पण बाकीच्या उकिरड्यातल्या जनसागरासमोर त्यांचं ते वैभव त्यांचे सक्सेस, त्यांचे विलास अधिकच किळसवाणे वाटतात. त्यांचे वाकडे मार्ग आम्हाला कधीही पटणार नाहीत. रुचणार नाहीत, जमणार नाहीत. मुंबई त्यांच्यासाठी आहे! आमच्यासारख्या सरळमार्गी लोकांना बेवारशी कुत्र्यासारखं जगावं लागतं तिथे! आयुष्यातली कमाई खर्चून साधा निवारादेखील मिळालाच तर तो कुठेतरी दूरवर... बदलापूर, डोंबिवली, किंवा नालासोपारासारख्या सबर्बनमध्ये. निर्लज्ज कसायांचे बंगले मात्र पॉश आणि मध्यवर्ती लोकॅलिटीत! आम्हा सामान्यांचं जीवन सडतं झोपडपट्टीत, चाळीत, रेल्वेच्या

फलाटावर, तिसऱ्या वर्गाच्या जीवघेण्या गर्दीत किंवा दूरवर अंबरनाथ विरारसारख्या ठिकाणी... कोंबड्यांच्या खुराड्यात! आमचं शरीर, मन, भावना, विचार महत्त्वाकांक्षा, आमची स्वप्नं, आमचं सर्वस्व कुजून जातं त्या मुंबईत! त्या देशात! बोलता बोलता तिचा स्वर कातर झाला. तिच्या उरातल्या जखमेवरची खपली निघाली होती!

पण त्याकडे मुद्दामच दुर्लक्ष करून के.के. नं खोदून विचारलं, ''पण डॉक्टर, धीस इज लाइफ. वन हॅज टु फाइट. तुम्ही का नाही संघर्ष केलात?''

''संघर्ष? मि. नायडू, बोलणं सोप्पं असतं! तुम्हाला कळायच्या नाहीत आमच्या व्यथा!'' त्याच्या आगाऊपणाचा राग येऊन तिनंही त्याला फटकारलं.

''तसं नव्हे...डॉ.गायत्री..., मला फक्त जाणून घ्यायचं होतं की तुम्ही इथं का राहता ...कारण माझ्यासारख्या तिऱ्हाईताला ते बेजबाबदारपणाचं, पळपुटेपणाचं आणि शिवाय कृतघ्नपणाचंही दिसतं म्हणून!'' के.के.नं एका बाजूला समजावत थेट मर्मावर हल्ला केला.

''बेजबाबदारपणा? पळपुटेपणा? कृतघ्नपणा? काय बोलताय तुम्ही मि.नायडू? अहो, स्वत:च्या डोळ्यातलं मुसळ दिसत नाही का तुम्हाला, अशा तऱ्हेनं समोरच्या व्यक्तीचा जीवघेणा अपमान करताना? एवढी पिढीजात गजांतलक्ष्मी असताना तुम्हीही राहताच ना इथे? लोळता आहातच ना सुखात... देशबांधवांच्या नावानं आंघोळ करून? मग उलट तपासणी कसली करताहात? कोणत्या नैतिक अधिकारानं? तिच्या आवाजात आता तिरस्कार होता.''

''नोऽ नोऽ मॅडम, मला तुम्हांला दोष द्यायचा नाही... डोंट मिसअंडरस्टॅण्ड... फक्त परिस्थिती समजावून घेण्याचा प्रयत्न करतोय मी!''

''परिस्थिती जगावी लागते, समजावून घ्यायला! परिसंवाद, चर्चा, मुलाखती आणि आत्तासारख्या उलटतपासणीतून नाही समजत परिस्थिती मि. के.के. नायडू! तुम्ही तर इथे मनसोक्त ऐषआराम करत उलटे आम्हालाच धारेवर धरता आहात, आम्हाला हिणवून डागण्या देताहात! म्हणे, परिस्थिती समजावून घेण्याचा प्रयत्न करतोय.......''

''ऑल राइट'' तो तसा थोबाडीत बसल्याप्रमाणे गप्प बसलेला पाहून थोड्या नरमाईच्या स्वरात ती पुढे म्हणाली, ''खरोखरच समजावून घ्यायचं

आहे ना तुम्हाला, ऐका तर! सगळी भीड-संकोच बाजूला ठेवून उघड करून सांगते सारं! आम्ही कुणा धनदांडग्यांची मुलं नाही की कुणा पुढाऱ्याची. मी आणि माझा नवरा सामान्य कुटुंबात जन्मलो, वाढलो. दोघांनाही कुणी गॉडफादरदेखील कधी नव्हता व नाही. त्यातून तशा तऱ्हेनं लागेबांधे जुळवून भ्रष्ट मार्गानं सरकारी योजना स्वार्थासाठी राबवण्याची, स्वत:चं उखळ पांढरं करण्याची प्रवृत्तीही नाही आम्हा दोघांची. साहजिकच तिथं जिणं अशक्य झालं आणि म्हणूनच होत नव्हतं ते सारं विकून नोकरीच्या मागे इथे आलो आम्ही! आवडीने नव्हे. कळलं?... आणि हो, आम्ही पळपुटेच आहोत. लढवय्ये सैनिक नाही. पण साध्या सरळ माणसाला तिकडे नाही तर निदान इथं तरी जगण्याचा अधिकार आहे की नाही?''

''तसं नव्हे डॉ.गायत्री. पण साधी सरळ माणसं भारतात... अन् अगदी मुंबईत जगूच शकत नाही हे तुमचं म्हणणं जरा अतिशयोक्तीचं वाटतंय. तुम्हाला नसेल सांगायचं तर नका सांगू... पण मला मात्र वाटतं की संघर्ष...'' के.के. अजूनही मुद्याला चिकटून होता!

''कसल्या संघर्षाच्या बाता करताहात? सारं जीवनच गेलंय बिकट परिस्थितीशी झगडण्यात! अगदी शालेय शिक्षणापासून ते एम.डी. होईपर्यंत पावलोपावली, हरघडीला संघर्ष करावा लागलाय मला... फी, पुस्तकं, वह्या, कपडे प्रत्येक वस्तूसाठी रक्त आटवावं लागलंय. स्कॉलरशिप मिळवावी लागलीय, राखावी लागलीय! आणि लक्षात ठेवा संघर्ष करून मेरिटवर गोल्ड मेडल मिळवलंय मी... वशिलेबाजीने नव्हे!''

''ओ ,दॅटस् रीअली क्रेडिटेबल! त्याबद्दल तुमचं मन:पूर्वक अभिनंदन!''

''प्लीज स्टॉप इट! अभिनंदन नकोय मला... परिस्थिती समजावून घ्यायची ना, मग तेवढंच करा... आधी वाटलं होतं माझ्या गुणवत्तेच्या जोरावर मी नक्की यशस्वी होईन. पण खाजगी प्रॅक्टिस केल्याबरोबर काय घडलं? जनरल प्रॅक्टिशनर्सना मलिदा हवा होता. माझ्या फीमधून कमिशन हवं होतं. एवढचं नव्हे तर गरज नसताना मी सिझेरिअन करून बाळंतिणीचं पोट फाडून व तिचा जीव धोक्यात घालून अधिक फी घ्यायला हवी होती. रुग्णांचा विश्वासघात करून त्यांना अधिकाधिक कमिशन द्यायला हवं होतं. माझ्या मनाला ते पटलं नाही. मी ते करू शकले नाही. परिणामी पेशंट पाठवायलाच

कुणी तयार झाले नाहीत. आधीच नवीन डॉक्टर आणि त्यात वशिल्यानं मिळणारी टी.व्ही, रेडिओ, वृत्तपत्रातील प्रसिद्धीही नाही. त्यामुळे आपण होऊन पेशंट आले नाहीत. शेवटी इन्कम सोडाच... बँक बॅलन्सही संपला दोन वर्षांअखेर!''

"ओ ! दॅटस् रिअली डिस्टर्बिंग...''

"दया दाखवू नका मि. के.के....'' पुन्हा त्याला फटकारत तिनं पुढे म्हटलं,'' परिस्थितीची अशी चपराक बसली, की सगळा आत्मविश्वासच संपला. आम्हा दोघांचा धीरच खचला. अखेर, दोघांपैकी एकाला जरी नोकरी मिळाली, तरी परदेशाचा रस्ता धरायचा असं आम्ही ठरवून टाकलं... नशिबानं शंभूला नोकरी मिळाली. आय होप आय डोंट हॅव टु एक्स्प्लेन फर्दर... इथं आम्ही कमीत कमी सरळ मार्गानं जगू तरी शकतो. मुलाबाळांचं कोडकौतुक करू शकतो. चांगलं शिक्षण देऊन त्यांच्या भविष्यकाळाची थोडीफार सोय करू शकतो. ... तिथं आम्हाला जगण्याचीच मारामार!''

■

थोडा वेळ थांबून डॉ. गायत्रीनं एकदम उपहासानं प्रतिवाद केला,''पण मि. नायडू आमचा संघर्ष जाऊ दे. आमचं जीवन सामान्य तसा संघर्षही सामान्य. पण तुम्ही मात्र तुमच्या मातृभूमीचे चांगलेच पांग फेडलेत. फारच महान् देशभक्त आहात बाकी ! सोळा वर्षं परदेशात राहताहात पत्नी-मुलीला स्वदेशी ठेवून! अहाहा, काय ही देशहिताची अनोखी आच!''

तिच्या टोमण्यानं के.के. मुळीच गांगरला नाही. चिडलाही नाही. कारण त्याला तो अपेक्षितच होता. कारण इंडिया नाऊमध्ये त्याच्याविषयीची माहिती तिनं वाचलेली होती. हे तिनं आधीच सागितलं होतं. उलट केव्हा एकदा ती अशा तऱ्हेनं उसळते, याचीच तो वाट पाहत होता!

"डॉ. गायत्री, आमचं काय घेऊन बसला आहात? बोलून-चालून साधा स्वयंपाकी मी! इथे असलो काय किंवा तिथे! काय फरक पडतो? सर्वच क्षेत्रातल्या तुमच्यासारख्या हुशार मंडळींनी मात्र धीर न सोडता चिकाटीनं झगडत देशात राहावं, लोकांना नेतृत्व द्यावं, देशाचं भविष्य घडवावं, असं वाटतं म्हणून चौकशी करत होतो की देशाचे आधारस्तंभ असं देशांतर का करतात व देशाचं भविष्य अंधारात का ढकलतात, ते जाणून घेण्याकरता...''

त्याचा साळसूदपणाचा आव पाहून तिला यावेळी मात्र राग आला

नाही. मनात आलं, शिळोप्याच्या गप्पांत भावनेचे कढ कशाला? तिनं कुत्सित हसत म्हटलं, ''उत्तम, फार उत्तम सदिच्छा! जणू हलवायाच्या घरावर तुळशीपत्र!''

''डॉ. गायत्री खरंच आपलं दोघांचंही राहू दे. मला वाटत तुम्ही काय किंवा माझ्यासारखा क्षुल्लक स्वयंपाकी काय, आपण कशाला हे सारं मनाला एवढं लावून घ्यावं? नाही? मानवजात एकच आहे. आपण जगाच्या पाठीवर कुठेही सुखात असलो तरी त्यात गैर काय? त्यात अपराधीपणा कशाला वाटायला हवा?''

'' वा! म्हणजे मि. नायडू, स्वत:चा बचाव करण्यासाठी, स्वत:ची जबाबदारी टाळण्यासाठी स्वत:वर पाळी येताच लगेच तत्त्वज्ञानावर घसरलात एकूण!''

''घसरलो नाही, चढलो!'' के.के.नं ही कोटी केली आणि जोरानं हसला.

त्याच्या शाब्दिक विनोदाचं तिला अजिबात हसू आलं नाही. थोड्याशा कडवटपणानं तिनं म्हटलं,'' मानवजात एक आहे म्हटलं, की जगात कुठेही जाऊन वाट्टेल ती चैनबाजी करायला स्वत: मोकळे ! नाही? पण मि. नायडू, आम्ही सामान्य माणसं, तुमची आमची कुठे तुलना करता? तुम्ही करोडपती, रॉयल फॅमिलीतले! त्याउलट माझे वृद्ध आई-वडील, बालपणीच मेंदूची असाध्य व्याधी - सेरेब्रल पाल्सी झालेला माझा धाकटा भाऊ ... माझं सारं विश्व आजही माटुंग्यामधल्या त्या चाळीतल्या छोट्या डबलरूममध्ये आहे. बोलता बोलता काही क्षण स्वत:च्या भावविश्वात हरवली.

''डॉ.गायत्री, प्रश्न बचावाचाही नाही अन् जबाबदारी टाळण्याचाही नाही. प्रश्न ना गरिबीचा आहे, ना रॉयल श्रीमंतीचा. मी त्याच प्रश्नाकडे जरा वेगळ्या दृष्टिकोनातून तुमचं लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतोय, एवढचं! अखेर सुखात लोळणं हा काही गुन्हा तर नव्हे! सुखाबद्दल एवढी घृणा कशाला हवी? की मत्सरापोटी वाटते घृणा सुखी लोकांबद्दल? कशाला हवी देशभक्ती आणि तत्सम निष्ठांची जोखडं मानेवर? कशाला हवेत हे मातृभूमीच्या तथाकथित ऋणांचे साखळदंड? स्वत:ला कशासाठी छळून घ्यायचं असल्या तापदायक भ्रमामध्ये, मनाच्या क्रूर खेळीमध्ये? कशाला ही क्लेशदायी दडपणं स्वत:वरच लादून घ्यायची, स्वत:च्या बावळटपणातून?''

"मि. नायडू, आता तर तुम्ही एकदमच घूमजाव करताहात, अबाऊट टर्न करताहात... तुम्हीच तर आता समाजाचं दायित्व अन् देशाच्या गरजेबद्दल बोलत होता ना?" गोंधळून डॉ. गायत्रीनं विचारलं.

"डॉ. गायत्री, तुम्हाला समजवून घेण्याचा प्रयत्न करतोय मी. किंबहुना स्वत:लाही! तुम्ही इथं येण्यामागे तुमची कारणं सांगितली. मला माझी आहेत. इतरांना इतरांची कारणं असतील. पण मुद्दा असा आहे. की आपण करतो ते अपरिहार्य अन् म्हणून ते समर्थनीय आणि इतरांचं मात्र चूक, असाच नव्हता का निष्कर्ष निघत माझ्या विधानातून? अन् तुमच्या स्पष्टीकरणामधून? म्हणून मी वेगळ्या बाजूनं दृष्टिकोन मांडला. विचार करा. काहीजण देश, धर्म, समाज यांचे ऋण फेडण्याच्या कल्पनेमध्ये जखडल्यामुळे स्वदेशातच राहतात, तर काहीजण ही बंधनं तोडून अर्थार्जनासाठी परदेशी जातात. काहीजण सत्ता वा संपत्तीसाठी परदेशी जातात, प्रसंगी प्रतिकूल परिस्थितीशी लढून यशस्वी होतात, वसाहती करतात, तर घाबरट व बावळट लोक मनाला मुरड घालून मिळेल त्यात समाधान मानून स्वदेशी राहतात. याउलट काहीजण स्वदेशातल्या प्रतिकूल परिस्थितीपुढे शरणागती पत्करून परदेशी जातात. राहणाऱ्यांमधलेही काहीजण नैतिकतेच्या बंधनात जखडून मन मारून परिस्थितीचा असहाय्यपणे स्वीकार करतात. तर काहीजण परिस्थितीवर मात करण्याचा प्रयत्नात कधी यशस्वी तर कधी पराभूत होत लढत राहतात. जितके लोक तितक्या तऱ्हा! शिवाय आज आहेत तसे ते उद्या असतील असंही नाही. त्यामुळे दोषारोप आणि गुणगौरव दोन्हीही भ्रामकच ठरत नाहीत का? उदात्तता, स्वार्थांधता हेदेखील अखेर शब्दच नाहीत का? कधी अज्ञानापायी तर अधी अन्य कारणाने कोणत्याही संदर्भात कसेही वापरले जाणारे? वास्तविक आपण सारे स्वत:च्या सुखासाठी पटेल, आवडेल, जमेल ते करतो ... हे खरं नाही का? त्यातून समाजद्रोह किंवा समाजघातकी कामं करणाऱ्यांची गोष्टच निराळी. आपण तसं करीत नाही. आपल्या रोजच्या व्यवहारातून जिथे राहू त्या समाजाला सुखी करण्यात खारीचा वाटा उचलतो ना? मग समर्थनाची किंवा अपराधी भावना बाळगण्याची गरजच कुठे आहे? ... बरं, ते असो इथं तरी तुम्हाला आता काही त्रास नाही ना?

"प्रश्न त्रासाचा नाही मि.नायडू. तुमच्या देशप्रेमाच्या संकल्पना आमच्या हाडीमाशी भिनलेल्या असताना आम्हाला आचरणासाठी अशक्य

आहेत, आणि तुमच्या तथाकथित मुक्तीच्या, स्वैरानंदाच्या कल्पना आमच्या अवाक्याबाहेरील आहेत. ... आम्ही तेवढे उच्च नाही किंवा निर्लज्जही नाही. मानवजात एक आहे म्हणून सुखात लोळायला आम्ही आलेलो नाही अन् आम्हाला ते जमणारही नाही. याउलट घर-दार, आपली माणसं, समाज, आपलं वातावरण-संस्कृती, देश या सर्वांची आम्हाला अत्यंत ओढ असूनही या साऱ्या बाबी आमच्यापासून ओरबाडून काढल्याहेत नियतीनं... त्यांची कायम हवीशी वाटणारी मायेची पाखर आम्हाला मिळत नाही... समर्थन नाही... आत्मप्रौढी नाही... अपराधीपणाची भावना नाही आहे. फक्त न संपणारी ही खंत सल उरात बाळगून असहाय्य फरफट सहन करीत कसंबसं टिकवलेलं अस्तित्व!

"म्हणजे तुम्ही इथंही सुखी नाही?"

"अर्थातच! पण प्रश्न सुखाचा नाहीच मुळी! फक्त सर्व्हायव्हलचा आहे."

"डॉ. गायत्री, हे सारंच कसं विलक्षण आहे! पण मग स्पेन, पोर्तुगाल वगैरे देशांतून सोन्याच्या शोधात लॅटिन अमेरिकेत पोचलेल्या आणि इंग्लंड, हॉलंड, फ्रान्समधून सत्ता व संपत्तीच्या शोधात आशिया, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, अमेरिका वगैरे ठिकाणी पोचलेल्या व तिथे आयुष्य घालवणाऱ्या यशस्वी-अयशस्वी लोकांचं काय? कळत-नकळत प्रत्येक जण स्वतःच्या सुखासाठी आणि सोयीसाठी स्वतःच्या कुवतीप्रमाणे धडपडत असतो..." अन् तोच मुद्दा गायत्रीच्या गळी उतरण्याचाच त्याचा प्रयत्न होता. पण गायत्रीने त्याला दाद दिली नाही. तावातावानं तिनं म्हटलं, "मि.नायडू, मी इतक्या प्रांजळपणानं माझी व्यथा उघड करतेय ... पण तुम्ही नुसते फाटेच फोडत बसलाय! तुम्हाला फक्त काथ्याकूट करायची खाज आहे. तुमचा काथ्याकूट तुम्हाला लखलाभ असो. इतरांच्या जीवनाची चिरफाड करण्यात तुमच्याप्रमाणे मला स्वारस्य नाही. तुम्ही माझ्याबद्दल विचारलंत, त्याला मी प्रामाणिकपणे उत्तर दिलं. थोडा दुय्यम दर्जा असला, आप्तेष्टांपासून तुटावं लागलं तरी सरळ मार्गानं चिमणा-चिमणीचा संसार करतो तेवढं आम्हाला पुरेसं आहे. आमची लायकीही तेवढीचं! पण मि.नायडू इतरांच्या अंतरंगाची, भावनांची, सुखदुःखांची इतक्या अलिप्तपणे चीरफाड करीत स्वतः मात्र नामानिराळे राहून मुर्दाडपणे जगताना तुम्ही तरी सुखी आहात?"

तिच्या खोचक प्रश्नावर स्वत:शीच थोडंसं गंभीरपणे हसत के.के. उत्तरला, "तुमचा सवाल मार्मिक आहे खरा! ना जनाची, ना मनाची, सगळी लाज, सगळी बंधनं नसल्यानं मी सुखात असायला हवं हा प्रतिवाद तर्कसंगत आहे. पण वास्तव नाही! माझा प्रश्न आहे स्वत:ला जाणण्याचा, स्वत:चा प्रत्यय घ्यायचा. आत्माविष्काराचा, सेल्फ एक्स्प्रेशनचा!" मग थोडं थांबून त्यानं त्याची स्वत:ची पार्श्वभूमी तिला थोडक्यात कथन करून म्हटलं, "स्वत:शी मी प्रामाणिक आहे की नाही? असायला हवं होतं की नको? किती प्रामाणिक आहे? हे मला माहीत नाही. ते काळच ठरवील..."

डॉ. गायत्री अचानक बदललेल्या त्याच्या रागरंगानं पुन्हा गोंधळली. बोलण्याच्या भरात आपण कुठे येऊन पोचलो? इतका काथ्याकूट झाला तरी पुन्हा प्रश्न आहेच! कसला आत्मशोध, कसाला आत्माविष्कार? कोणतीही समस्या नसताना सुख हिरावून घेणारी अशीही काही समस्या असू शकते का? नव्या समस्यांचा चक्रव्यूह निर्माण करणारी? त्याक्षणी प्रथमच तिला जाणवलं की, त्याच्याबरोबरचा काथ्याकूट निरर्थक नव्हता!

तेवढ्यात विमान उतरण्याची सूचना दिली गेली तसे दोघांनी आपापले बेल्टस् पुन्हा बांधून घेतले. पण तिच्या मनात एकच बाब भरून राहिली, "देअर इज डेफिनेटली समथिंग मोअर डु व्हॉट ही टॉक्ड!" नकळत तिच्या मनातील कटुत्वाची जागा अनामिक कुतूहलानं घेतली. तिनं स्वत:चं व्हिजिटिंग कार्ड के.के.ला दिलं आणि संपर्क ठेवण्याची विनंती केली.

त्यानंही स्वत:चं कार्ड देऊन संपर्कात राहण्याची इच्छा व्यक्त केली.

"आय ॲम सॉरी फॉर..."

दोघंही एकदमच म्हणाले! बोलण्याच्या भरात परस्परांना दुखावल्याचा दोघांनाही खेद वाटला होता. "असं बोलत नाही मी अपरिचित व्यक्तीशी. एवढ्या प्रांजळपणे ... आणि एवढ्या लगटपणे..." डॉ. गायत्री सौम्यपणे म्हणाली.

" छे: छे:, मीच तुम्हाला मन:स्ताप दिला. नको त्या वैयक्तिक बाबींमध्ये नाक खुपसून... मला माफ करा. आय अपोलोजाइज" के.के. नं हळुवारपणे तिची माफी मागितली.

काही क्षण दोघेही गप्प बसल्यावर डॉ. गायत्रीनं म्हटलं, "मि.नायडू, एका अर्थी झालं ते बरंच झालं. आत्ता मला जाणवतंय की प्रत्येक छोट्या

छोट्या गोष्टीला किती कंगोरे असतात. किती विविध पैलू असतात. अगदी साध्या भासणाऱ्या बाबीही किती गुंतागुंतीच्या असतात. तुमच्या त्या आत्मशोधाबद्दल मात्र अजून साशंक आहे मी... पण आत्मपरीक्षणाला एक नवं परिमाण मिळालं, एक वेगळी दिशा मिळाली एवढं नक्की!''

के.के.नं त्यावर काहीच उत्तर दिलं नाही. त्याच्या मनात विचित्र कल्पना तरळली. कुणी सुख वाटतो, कुणी दुःख वाटतो... आपण लोकांना प्रश्न वाटतोय! कुणी दुसऱ्याला आशा देतो, कुणी निराशा, आपण इतरांना ना आशा देत, ना निराशा! पण आशेनिराशेविषयी निसर्गानं काय वाढून ठेवलंय सर्वांसाठी?...

■

विमान स्थिर होऊन पट्टे सोडण्याचा संदेश आला तसे दोघेजण पट्टे सोडून आपापल्या बॅगा घेऊन ट्रॅन्झिटकडे आले. हवाई सुंदऱ्यांनी निरोपादाखल केलेल्या 'बाय बाय' ला प्रतिसाद देऊन ट्रॅन्झिटमधून बाहेर आले.

त्यांना पाहताच चाळिशीच्या घरातला, अगदी गव्हाळ रंगाचा एक चष्मेवाला गृहस्थ लगबगीनं त्याच्यापाशी आला.

''हाय शंभू...''

''हाय गायत्री, ट्रिप कैसी रही?'' तिच्या हातातली बॅग घेत त्या इसमानं विचारलं.

''वंडरफुल. बहोत अच्छी. घर मे सब कैसे है?''

''सब ठिक है।'' मग गायत्रीनं आळीपाळीनं दोघांकडे पाहत ओळख करून दिली. ''मि.नायडू, शेफ अ‍ॅट चार्लस्टन अ‍ॅण्ड मि.शंभू माथूर माय हजबंड''

''शंभू? शंभूनाथ माथूर? मघापासून माझ्या डोक्यातच आलं नाही की शंभू माथूर म्हणजे तू आहेस.'' त्याच्याकडे निरखून पाहत आश्चर्यानं के.के. ओरडला.

गोंधळात पडलेल्या शंभूंना आठवेना की याला आपण केव्हा भेटलो... मग अचानक आठवून तोही एकदम ओरडला,'' ''अरे ... के.के.? ओ नो! व्हॉट अ सरप्राइझ! सिडनेला सिल्व्हरपॅलेसमध्ये भेटलो होतो आपण बरोबर?''

"करेक्ट! मग आता इथं कसा? शंभू टाइम्स चेंज ॲण्ड सिच्युएशन्स टू! काळ बदलतो तशी परिस्थितीही बदलते." मोठ्यानं हसत के.के. म्हणाला.

"गायत्री! मी ऑस्ट्रेलियाला गेलो होतो ना कंपनीच्या कामाकरिता, तेव्हा तिथल्या वास्तव्यात केवळ के.के. होता म्हणून टिकू शकलो मी! ह्याच्या पाककौशल्याने जगवलं मला!"

शंभूला मध्येच तोडत के.के.नं म्हटलं, "फरगेट इट! कुणी कुणाला जगवत नाही... एनी वे ... भेटलास खूप बरं वाटलं. आपण जरूर भेटत जाऊया सवडीप्रमाणे, ओ.के.?" मग घड्याळ बघत, "नाऊ यू हॅव टु एक्स्यूज मी." म्हणून त्यांचा निरोप घेतला. त्याचक्षणी डॉ. गायत्रीकडे लक्ष जाताच डॉ. गायत्रीच्या डोळ्यांतला निष्कपट भाबडेपणा आणि निरागसता त्याला एका दृष्टिक्षेपातच जाणवली. तिचं ते आणखीच वेगळं रूप पाहून तो हेलावला! टॅक्सीत बसताच त्याच्या मनात आलं, "महाराज", किती विलक्षण शब्द आहे हा! शंभूला खाऊ घालणारा आपण स्वयंपाकी; महाराज, आपले तातामहाराज सत्येंद्रही महाराज, संतश्रेष्ठ माणिक प्रभूही महाराज, एअर इंडियाच्या एम्ब्लेमवरचा वाकून उभा राहिलेला देखील महाराज आणि उघड्या-बोडक्या शरीरावर निथळणारा घाम टिपत, विड्या ओढत सामान्य हॉटेलातल्या अंधाऱ्या मुदपाकखान्यात राबणारेही महाराजच! सारेच महाराज!

■

चार्लस्टनहून के.के. निघाला त्यावेळी सायंकाळचे आठ वाजले होते. तेव्हापासून सॅनफ्रान्सिस्कोला पोचेपर्यंत तीन तास होऊनही गेले होते. पण इथली घड्याळं तीन तास मागे असल्यानं अजूनही आठ वाजल्याचं दाखवीत होती!

हॉटेलमध्ये आल्यावर के.के.नं पहिल्याप्रथम शॉवर घेतला आणि तो निवांतपणे कॉटवर येऊन पडला. कॉटवर पडल्या पडल्या डॉ. गायत्रीबरोबरच झालेल्या गप्पा आणि शंभू माथूरच्या भेटीमुळे, नकळत त्याची स्मृती गेल्या सोळा वर्षांचा कालपट उलगडत ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, जर्मनी, मद्रास असे टप्पे पार करीत सोमनिलयमच्या कुशीत शिरली... पहाडातले मूळचे रहिवासी म्हणजे आदिवासी. डोंगरदऱ्याशी कडेकपारींशी आणि वनस्पती प्राण्यांशी

एकरूप होऊन गेलेले आदिवासी. घनदाट जंगलात राहणाऱ्या आदिवासींचं बोलणं, चालणं, वागणं, वावरणं, रीतीभाती सगळंच विलक्षण होतं. आदिवासींमध्येही अनेक टोळ्या होत्या आणि वेगवेगळ्या टापूत विखुरलेल्या ह्या टोळ्यांमध्येही पुष्कळ फरक होता.

त्याच्या तातानी वेळोवेळी या आदिवासींच्या अनेक मनोरंजक तशाच चटका लावणाऱ्या कहाण्या त्याला सांगितल्या होत्या. सुरुवातीच्या काळात... म्हणजे तातांच्या बालपणी आदिवासी शहरात फारसे येतच नसत. कंदमुळं, फळफळावळ, मोरपिसं, हस्तिदंत, वाघासांबरांची कातडी, नखं, शिंग, औषधी वनस्पती... हेच त्यांचं जीवन होतं. क्वचितच यातल्या विविध



वस्तूंच्या मोबदल्यात शहरातील कपडेलत्ते, नवी हत्यारं, भांडीकुंडी नेण्यासाठी ते शहरात येत. सोमनिलयमचे किंवा इतर कुणा राज्याचे कायदेकानू व धार्मिक बंधनं आदिवासींना लागू नव्हती. त्यांच्या टापूमध्ये जाण्यासाठी सुध्दा त्यांची संमती आवश्यक असे. सोमनिलयम राजवटीबरोबर आदिवासींचा नेहमीच सलोखा होता.

परंतु १८६४ मध्ये सोमनिलयमचा पाडाव केल्यानंतर मात्र युध्दात सोमनिलयमच्या राजाला मदत केल्याचं निमित्त करून इंग्रजांनी आदिवासींचे अनन्वित हाल केले. ब्रिटिशांच्या अंमलात जंगलांची नासधूस झाली. स्वत:च्या बायकांचे चोचले पुरवण्यासाठी वाघ, अस्वल, हरीण, हत्ती, ससे, सांबर, साप, अजगर... मिळेल त्या प्राण्याची ब्रिटिशांनी शिकार केली. आदिवासींचं जिणंच अशक्य करून टाकलं! प्रतिकार करणाऱ्या आदिवासींची क्रूर कत्तल करण्यात आली.

यातल्या पुष्कळ आदिवासींनी ब्रिटिश तळावर छापे मारून थोडाफार सूड उगवला खरा पण ब्रिटिशांनी ह्या जमातींना चोर, लुटारू, बेरड जमाती म्हणून घोषित करून त्यांच्या अस्तित्वावरच निर्णायक घाव घातला. त्यांना संपूर्ण निराश्रित, असहाय, उद्‌ध्वस्त केलं.

त्याचे ताता त्याला सांगत,''एकेकाळी जंगलचे राजे असलेल्या आदिवासींना इंग्रजांनी प्रथम लक्ष्य बनवण्याचं कारण म्हणजे ते लढवय्ये होते. स्वतंत्र बाण्याचे होते. इंग्रजांनी त्यांचं जिणं मुष्कील केल्यामुळे आदिवासींचं जीवन - मरण, त्यांचा आचार - विचार, त्यांची अब्रू इंग्रजांच्या ताब्यात आली. त्या कत्तलीचा, त्या बलात्कारांचा, त्या धर्मांतरांचा, त्या लादलेल्या लाचार असहायतेचा इतिहास लिहिला गेला नाही!''बोलता बोलता त्यांचा स्वर कातर होत असे.

''जंगलतोड, प्राण्यांच्या कत्तली, कायमची असुरक्षितता यामुळे आदिवासी देशोधडीला लागले. त्यांची उदरनिर्वाहाची साधनंच संपली. आता जे आदिवासी जंगलात राहतात ते बरबाद झाले आहेत. भीक मागून, वेठबिगारी करून किंवा जंगलातल्या उरल्यासुरल्या सामग्रीवर कसंतरी जीवन कंठत आहेत!''

तातांचे आदिवासींविषयीचे ते प्रेम आठवून त्याला भरून आलं. त्याच्या नजरेसमोर ब्रिटिशांच्या नासधुशीनंतरही शिल्लक असलेली ती

सोमनिलयमची झाडंझुडपं, ते झरे, ते अधूनमधून आढळणारे मोर दृष्टीपुढे उभे राहिले.

रपेटीला गेल्यावर दिसणाऱ्या आदिवासींच्या त्या झोपड्या, लक्तरांतले त्यांचे ते अर्धनग्न देह,शहरातल्या माणसांविषयी त्यांना दिवाभीतांप्रमाणे वाटणारा बुजरेपणा, भीती नि दुरावा सारं त्याच्या नजरेसमोर आलं. स्वत:चीच वस्त्रं फेडून कुणीतरी अब्रू घेतोय, आपल्यावरच धर्मांतराची नामुष्की लादतोय, आपणच अब्रू वाचवण्यासाठी ऊर फुटेपर्यंत पळतोय, आपल्याच बायकापोरांवर आपल्या नजरेसमोर अत्याचार होताना आपल्याला असहायपणे पाहवं लागतंय... शारीरिक वेदना आणि नामुष्कीच्या यातनांनी आपणच विव्हल झालोय, असा त्याला भास झाला... त्याच्या छातीत तीव्र कळ उठली.

एकदम त्याच्या मनात आलं, आपण अन्याय स्वत:वरही केला अन् इतरांवरही. सोळा वर्षं छळ केला... छळ ... स्वत:चा आणि इतरांचाही! सॅडिस्ट आणि मॅसोकिस्ट आहोत आपण! तातांबरोबर स्वत:च्या मर्यादेत राहून जमेल तेवढी लोकसेवा करीत राहण्याची आणि सुखानं कौटुंबिक जीवन जगायची व्यावहारिक अक्कलही आपल्याला सुचली नाही, आणि आत्मज्ञानाधिष्ठित नव्या राजधर्माचं आव्हान पेलण्याची प्रतिभा - प्रज्ञा अन् सामर्थ्यही आपल्याला प्राप्त झालं नाही! तो उद्वेगाने उठला, त्याचं डोकंही आता ठणकू लागलं. पुन्हा तोच जुना प्रश्न भंडावून सोडू लागला. या आयुष्याच्या ठिकऱ्यांचा अन्वयार्थ कसा लावायचा? काय होणार या जीवनाचं? व्यावहारिक शहाणपणा करून आपण का राहिलो नाही. सोमनिलयमला, तातांची मर्जी राखून? काय मिळवलं तथाकथित माणुसकीचा भ्रामक गंड पोसून? काय दिलं आपण स्वत:चा अहंकार पोसताना इतरांना वा स्वत:ला? यातना दिल्या आणि यातना भोगल्या. अचानक दुसऱ्या क्षणी त्याला जाणवलं की यातना काही युध्दात झोकून देणाऱ्यांनाच होतात असं नव्हे, चूलकोंबड्यांनाही होतात! मरण जटायूलाचं येतं असं नाही, पिंजऱ्यातल्या पोपटांनाही येतं! अपघात घोडदौड करणाऱ्यांना किंवा अवकाशयानानं जाणाऱ्यांनाच होतात असं नाही, बाथरूममध्ये घसरून पडणाऱ्यांचीही हाडं मोडतात! आपल्या वेदना सोमनिलयममध्ये राहून टळल्या असत्या असं मुळीच नाही! मुळात वेदना की सुख हा प्रश्नच पडता

नये. जीवनाच्या हेतूला महत्त्व आहे. स्वत:शी प्रामाणिक राहण्याला आहे. सुख किंवा वेदना चोरी करतानाही होऊ शकतात अन् अन्यायाचा प्रतिकार करतानाही! आणि त्याच क्षणी त्याला जाणवलं की समुद्रात पोहणाऱ्याला डबक्यातली सुरक्षितता आणि काठांचा आधार वारंवार मिळत राहत नाही. भुयार खणणाऱ्याला उतावीळ होऊन चालत नाही. ढेकूळ फोडण्याप्रमाणे भुयार एक दोन घावात खणून होत नाही. नव्या राजधर्माचं किंबहुना आत्मप्रचीतीचं आपलं आकलन वैयक्तिक सुखदु:खाच्या फटक्यांनी आणि सामाजिक दुरवस्थेच्या वज्राघातांनी जर्जर होतं, हे खरं. पण म्हणून, संकुचित स्वार्थ श्रेष्ठ ठरत नाही. या क्षणी आपले विचार, आपलं जीवन वांझोटं ठरलं तरी आत्मप्रचीतीशिवाय जगणं हे जगणंच नाही, त्यामुळे त्या निर्जीवतेचा स्वीकार श्रेयस्कर ठरणं कदापि शक्य नाही.

निर्धारानं त्याचे डोळे चमकले. त्यानं खिडकीतून बाहेर पाहिलं. पलीकडे एका उद्यानात पुष्कळ मुलं खेळत होती. गोऱ्या मुलात काही काळी मुलंही होती. मार्टिन ल्यूथर किंगसारख्या नेत्यांनी, जॉर्ज वॉशिंग्टन, कार्व्हर-सारख्या बुध्दिमंतांनी आणि अर्थातच असंख्य हुतात्म्यांनी काळ्यांना हे स्थान प्राप्त करून दिलं होतं. त्याच्या मनात आलं, आपल्याकडच्या आदिवासींमधूनही नेतृत्व तयार व्हयला हवं. त्या क्षणी त्याला कामिनीच्या पत्रातील रघुरामच्या मुलाबद्दलचा हनुमंताबद्दलचा मजकूर आठवला. त्या मजकुराचा अर्थ सोपा होता. हनुमंता डाव्या विचारसरणीच्या आहारी गेला होता. कष्टकरी - मजूर - कामगारविरुध्द जमीनदार - भांडवलदार या वर्गलढ्यात तो सहभागी व्हायला उतरला होता. एका दृष्टीनं पाहिलं तर त्यात वावगं असं काहीच नव्हतं. उलट गरिबीच्या चटक्यांनी पोळल्यानं अन्यायाविरुध्दच्या संतापानं पेटून उठलेल्या संवेदनाक्षम तरुणाकडून याहून आणखी कोणता वेगळी अपेक्षा ठेवता आली असती?

के.के. ला त्यावेळच्या चळवळीत अनेक दोष आढळत होते. नकळत त्याचे विचार भारतातल्या कष्टकरी चळवळीकडे वळले. त्याला दोषपूर्ण लढा नको होता. त्याची खात्री झाली होती की गरीब आणि श्रीमंत हा लढा लढवल्यामुळे मूल्यसंभ्रमच निर्माण होईल. सर्व समाजवादी राष्ट्रात अशा मूल्यसंभ्रमामुळे अनागोंदी माजेलच पण त्याचबरोबर समाजवादातील अत्यंत उदात्त संकल्पनांच्या गळ्याला त्यामुळे नख लागेल. त्यांच्या जगभरातल्या

डाव्या पक्षांना व गटांना ही बाब उमगत नव्हती. त्यामुळे हनुमंताला जर ही बाब कळली नाही तर त्यात फारसं आश्चर्यकारक असं काहीच नव्हतं. पण वेगानं जगाला ग्रासणाऱ्या राक्षसी वृत्तीचा मुकाबला करण्यासाठी समाजवादी, साम्यवादी, धर्मवादी, उदारमतवादी अशा साऱ्या चळवळींचं आत्मज्ञानाधिष्ठित सदसद्‌विवेकवादी चळवळीत स्थित्यंतर होणं त्याला अत्यंत महत्त्वाचं वाटत होतं. ऊर्ध्वगामी क्रांतीची त्याला स्पष्ट चाहूल लागलेली होती. लोकशक्तीच्या आत्माविष्काराच्या रूपात, समेष्टी योगाच्या रूपात त्याला क्रांती हवी होती. जे जे अभिजात व उदात्त आहे ते जोपासून विशाल दृष्टिकोन, मनाचा मोठेपणा, प्रेम, सहिष्णूता, सहकार्य, उत्साह, तत्परता, स्वयंशिस्त, समरसता, सद्‌बुध्दी, कला आदी गुणांवर आधारलेली व हे गुण जोपासणारी क्रांती त्याला हवी होती. सामूहिक स्वार्थावर आधारलेली, ऐहिक सुखाचा हव्यास पोसणारी, ऐदी वृत्ती वाढवणारी आणि झुंडशाहीला खतपाणी घालणारी चळवळ हे साध्य करू शकत नव्हती. अशा चळवळीचं, त्याला परिवर्तन व्हायला हवं होतं.

के.के.च्या मनात आलं, हनुमंताच्या म्हणजेच आदिवासी कष्टकऱ्यांच्या जीवनात जगण्यासाठी संघर्ष असतो, आव्हान असतं. आपलं तसं नाही. मग आपल्या या जाणिवा, आपल्या कल्पना, आपलं चिंतन यांना त्यांच्या चळवळीत स्थान कसं मिळू शकेल? किंबहुना आपण तशी अपेक्षादेखील कशी काय करू शकतो? त्यांची ती अस्तित्वाची लढाई आणि आपली ही असंकुचित अवैयक्तिकतेची लढाई यामध्ये संबंध कसा निर्माण करायचा? त्यांची धडपड आणि आपली दृष्टी यांची सांगड कशी घालायची? अशी सांगड बसेल का? या दोन्ही बाबी परस्परपूरक तरी आहेत का? परस्परपूरकता ... परस्परपोषकता... अचानक त्याच्या डोक्यातला गुंता सुटला आणि लख्खकन् प्रकाश पडला. सगळं ओझं निघून गेलं, शीण दूर झाला. अंगी नवचैतन्य संचारलं. आनंदाच्या अनोख्या अनुभूतीने तो रोमांचित झाला. जणू काही त्याच्या अंत:करणाच्या खोलवर गाभ्यातून शब्द उमटले... लाखोंचा मुक्तिलढा आशयघन कर... क्षणात त्याला जाणवलं की हजारो वर्षांचा काळ, हजारो मैलांचं अंतर, प्रचंड शक्तीची रूपं हे सारं काही दुबळ्या देहबुध्दीच्या संवेदना आहेत! ज्याक्षणी देहबुध्दी सुटते, त्याच क्षणी अशक्य ते शक्य होतं! कोणत्याही क्षणी अंतरंगात आत्मज्ञानाचे हजारो सूर्य प्रकाशू

शकतात, दुसऱ्याच क्षणी ते कष्टकऱ्यांच्या जीवनात मुक्तीची पहाट आणू शकतात. लाखो मैलांचे आणि संस्कृतीचे अडसर पळभरात मोडून पडतात! पुन्हा त्याला कामिनीच्या पत्रातल्या त्या ओळी आठवल्या. त्याला जाणवलं, स्वत:शी प्रामाणिक राहणं हेच आपलं कार्य आहे. आज त्याचं फलस्वरूप हे अमेरिकेतलं वास्तव्य आहे. उद्या त्याचं स्वरूप सर्व कल्पनांच्या अतीत असू शकेल. कामिनीनं सूचित केल्याप्रमाणे आणि आपल्याला अलीकडे वाटू लागलंय त्याप्रमाणे सर्वांना एकत्र आणणारं असेल. ते मुळीच अशक्य नाही! नवा राजधर्म आणि कौटुंबिक वैयक्तिक जीवन दोन्ही कृतार्थ होतील तेव्हा! अखेर, डॉ. गायत्रीला म्हटल्याप्रमाणे ... आत्मप्रचीतीच्या, कळत-नकळत कधी सुरक्षित तर कधी ठेचकाळत चाललेल्या प्रवासात आज जे आहे ते उद्या नसेल! आदिवासींच्या विचारानं, किंवा कुटुंबियांच्या आठवणीनं तळमळणं हे मायेचंच द्योतक आहे! अविद्येचं लक्षण आहे! निशासूक्ताची आळवणी आहे. तसला दुबळेपणा नको!सामर्थ्यवान सच्चिदानंद अनुभवून त्याची प्रचीती घेऊन तीच वाटायची! ॐ! ॐ नमो व्यंकटेशाय! ॐ नमो नारायणाय! स्वत:शीच तद्रूप झालेल्या धीरगंभीर के.के.ची प्रज्ञा आत्मघृणा आणि आत्मश्लाघेच्या पलीकडे झेपावली. यापुढे तळमळ नको, खंत नको, उदो उदो नको... नको! सामर्थ्य आणि प्रकाश अनुभवायचा. तेच सामर्थ्य आणि तोच प्रकाश वाटायचा. तेच उत्तर आहे!

■

कॅलिफोर्नियामध्ये के.के. पोचला, त्यावेळी सोमनिलयममध्ये दुसऱ्या दिवशीच्या सकाळचे आठ वाजले होते. दिवस उन्हाळ्याचेच होते. त्यामुळे सकाळी आठची वेळ असूनही हवेत हळूहळू गरमी येत होती. त्यामुळे सकाळचा गारवा ऊबदार बनू लागला होता. राजवाड्याचा परिसरदेखील हळूहळू तापत होता.

सोमनिलयम संस्थान लहानसं असलं तरी या संस्थानच्या राजवाड्याच्या चारीबाजूंनी मात्र प्रचंड मोठं आवार होतं. या आवारातच पिछाडीला नोकरचाकरांच्या बराकी होत्या. पूर्वीच्या मानानं आता नोकरचाकर जवळजवळ उरलेच नव्हते. त्यामुळे या बराकीतील माणसांचा वावरही नाममात्र राहिला होता. महसुलाचं उत्पन्न मिळेनासं झाल्यामुळे आणि पुढे कूळकायद्यानंतर खंडाचं उत्पन्नही घटल्यामुळे बराकींची निगा राखली जात नव्हती.

डागडुजीच्या अभावी पडझड सुरू झाली होती. काही खोल्या पडून तयार झालेल्या ढिगाऱ्यावर गवत वाढलं होतं. तिथे साप - सरडूकांनी आणि वटवाघळांनी वस्ती केली होती.

घोड्यांची पागा सांभाळणारा रघुराम आणि राणी अम्माची सेवा करणारी त्याची पत्नी सीताबाई या बराकीतल्याच अजून शाबूत असलेल्या भागामध्ये एका खोलीत राहत.

रघुरामच्या तिन्ही मुलींची लक्ष्मी, अंबा आणि पार्वती यांची लग्नं झाल्यानंतर त्या आपापल्या सासरी गेल्या. आता या खोलीत रघुराम, सीताबाई आणि धाकटा मुलगा हनुमंता तेवढे राहिले.

महाराज सत्येंद्रांच्या छत्रछायेखाली आपण आहोत ह्या भावनेनं ते इमानी जोडपं, त्या पडक्या बराकीतल्या निवाऱ्यात देखील आगळ्याच समाधानात राहत होतं.

घरासमोर त्यांनी एक आडोसा बनवून त्यात न्हाणीघर थाटलं होतं. दारासमोरच रघुरामनं स्वत: मातीचा काला करून छोटंसं तुळशीवृंदावन बांधलं होतं. रोज पहाटे उठून सीताबाई घरासमोरच अंगण स्वच्छ झाडून वृंदावनासमोर सारवून रांगोळी घालत असे. समोर शेवग्याचं झाड होतं. त्याच्या शेंगांचा झुणका कमलेंद्रगारूंना फार आवडे. एकदा तर ते स्वत: घरी येऊन झुणका-भाकर खाऊन गेले होते. घराच्या दरवाजावर इडापिडा टळावी म्हणून एका मांत्रिकाकडून रघुरामनं एक चक्र रंगवून घेतलं होतं आणि वर एक लिंबू आणि मिरचीही बांधली होती.

खोलीमध्ये आत शिरताच एका बाजूला चूल तर दुसऱ्या बाजूच्या कोपऱ्यात देव होते. एका बाजूला खाटलं होतं.

सीताबाईनं म्हटलं, "आज हनुमंताला उशीर कसा झाला एवढा?" रघुराम काही बोलणार एवढ्यात पलीकडे हनुमंताची चाहूल लागली. जास्वंदी, कण्हेरी, कोरांटी, अनंत अशी अनेक झाडं कुंपणात लावल्यामुळे पलीकडचं माणूस पटकन दिसत नसे. पण हनुमंताची चाहूल ओळखीची होती. फाटकातला बांबूचा आड ओलांडून कुंपणात शिरताच हनुमंता किरकिरला, "हे घर नव्हे, गोठा आहे, गोठा." आल्या आल्या त्याला खेकसताना पाहून रघुरामच्या कपाळाला आठ्या पडल्या. सीताबाईही खट्टू झाली. तिचाही चेहरा पडला.

"असू दे, धड मिसरूड फुटली नाही तर बापजाद्यांची अब्रू काढू लागलास! चार दीडक्याही कमवत नाहीस तरी घराला गोठा म्हणू लागलास!" मग पाण्याचा लोटा उचलून एक घोट पाणी पिऊन थोड्या सौम्य स्वरात त्यानं म्हटलं, "आल्या आल्या हातपाय धुवून अम्मानं एवढ्या प्रेमानं शिजवलेले चार घास खायचे सोडून त्रागा कशाला करतोयस?"

"पण नायना!" हनुमंता आपल्या बापाच्या वाकलेल्या पाठीकडे बघत म्हणाला, "मी अब्रू नाही काढत बापजाद्यांची, पिढ्यान्‌पिढ्या राबलात तुम्ही. अन् राबवणाऱ्यांनी मात्र तुमचं रक्त शोषलं त्याची चीड येतेय मला." मग बापाच्या पाठीकडे निर्देश करत त्यानं म्हटलं, "तुमची ही कणाहीन गुलामाची वृत्ती आणि त्यांची ती रक्त शोषणारी, लचके तोडणाऱ्या लांडग्याची वृत्ती... असहाय होते मला! आणि नायना हे समजायला वयही नाही आणि पैसे कमावणं देखील लागत नाही!"

"हनुमंता, कुणाला बोलतोयस हे? तोंड आवर!" एकदम ताक घुसळायचं थांबवून सीताबाई त्याच्यावर खेकसली.

"अम्मा तुला नाही कळायचं माझं बोलणं! तुम्हा दिवाभीतांना स्वातंत्र्याची किरणं कशी सहन होणार? बरं बोललेलंही वाईट दिसतं तुम्हाला. डोक्यात अडाणीपणाचा काळोख आणि हाडीमासी गुलामगिरीची काजळी!"

त्याच्या पुस्तकी बोलण्यानं सीताबाई गोंधळली. पण तरीही त्यातला उपहास तिच्या जिव्हारी झोंबला. "बोल, तोंडाला येईल ते बोल. चार बुकं वाचलीस, शिंग फुटली तुला. आम्ही अडाणी... आजवर राजवाड्यात उणंदुणं ऐकावं लागलं नाही, आता तू कर सगळी भरपाई!"

"खरं ते बोलतोय... तोंडाला येईल ते नव्हे! गुलामीच्या लक्तरात रखडतोय आपण पिढ्यान्‌पिढ्या, हे कळत नाही तुम्हाला, म्हणून करतोय डोकेफोड." त्याचा दृष्टिक्षेप तिच्या फाटक्या लुगड्यावर असल्यानं सीताबाईला तो त्याच्याबद्दल बोलतोय असा गैरसमज झाला. ती आणखीनच दुःखी झाली. "ही लक्तरं निदान लाज राखतायत. महाराजांच्या कृपेनं अब्रूनीशी संसार केला. मुलींची लग्नं केली. सगळी सुखं कुणाला मिळतात?" तिच्या डोळ्यात पाणी आलं.

"अम्मा! जितकं त्यांनी तुमच्यासाठी केलं, त्याच्या शंभरपट तुम्ही केलंय त्यांच्यासाठी... आणि तरीही ते वाट्टेल त्या मनमानीला मोकळे आणि

आपण मात्र प्रत्येक घासाला त्यांचे मोताद... म्हणून म्हणतोय गुलामीची लक्तरं... अंगावरच्या कपड्यांचं नाही बोलत!'' हनुमंतानं कळवळून तिला समजवण्याचा प्रयत्न केला.

''ही सगळी पूर्वजन्मीच्या कर्माची फळं आहेत! ज्याचं-त्याचं प्रारब्ध असतं! कुणी राजा कुणी प्रजा! सगळेच कसे राजे होतील?''

तिच्या त्या गावंढळ आणि मठ्ठ समजावण्यानं हनुमंता आणखीच भडकला! पण तिच्या डोळ्यातलं पाणी बघून तो एकदम गप्प राहिला.

''हे बघ हनुमंता, आता ही बाचाबाची पुरे. एवढा मोठा न्याय-अन्यायाचा विचार आम्हाला कळत नाही. आम्ही नाकासमोर चालणारी अडाणी माणसं. तू शिकला - सवरलास की कर तुला पटेल ते. आमची उणीदुणी काढण्यात काय पुरुषार्थ आहे?'' सीताबाईच्या डोळ्यातलं पाणी बघून रघुराम खिन्नपणे म्हणाला.

हनुमंताला आपण दगडावर डोकं आपटल्यासारखं वाटलं. दगड न फुटल्याची तीव्र चीड आली-आणि डोकं फुटल्याच्या मरणप्राय वेदना! ज्यांच्यासाठी तो अंतर्बाह्य खदखदत होता त्यांना त्याच्या भावना कळत नव्हत्या, वळत नव्हत्या, पटत नव्हत्या, पेलत नव्हत्या. उलट त्याच्या शब्दांनी त्यांच्या दुःखात भर पडून त्यामुळे तो स्वतःच विव्हल होत आला होता. आताही नेमकं तेच घडलं होतं. तो कळवळून गेला.

नायनाच्या उकिडवा बसलेल्या देहाकडे हताशपणे पाहून आतापर्यंत हातात असलेलं राज्यशास्त्राचं पुस्तक त्यानं कोनाड्यात ठेवलं.

''त्रास करून घेऊ नको बाळा, व्यंकटेशावर भरंवसा ठेव. तो सारं ठीक करील.'' हनुमंताला हताश झालेला पाहून रघुरामनं त्याला त्याच्या परीनं पुन्हा समजावलं.

हनुमंतानं निमूटपणे कपडे बदलले आणि पाचशे एक साबणाची वडी घेऊन नायनाच्या विडीतून निघणाऱ्या धुराकडे आणि चुलीपलीकडे भिंतीवर जमलेल्या काजळीकडे आळीपाळीने बघत तो न्हाणी घरात गेला.

■

तो गेल्याचं बघून आता थोडी सावरलेल्या सीताबाईनं म्हटलं, ''हल्लीच असलं काहीतरी लागट बोलू लागलाय.''

''अगं, जवानी आहे... जोश आहे...'' रघुरामनं तिला समजावलं.

"जवानीत इतर जण कुठे असलं बोलतात... कोण अभ्यास करतो तर कोण पोरीमागे उंडारतो. कोण उनाडक्या करतो तर कोण नोकरीधंद्याचं बघतो. पण याचं आपलं सगळंच निराळं..."

"तुला कळत नाही. हनुमंता सोनं आहे, सोनं. शंभर नंबरी. नेहमी वरचा नंबर पटकावतो... त्याला खूप काही कळतं इतरांपेक्षा!" रघुरामची छाती फुगली.

"ते खरं, पण आपण सामान्य माणसं. लहान तोंडी मोठा घास शोभत



नाही आपल्या पोराला...'' मग एकदम थोड्या मिस्किलपणानं त्याच्याकडे रोखून बघून तिनं विचारलं, ''तुमच्या जवानीत तुम्ही कुठे बोलत होता असलं? सारखे माझ्या भोवती भोवती असायचात, खरं की नाही?'' मग स्वत:च्या बोलण्यानं स्वत:च लाजून तिनं खालचा ओठ चावत मुरका मारला.

''बोल ना! गप्प का झालीस?'' रघुराम मोठ्ठ्यानं हसून म्हणाला तशी त्याला खोकल्याची उबळ आली. उबळ संपली तशी कफाची डरकलं बाजूची करवंटी घेऊन तिच्यात थुंकून तो पुढे म्हणाला, ''गुलाब आणि रानफुलात कसली तुलना करतेस? आम्ही कुठे आणि हनुमंता कुठे? चिखलातलं कमळ आहे तो! आपण आहोत खुराड्यातली कोंबडी. तो आहे गरुड! त्याची काळजी घेणं आपलं काम आहे. पण त्याच्या पलीकडे त्याला आपल्या कह्यात ठेवणं रास्त नाही अन् आपल्याला जमणारही नाही. त्यानं पूर्वजांचा, वडीलधाऱ्यांचा, महाराजांचा पाणउतारा केला तर वाईट वाटतं हे खरं, पण ते तेवढ्यापुरतंच!''

सीताबाईला ते सारं अगम्य होतं. पण नवरा म्हणेल ती पूर्वदिशा असल्यानं ती मुकाट्यानं कामाला लागली.

थोड्यावेळानं तिची नजर दाराकडे जायला आणि हनुमंता आत यायला एकच गाठ पडली. आंघोळ करून आत येणाऱ्या पंचा गुंडाळलेल्या हनुमंताच्या काळ्या कुळकुळीत पीळदार शरीराकडे पाहून तिच्या डोळ्यात कौतुक दाटलं. मनात आलं, ''बघता बघता कसा मर्दगडी दिसू लागलाय आपला चिमणा. दृष्ट काढायला हवी!''

आंघोळ झाल्यानंतर थोडं खाऊन हनुमंता थोडा वेळ वाचत बसला. पण त्याचं लक्ष लागेना. अभ्यासात हल्ली त्याचं लक्षच लागेनासं झालं होतं. विश्वासच उडाल्यासारखा झाला होता साऱ्या अभ्यासक्रमावरचा! खरं म्हणजे पूर्वी असं कधीच घडत नसे. पण गेले काही महिने हनुमंता आतल्या आत धुमसत होता. वास्तविक अभ्यासात अपयश, कौटुंबिक कलह, प्रेमभंग वगैरे काहीच नसताना असं धुमसण्याचं काहीच कारण नव्हतं. एवढ्या कौतुकाने कौतुक करणाऱ्या त्याचा प्रत्येक शब्द झेलणाऱ्या अम्मा - नायनावर खरं म्हणजे चिडण्याचं त्याला काहीच कारण नव्हतं. उभा जन्म जरी गरिबीत घालवला असता तरी तेवढ्या कारणासाठी अम्मा - नायनावर अशा तऱ्हेने तो कधीच ओरडला नसता.

पण त्याच्या मुळाशी होती मार्क्सवादाची ठिणगी. हनुमंताच्या वर्गात एक काळा सावळा आणि थोडाफार बावळट दिसणारा मुलगा होता. त्याच्या दोन्ही बाजूंनी ओघळणाऱ्या मिशांमुळे तो इतरांपेक्षा आणखीच वेगळा दिसायचा. पोक्त दिसायचा. शिवाय इतरांप्रमाणे तो कधीच गप्पा मारताना, हसताना, धांगडधिंगा घालताना दिसायचा नाही. गंभीर प्रवृत्तीचा हा मुलगा असा कसा? या प्रश्नाचं सोपं उत्तर म्हणजे तो वाढलाच होता मुळात राजकीय चळवळीच्या गंभीर वातावरणात. घरातले बहुतेक सर्वच आणि शिवाय कित्येक नातेवाईकदेखील वेगवेगळ्या चळवळीमध्ये होते! त्याचं नाव होतं सुब्बया.

ह्याच सुब्बय्यानं एकदा हनुमंताला मार्क्सवादाबद्दल माहिती दिली. नंतर हळूहळू मतं जुळायला लागली तशी त्यानं मार्क्सवादाचा श्रीगणेशा शिकवणारं एमिल बर्न्सचं पुस्तक दिलं. ज्यावेळी एमिल बर्न्सचं ते पुस्तक हनुमंताने वाचलं तेव्हा त्याला मोठ्ठंच कोडं सुटल्याचा आनंद झाला. त्याची भूक वाढली. तेव्हापासून मार्क्स, एंजेल्स, लेनिन, ट्रॉट्स्की, चे गुव्हेरा, हो चि मिन्ह वगैरे मिळतील ती पुस्तकं नि चरित्रं त्यानं अधाशासारखी वाचून काढली होती. अज्ञान, दारिद्र्य, गुलामगिरी, अवहेलना, नामुष्की, छळ याला कारण दुर्दैव नव्हे तर शोषणकर्ते आहेत असा त्याला साक्षात्कार झाला होता. साहजिकच शोषणकर्त्या वर्गाशी संघर्ष करण्याच्या एकमेव विचारानं तो पेटून उठला होता. झपाटला गेला होता. शोषणकर्त्यांबद्दल ते शोषण करतात म्हणून अंगार होता तर शोषित लोक शोषण निमूटपणे मान्य करतात म्हणून पोटतिडीक होती.

पूर्वी त्याला गरिबीबद्दल दुःख वाटे, पण संताप नसे. आपल्या नशिबाबद्दल खंत वाटे, पण आपलेही दिवस बदलतील आणि आपण अम्मा-नायनाना सुखी करू असं वाटे. चांगली नोकरी मिळाली की सारं काही ठीक होईल अशी उमेद वाटे.

पण मार्क्सवाद वाचू लागल्यापासून श्रीमंतीची स्वप्न आणि सुखवस्तू जीवनाची भाबडी आशा वर्गलढ्याच्या आणि क्रांतीच्या ध्यासाच्या लाव्ह्यात वितळून गेली होती. शिक्षणक्रम शोषणकर्त्यांचा आहे आणि तो अभ्यासणं म्हणजे स्वतःची फसवणूक करून घेणंच आहे अशी मनोमन खात्री पटल्यामुळे अभ्यासात, अभ्यासातल्या यशात, बक्षिसात त्याला स्वारस्य

वाटेनासं झालं होतं! औपचारिक शिक्षणच नव्हे, तर वृत्तपत्रसृष्टी, साहित्यक्षेत्र, कलाक्षेत्र, सांस्कृतिक क्षेत्र ही सारी शोषणकर्त्यांचीच बटीक आहेत आणि शोषण चालू ठेवण्याच्या कारस्थानातील शोषणकर्त्यांच्या हातातील आयुधं आहेत अशी त्याची खात्री झाली होती. साहजिकच हनुमंता आजकाल हे अंत:करणातील क्रांतीचे कढ ज्याला त्याला वाटत होता! अर्थात यात वारंवार सहभागी असायचा तो सुब्बय्याच. बाकीच्यांना त्याचं बोलणं व्यर्थ्य डोकेफोड वाटे. निरर्थक कटकट वाटे. पण हे भारलेल्या हनुमंताच्या लक्षातच यायचं नाही. आतली जळजळ आणि कडवटपणा तो वाटतच फिरत होता. तळमळून आणि कळवळून क्रांतीच्या हकीकती सांगतच राहिला होता! विशेषकरून सोमनिलयमच्या डोंगरकपारीतल्या आदिवासींकडे त्याचं जाणं येणं खूप वाढलं होतं. भांडवलदारी संस्कृतीतल्या प्रत्येक यशस्वी व्यक्तीबद्दल त्याच्या मनात तिरस्कार उत्पन्न झाला होता. त्यामुळे असल्या भांडवली संस्कारातून शोषणकर्ते आणि शोषणकर्त्यांचे दुष्ट समर्थकच तयार होतात, आणि त्यांचे यश हे विषारी आहे अशी त्याची पक्की खात्री झाली होती. त्यामुळे असल्या उच्चभ्रूंबद्दल नसता आदरभाव ठेवण्याची मुळीच गरज नाही हे त्याला मनोमन पटलं होतं. त्यामुळे आदिवासींनीही आत्मविश्वासानं शोषणमुक्तीसाठी उभं राहावं हे तो पुन्हा पुन्हा त्यांच्या मनावर बिंबवण्याचा प्रयत्न करीत राहिला होता.

हनुमंताच्या धडपडीला थोडं थोडं यश येऊ लागलं होतं. त्याच्या मुद्देसूद प्रतिवादामुळे आणि पारदर्शक प्रामाणिकपणामुळे ह्या नव्या मित्रांना त्याच्याबद्दल विश्वास वाटू लागला होता. आश्चर्य म्हणजे हनुमंताला मार्क्सवादाचा परिचय पहिल्यांदा करून देणारा सुब्बय्याही त्याच्या त्या आश्चर्यजनक स्थित्यंतराने प्रभावित झाला होता. त्याच्याकडे आदरानं पाहू लागला होता.

हळूहळू मग हनुमंताच्या पुढाकारानं त्यांनी स्वत:चा एक गट स्थापन केला होता आणि त्याला 'कष्टकरी मुक्ती मोर्चा' असं नाव दिलं होतं. हनुमंताच्या दृष्टीनं ही लढ्याची मुहूर्तमेढ होती! उत्साह आणि आवेश यांनी तो सळसळू लागला होता!

पण 'कष्टकरी मुक्ती मोर्चा' च्या रूपानं एक विजेचा लोळ तयार करण्याच्या दिशेनं पाऊल पुढे पडलं तरी हनुमंताला शोषणाचा पाया

उखडायचा कसा, याबद्दल निश्चित जाण आलेली नव्हती. मनं पेटली, धमन्या उडू लागल्या, बाहू स्फुरण पावले, तरी दिशा निश्चित झाली नव्हती. आदिवासींमधले काही धिप्पाड तरुण त्याच्या भोवती गोळा झाले तरी संघटनेकडे दृष्टिकोन, धोरण, योजना आणि डावपेच या बाबतीत अजून प्रगल्भता नाही याची हनुमंताला जाणीव होती. या जाणिवेतनं तो अस्वस्थ होत होता. एकंदरित पाहता, हनुमंता आणि 'कष्टकरी मुक्ती मोर्चा' अशा तऱ्हेने एका स्थित्यंतराच्या वळणावर येऊन भविष्यकाळाच्या दरवाजावर धडका देत होते!

■

कंटाळून हनुमंतानं पुस्तक ठेवून दिलं आणि तो बाहेर पडला. फिरत फिरत तो जंगलाच्या दिशेनं निघाला. वाटेत त्याला नेहमीचे परिचित भेटले. पण त्यांच्याशीही त्याचं वागणं थोडं बदललं होतं. आपण क्रांतिकारक आणि हे बाकीचे सारे सामान्य असंच थोडंसं वाटू लागलं होतं.



भर दुपारची वेळ झाली होती. त्या प्रचंड वडाची दाट सावली होती खरी पण तरीही वडाखाली बसणाऱ्याच्या अंगाची काहिली होत होती, इतका उष्मा होता. वारा साफ पडला होता. पानंही स्तब्ध होती. वातावरण कसं थबकून राहिलं होतं. वाळलेल्या पाचोळ्यातून मध्येच एखादा सरडा सळसळत होता. तर मध्येच एकादा पक्षी पारंब्यामधून चिवचिवत उडत होता.

हनुमंता वडाखाली आला. बसून थोडा वेळ विश्रांती घ्यावी म्हणून तो खाली बसणार...

एवढ्यात एक परिचित पोरगा त्याच्याकडे धावत आला. त्या पोराचा ऊर धपापत होता आणि सारं अंग धामाने निथळत होतं. कसंबसं तो म्हणाला, "अण्णा धाव, पोलिस लहानूची वस्ती तोडताहेत. त्यांना मारताहेत........"

"काय? पोलिस? लहानूची वस्ती तोडताहेत? हरामखोर! चल बघूया..." तात्काळ उठून हनुमंता डोंगराच्या दिशेनं सुसाट धावत सुटला. सगळ्या वाटा-पळवाटा पायाखालच्या असल्यामुळे काटेकुटे, वेली, खडक, खड्डे सराईतपणे चुकवत तो सर्व शक्तीनिशी धावत होता. ....

आता लहानूची वस्ती त्याच्या नजरेच्या टप्प्यात आली. त्याला धाप लागली; पण आता उतरंड होती. डोंगरपठारावरून समोरच्या उतरंडीवरच्या झोपड्या दिसू लागल्या. तिथे बरेच पोलिस झोपड्या तोडताना आणि बंदुका - काठ्यांनी आदिवासींना हुसकून झोडपून काढताना त्याच्या दृष्टीला पडले. हुसकलेले आदिवासी सैरावैरा पळत होते. त्यांची उघडीनागडी काळी पोरं त्यांच्यामागून फरफटल्यासारखी धावत होती.

हनुमंता आता हाकेच्या अंतरावर पोचला. मधली गळ ओलांडली की वस्ती. त्यानं क्षणभर एका जागी थांबून नीट पाहिलं. आता आणखी कितीतरी आदिवासी रडत, भेकत, ओरडत असताना त्याला दिसले. त्यांचा आक्रोशही ऐकू आला. त्याची नजर लहानूला शोधत होती. लहानूची झोपडी त्याला दिसली. पण लहानूच्या झोपड्यातून पोलिस एका बाईला फरफटत आणताना त्याला दिसले. तो स्तंभित झाला! होय, ती लहानूची गरोदर बायकोच होती! त्याचं रक्त पेटलं. तेवढ्यात तीरासारखा धावत येणारा लहानू त्याला दिसला. चवताळलेला लहानू गर्भार बायकोवर जबरदस्ती करणाऱ्या पोलिसांवर तुटून पडला. पण जितक्या त्वेषानं लहानू तुटून पडला तितक्याच त्वेषानं पोलिसांनी त्याला तुडवायला सुरुवात केली. त्यांच्या निर्दय फटक्यांनी

कळवळणारा लहानू अखेर जमिनीवर कोसळला. हातापाया पडून तो पोलिसांची याचना करू लागला.

हे सारं इतक्या वेगानं आणि अनपेक्षितपणे घडत होतं की हनुमंता क्षणभर थिजून गेला. पण दुसऱ्या क्षणी पुन्हा धावत सुटला. वस्ती जवळ येताक्षणी लहानूच्या गरोदर बायकोच्या अंगावर हात टाकणाऱ्या पोलिसांवर तो इंग्रजीतून ओरडला, ''हा जुलूम थांबवा ताबडतोब नाहीतर जिणं हराम करू तुम्हा सर्वांचं!पेपरमध्येही छापू!'' लाचारी आणि माजोरी नसानसात भिनलेला तो वनरक्षक पोलिस हनुमंताचा इंग्रजीतला इशारा ऐकून चपापला. पण लागलीच स्वत:ला सावरत त्यानं हनुमंताला ओरडून जबाब दिला, ''हुकूम आलाय आम्हाला... वस्ती उठवायचा.''

''पण जुलूम करायचा नाहीय हुकूम आलेला!'' पोरगेल्या हनुमंताच्या बोलण्यात त्वेष होता. धाक होता. नैतिक धार होती. त्या पोलिसाला तात्काळ जरब वाटली. त्यानं लहानूच्या बायकोला लगेच सोडून दिलं. पण तरीही स्वत:चा मोठेपणा दाखवण्यासाठी गुरगुरून त्यानं म्हटलं,''ठीक... ठीक! मग चालते व्हा म्हणून सांग त्यांना एवढा कैवारी आहेस ... लीडर आहेस तर.''

चिडलेल्या हनुमंताच्या मनात आलं, ''लांडगे आहेत, लांडगे. धन्यासमोर लाचारी आणि गोरगरीबांसमोर मात्र हिंस्त्र माजोरी! त्या पोलिसावर घृणेचा एक कटाक्ष टाकून त्यानं ओरडून लहानूला हाक मारली. हनुमंताला पाहून आणि त्याची हाक ऐकून लहानू वेदनेनं कळवळला.''हनुमंतगारू'' त्यानं प्रतिसाद दिला. लगेच लहानूकडे जाऊन हनुमंतानं त्याला उठवलं, ''आक्रोश नको करू लहानू... मला असह्य होतंय,'' लहानूच्या रक्ताळलेल्या देहाकडे बघून संताप आणि असहायतेनं बेफाम झालेला हनुमंता कसाबसा म्हणाला. त्याचं हृदय पिळवटून निघालं होतं. पोलिसांनं बायकोवर हात टाकल्यानं लहानू अंतर्बाह्य उन्मळून पडला होता. त्याला स्वत:ला नंगा करून विटंबना केली जावी तशी त्याची अवस्था झाली होती. हनुमंताच्या चीत्कारानं तो कळवळून ओक्साबोक्सी रडूच लागला.

''उठ लहानू, उठ. सांभाळ स्वत:ला. बाकी साऱ्यांची जबाबदारी आहे आपल्यावर. धीर नको सोडू. मग अचानक चिडून तो साऱ्यांना उद्देशून ओरडला, ''अरे उठा... इकडे या. असे खचू नका... हतबल होऊ नका.

... या इकडे ... इकडे या ... हंबरडे काय फोडताय गरीब गाईसारखे ... या इकडे''

त्याच्या कळकळून ओरडण्यानं लहानूनं स्वत:ला सावरलं... तो कसाबसा उठला. ते बघून सैरावैरा कोकलत धावणारे आदिवासी आणि भोकांड पसरून त्यांच्या मागून फरफटणारी पोरंही हळूहळू हनुमंताभोवती जमू लागली.

रक्तबंबाळ असहाय आदिवासींच्या स्थितीने एकीकडे गदगदलेल्या आणि वनरक्षक पोलिसांच्या हिंस्त्रतेनं उसळलेल्या हनुमंताचा प्रतिक्षणी भडका होत राहिला...

त्याच्या शब्दस्फोटांनी जखमी आदिवासींची रक्ताळलेली शरीरं थरारली. ते शब्द विजेचे लोळ होते. आदिवासींच्या रक्ताळलेल्या शरीरातून हाडामासातून ते लोळ घुसताच त्यांच्यामध्ये नवी चेतना सळसळली. त्यांच्यात चैतन्य संचारलं. उन्मत्त पोलिसांना गाडून टाकण्याच्या आत्मविश्वासानं ते स्वत:चं दु:ख, दैन्य व यातना विसरले. तरुणांनी तर हनुमंताचा जयजयकार करायला सुरुवात केली. म्हाताऱ्याकोताऱ्यांना आपला वाली भेटला म्हणून धीर आला. बायाबापड्यांची उरं फुगली. हनुमंताच्या आधारानं त्या असहाय आणि अश्राप जिवांना उभारी आली. दीनवाण्या बायकांनाही उमेद आली.

मग जमलेल्या आदिवासींना दिलासा देत हनुमंतानं समजावलं. एकी करून अडचणी दूर करता येतील याची जाणीव दिली. धीर खचू न देता आणि गडबडून न जाता ठामपणे उभं राहण्याची गरज पटवून दिली. नीट विचार करून पावले उचलल्यास आपण ह्या संकटातून देखील नक्की बाहेर पडू अशी ग्वाही दिली. मग त्यानं जोरानं म्हटलं, ''घ्या आता ही शपथ! अन्याय सहन करणार नाही! संघटित प्रतिकार करू!''

साऱ्या आबालवृध्द आदिवासींनी ती शपथ आकाश फाडणाऱ्या बुलंद आवाजात घेतली, तशी वनरक्षक पोलिसांच्या पाचावर धारण बसली. त्यांचं अवसान अकस्मात गळालं. जखमांची पर्वा न करणाऱ्या रक्तबंबाळ आदिवासींचा तो वज्रनिर्धार ऐकून ते गडबडून गेले. त्यांचा पालटलेला नूर आणि तो आक्रमक पवित्रा पाहून आपली आता धडगत नाही या जाणिवेने ते एकदम हादरले. कोणत्याही क्षणी आता आदिवासी प्रतिहल्ला करतील

ह्या भीतीनं त्यांना आपली बायकापोरं आठवली. पण सुदैवानं, तसं काही घडू न देता हनुमंता जेव्हा त्या आदिवासींना घेऊन निघाला, तेव्हा त्यांच्या जिवात जीव आला.

हनुमंतानं विचारांतीच तसं केलं होतं. फिरलेल्या डोक्यांनी दोन-चार रेंजर्सचे मुडदे पाडले असते, तर परिणामी आदिवासींच्या सर्वस्वाचीच राखरांगोळी झाली असती. सूडापोटी पोलिसांनी तसं करण्याचा धोका होता. झोपड्या आणि गाडगी - मडकी अदिवासींसाठी लाखमोलाची असली तरी आज मुख्य गरज आदिवासींचं नीतिधैर्य वाढवण्याची होती. साऱ्या परिस्थितीशी, विचारपूर्वकच दोन हात करायला हवेत... पिसाळून जाऊन आवेशाच्या भरात काही करण्यामागे आत्मनाश आहे, हे आदिवासींना पटवून त्यांची ताकद वाढवायची गरज होती.

निराश्रित झालेल्या आदिवासींची सर्वप्रथम गावात सोय करायला हवी होती. हनुमंताच्या मनात आलं, ''कदाचित यामुळे आदिवासी व गावकरी परस्परांच्या निकट येतील.''

हनुमंता आणि सारे आदिवासी गावात आले खरे. पण पुढे काय करायचं हा प्रश्न होता. पण हनुमंताच्या ओळखीमुळे गावातील काही धर्मशाळातून आणि देवळांच्या, शाळांच्या आवारातून त्यांची तात्पुरती सोय झाली. पण पुढे त्यांच्या उदरनिर्वाहाचा प्रश्न सोडवणं आवश्यक होतं.

संभ्रमात आणि चिंतेत पडलेला हनुमंता लक्ष्मीनारायणाच्या देवळासमोरच्या पायरीवर बसून लहानूशी बोलत होता. बरोबर सुब्बय्यादेखील होता. त्यावेळी समोरून एक माणूस येताना दिसला. तो माणूस जवळ आला तसं त्यांच्या लक्षात आलं की तो गावात नवीनच आला होता. त्या उंच आणि काहीशा वाकलेल्या माणसानं स्वत:ची ओळख करून दिली. मग त्याना पोलिस खात्याकडून आणलेली काही काळ आदिवासींच्या त्याच वस्तीमध्ये राहायची तात्पुरती परवानगी त्यांच्या हाती देत तो म्हणाला; ''मित्रांनो काळजी करू नका... या संघर्षात आपण सारेजण एकत्र आहोत... तुम्ही जी संघटना काढलीय तिला बळ द्यायला कितीतरी माणसं आहेत. पैसादेखील आहे. योग्य पावलं उचलली की यश मिळाल्याशिवाय राहणार नाही.''

त्या माणसानं आणलेली पोलिसांची ती परवानगी अन् त्याच्या त्या दिलाशानं हनुमंताला एकदम आधार वाटला. तो एकदम प्रभावित झाला.

बोलण्याच्या ओघात त्या माणसाविषयी, फ्रान्सिसविषयी त्याच्या ज्ञानाविषयी, त्याच्या बुध्दीविषयी त्या सर्वांनाच आदर वाटू लागला. श्रमिकांच्या संघर्षाला तो नेतृत्व देऊ शकेल असा विश्वास वाटू लागला. सारेजण आदिवासींच्या वस्तीकडे निघाले. फ्रान्सिस जाता जाता त्यांना गुप्त संघटना कशी बांधायची, त्यासाठी कोणती बंधनं पाळावी लागतात यांची माहिती देत होता...

■

आदिवासींची वस्ती तोडल्यानंतर काहीच दिवसात ''कष्टकरी मुक्ती मोर्चा''ची सूत्रं फ्रान्सिसच्या हातात आली. त्यानं घालून दिलेल्या शिस्तीनुसार आणि डावपेचानुसार काम करायचं सर्वानुमते ठरलं. नियमित बैठका घेण्यासाठी जागा निश्चित झाल्या.

हनुमंता, सुब्बय्या, लहानू वगैरे तरुण मंडळी एकत्र जमू लागली. फ्रान्सिस मधून मधून सोमनिलयमला येऊन त्यांच्या बैठकीत मार्गदर्शन करू लागला.

त्या दिवशी संध्याकाळी ठरल्याप्रमाणे बैठक सुरू झाली. सुब्बय्या आणि लहानू आधीच पोचल्यामुळे त्यांच्या गप्पा सुरू झाल्या. सुब्बय्या लहानूला संघटनेची कार्यपध्दती समजावून देत होता. लहानूला त्याचा अपमान आठवत होता. पोलिसांवर सूड घेण्यासाठी तो उतावीळ झाला होता. त्यामुळे सुब्बय्याचं बोलणं ऐकून तो एकदम चिडला. एकदम मध्येच उसळून तो ओरडला, ''डावपेच, विचार, योजना ... सारं काही तुमचं ढोंग आहे. तुलाही या अहिंसेचा रोग लागलाय. अहिंसेचं तत्त्वज्ञान बरळतोयस तू... अरे! परवा आमची सगळी वस्ती तोडून टाकली त्याचं काहीच कसं वाटत नाही तुला?''

त्याला शांत करण्याचा प्रयत्न करीत सुब्बय्यानं म्हटलं, ''मला कळतात तुझ्या भावना. पण एकदम चिडून जाऊन काही करण्यात धोका आहे. मी अहिंसेचं गुणगान करीत नाहीय. पण आपल्या ताकदीचा अंदाज घेऊन नको का पुढचं पाऊल उचलायला? हा डावपेचांचा भाग आहे... आणि अगदी आवश्यक आहे.'' लहानूच्या दणकट देहाकडे बघत त्यानं पुढे म्हटलं, ''एका व्यक्तीचा जोम आणि जोश अशा कामात पुरेसा पडत नाही.''

कष्टकरी मुक्ती मोर्चाच्या बैठकींचं ते ठिकाण म्हणजे सुब्बय्याच्या घराच्या माळ्यावरील दहा बाय बाराची छोटीशी खोली होती. खोलीच्या

निळसर मळकट भिंतीवर लेनिन, माओ त्से तुंग, होचि मिन्ह, चे गुव्हेरा आदींचे फोटो होते. खाली अंथरलेल्या सतरंजीवर बसून कार्यकर्ते चर्चा करीत होते.

लहानूला सुब्बय्याचं म्हणणं अर्थातच रुचलं नाही. हनुमंतानं जेव्हा त्याच्या वस्तीवर भाषण केलं तेव्हाची त्या शब्दातील आग त्याच्या अंगात अजून धगधगत होती. त्यावेळी चढलेला चेव खदखदत होता. आपल्या गरोदर बायकोवर हात टाकणाऱ्यावर सूड उगवण्यासाठी त्याचं रक्त उसळत होतं. वस्तीच्या सर्वांवर गदा आणणाऱ्या जंगल खात्याच्या त्या कुत्र्यांना केव्हा एकदा हाणतो, असं त्याला झालं होतं. त्यानं रागानं सुब्बय्याकडे बघून म्हटलं, ''सुब्बय्या, त्या हरामखोरांनी आमचं घरदारचं नव्हे तर आमची अब्रू लुटली. देवीसारख्या माझ्या अम्माची सर्वांदेखत विटंबना केली. अशी पाळी तुझ्यावर आली असती तर असाच पळपुटेपणा केला असतास तू?''

लहानूचे शब्द सुब्बय्याला वर्मी लागले. तो एकदम चिडला. पण स्वत:वर काबू ठेवून त्यानं लहानूकडे फक्त रोखून बघितलं. पण तत्क्षणी लहानूच्या डोळ्यांतला अंगार पाहून तो गडबडला, धास्तावला. लहानूच्या डोळ्यातला बेलगाम अविश्वास आणि खुनशीपणा यामुळे एकाच वेळी त्याला लहानूची थोडी भीतीही वाटली आणि पुष्कळसा तिटकाराही. वाटलं, जाऊदे ... ह्याला एकट्याला काय करायचं ते करू दे... माथेफिरूपणानं काय व्हायचं ते ह्याचं एकट्याचं होऊ दे ... पण संघटनेचा विचार मनात येताच त्याला स्वत:च्या जबाबदारीची जाणीव झाली. मग संयमपूर्वक थोड्या समजावण्याच्या सुरात त्यानं म्हटलं, ''लहानू यात पळपुटेपणा नाही. सावधपणा आहे. तुझ्या भावना मला कळतात ... पण उतावीळपणामध्ये सर्वनाश आहे.''

यावर लहानू काही बोलणार एवढ्यात दरवाजावर थाप पडली. मागोमाग खुणेच्या दोन टिचक्यांचा आवाज आला. हनुमंताच आलेला असणार म्हणत सुब्बय्यानं उठून दार उघडलं.

बैठकीविषयी ते नेहमी गुप्तता पाळतच. पण तरीही खुणेच्या टिचक्या वाजवण्याचा संकेत पडून गेला होता.

हनुमंतानं आल्या आल्या सर्वांना, 'लाल सलाम' केला. आपण स्वत: क्रांतिमय झाल्याची जाणीव प्रत्येक कृतीमध्ये जागी राहण्यासाठी ते सर्वजण,

नमस्कार करण्याऐवजी लाल सलाम करणं पसंत करीत. नमस्कार करण्यामध्ये त्यांना परिस्थितीशी मिळतेजुळते घेण्याचा किंवा गुडघे टेकण्याचा बावळटपणा आहे असं वाटे. लाल सलाम करून बसल्यावर, थोडा उशीर झाल्याबद्दल माफी मागून हनुमंतानं बैठकीत आदी झालेल्या चर्चेचा तपशील सुब्बय्याकडून समजून घेतला. मग एक-दोन मिनिटं शांत राहून त्यानं एकदम म्हटलं, "प्रत्यक्ष कृतीतूनच संघटनेची ताकद वाढत असते. मरणाच्या किंवा तुरुंगाच्या भीतीनं आम्ही जर फक्त चार भिंतीच्या आड बडबड करणार असलो, तर त्याला अजिबात अर्थ नाही... प्रत्यक्ष योजना हवीच."

लहानूला ते ऐकताच बरं वाटलं. सरशी झाल्याच्या भावनेनं सुब्बय्याकडे तुच्छपणे पाहून त्यानं म्हटलं, "मी सांगतो योजना. माझ्या बायकोवर हात टाकणाऱ्या त्या फॉरेस्ट ऑफिसरला हाणायचा आहे मला. आज... आजच्या रात्रीच उडवतो त्याला!"

हनुमंतानं आश्चर्यानं लहानूकडे बघितलं. त्याच्या डोळ्यांतून केवळ सूडाची भावना ओसंडत होती. त्याची ती प्रत्यक्ष योजना एवढी प्रत्यक्ष होती की, हनुमंतही क्षणभर गडबडलाच. स्वत:ला सावरत त्यानं म्हटलं, "योजना सांग लहानू! योजना म्हणजे अविचारी कृतीचा निर्णय नव्हे. अशी अविचारी कृती म्हणजे आत्महत्या.......! तुझी योजना तयार कर आधी. पोलिसांच्या हाती कधीही काहीही लागता नये, अशा तऱ्हेने प्रत्येक कृतीची योजना तयार करावी लागते! समजलं?"

त्याच्या बोलण्यानं लहानू एकदम बुचकळ्यात पडला. हनुमंताला नेमकं काय म्हणायचंय ते न कळल्यानं गोंधळून जाऊन त्यानं विचारलं, "काय करायला हवं मग?"

हनुमंतानं म्हटलं, "तुला त्याला मारण्यापूर्वी तो कुठे राहतो, ड्यूटीनंतर काय काय करतो, कुठे कुठे जातो, त्याच्या घरी कोण कोण आहेत वगैरे सारी पार्श्वभूमी समजावून घ्यायला हवी. त्यानंतर तपशीलवार विचार करून सारं काही ठरवायला हवं. सारं काही गुप्त हवं... लक्षात आलं?"

"होय... होय. आता कळतंय." लहानूनं मान डोलावत म्हटलं.

"पण हनुमंता, हे सारं घाईगडबडीतच होतंय, असं नाही वाटत तुला?" सुब्बय्यानं त्याची शंका व्यक्त केली.

"सुब्बय्या, तापल्या तव्यावर हात भाजून न घेण्याचा सावधपणा हवा हे जसं खरं तसंच पोळी न भाजण्याचा मूढपणाही नको हे देखील खरं आहे!"

हनुमंताचं म्हणणं ऐकून सुब्बय्या गप्प राहिला. बैठक संपून सारे जाणार एवढ्यात फोन वाजला. सुब्बय्यानं उठून फोन घेतला. पलीकडून फ्रान्सिसचा आवाज आला. त्यानं हनुमंताकडे फोन द्यायला सांगताच सुब्बय्यानं फोन हनुमंताकडे दिला. हनुमंता आणि फ्रान्सिसमध्ये थोडा वेळ बोलणं झालं पण त्याचा तपशील गुप्त ठेवायचा होता.

■

त्या दिवशी राजवाड्यातील नोकरचाकरांच्या तोंडी एकच विषय होता; रेड्डीच्या हत्येच्या!

सोमनिलयमच्या फॉरेस्ट ऑफिसर रेड्डीची तीक्ष्ण शस्त्रानं हत्या झाली होती. त्याच्या मृतदेहाच्या बाजूला एक पत्र ठेवण्यात आलेलं असून रेड्डीच्या हत्येची जबाबदारी कष्टकरी मुक्ती मोर्चानं घेतली होती.

'कष्टकरी मुक्ती मोर्चा' नेमकं काय गौडबंगाल आहे, ह्या खुनाच्या मागे कुणाचा हात आहे वगैरे गोष्टींबद्दल उलटसुलट शंका-कुशंका निघत होत्या. पण जो तो कुजबुजत होता, उघड कुणीच बोलत नव्हतं.

महाराज सत्येंद्राना जेव्हा हरीनं येऊन ही सारी हकीकत सांगितली तेव्हा त्यांनी त्याच्याकडे काहीसं दुर्लक्षच करून म्हटलं, "मला माहीत आहे... तू आपलं काम कर." वरमलेला हरी निमूटपणानं बाहेर गेला. त्याला वाटलं होतं आपण एवढी महत्त्वाची बातमी सांगितली तर महाराज चकित होतील, स्वारस्य दाखवतील ...पण महाराजांनी त्याला सरळ सरळ फटकारलंच होतं.

हरी गेला तसे महाराज सत्येंद्र तडक घोड्याच्या पागेकडे गेले. रघुराम घोड्यांना दाणावैरण करण्यात दंग होता. महाराजांची मारलेली हाक ऐकताच एकदम तो, 'जी महाराज' म्हणत पुढे आला. चेहऱ्यावरची सुरकुतीही हलू न देता त्यांनी रघुरामला हनुमंताला बोलावून आणायला सांगितलं. "महाराज, काही चुकलं का त्याचं? मी पायावर डोकं ठेवतो तुमच्या. माफी असावी." महाराजांची तणावग्रस्त चर्या पाहून त्यानं गयावया करायला सुरुवात केली. त्यांची ती चर्या परिचयाची असल्यानं तो पार हादरून गेला होता.

त्याच्याकडे न पाहता स्वत:शीच काहीसं अस्पष्ट पण नापसंतीनं हसत त्यांनी खडसावून म्हटलं, "रघुराम उलट बोलू लागलास तू? माझ्यावरचा

विश्वास संपला?'' त्यांचं ते नापसंतीचं वेडवाकडं हास्य म्हणजे वादळापूर्वीची शांतता आहे हे रघुरामला माहीत होतं. त्यामुळे तो आणखीनच घाबरून म्हणाला, ''नाही, नाही. महाराज... तसं नव्हे. व्यंकटेशाची शपथ! तसं नव्हे...''

''मग तात्काळ बोलाव त्याला,'' ते कडाडले.

''जी महाराज ... जसा हुकूम'' घाबरलेला रघुराम लगेच हनुमंताला बोलावून आणायला गेला.

तो जाताच महाराज सत्येंद्र विचार करत अभ्यासिकेत येऊन बसले. त्यांना फार वेळ वाट बघावी लागली नाही. थोड्याच अवधीत रघुराम आणि हनुमंता तिथे आले.

त्यांनी रघुरामला दरवाजा ओढून घेऊन बाहेर थांबायला सांगितलं आणि तो बाहेर जाताच हनुमंताला बसण्यासाठी इशारा केला.

हनुमंताला काहीच बोध होत नव्हता. त्याच्याकडे रोखून बघत महाराजांनी एक एक वाक्य त्यांच्या धीरगंभीर आवाजात बोलायला सुरुवात केली. ''हनुमंता, आम्ही अजून जिवंत आहोत! एवढं मोठं अघोरी कृत्य करण्यापूर्वी आम्हाला विश्वासात घ्यायला हवं होतंस तू!''

''महाराज माफ करा ... पण मी आपला रोख नाही समजलो'' हनुमंता अडखळत बोलला.

''वेड पांघरू नकोस!''

''म्हणजे महाराज?'' हनुमंता, रेड्डी माझ्या परिचयाचा होता. त्याच्या हत्येमध्ये कोण कोण गुंतलाय आणि तुझा त्यात किती हात आहे हे कळायला मला गुप्तहेरखात्याची गरज नाही. कळलं?'' त्यांच्या नजरेत आता जरब होती. शब्दात धाक होता. हनुमंताला त्यांच्या बोलण्यानं धक्काच बसला. क्षणभर तो गांगरूनच गेला. त्यांच्या नजरेला नजर भिडवण्याचं त्याला धाडस झालं नाही. ''आम्ही सारं पाहतो हनुमंता... समजलं.'' पुन्हा महाराज गरजले.

त्यांच्या त्या अधिकार गाजवण्याच्या पवित्र्यानं धक्क्यातून सावरलेल्या हनुमंताचा स्वाभिमान एकदम दुखावला. त्याला चीड आली. एकदम ताठ मानेनं त्यांच्याकडे पाहत त्यानं विचारलं, ''महाराजा, तुम्ही माझी कानउघाडणी करायला बोलावलंय? की ब्लॅकमेल करायला?''

''गप्प बस! बोलण्यापूर्वी विचार करण्याइतपत संयम नाही तर

सुसंस्कृतपणा तरी दाखवावा. मर्यादा दाखवावी.'' महाराज गरजले.

महाराज आपल्याला एखाद्या गुन्हेगाराप्रमाणे फटकारताहेत हे जाणवताच शेपटीवर पाय पडलेल्या नागाप्रमाणे हनुमंता अचानक उसळून उठला. फूत्कार टाकावे तसा तो कडाडला, ''महाराज, आम्ही तुमचे गुलाम! राबणारे लोक. राबण्याशिवाय आम्हाला दुसरी कुठली संस्कृती कळणार? अमर्याद राबणाऱ्याला मर्यादा कसली आलीय?''

त्याच्या त्या अनपेक्षित उद्दामपणानं महाराज अवाक् झाले. रागानं थरथरत त्यानीं कसंबसं विचारलं, ''काय म्हणायचंय काय तुला?''

डोक्यावरचं एकदम दडपण साफ नाहीसं झालेला हनुमंता जळजळीत कटाक्ष टाकीत गुरगुरला, ''साधी बाब आहे महाराजा! शतकानुशतकं आम्हाला लुबाडून तुम्ही हे बडेजाव, हे अलंकार आणि ही भरजरी वस्त्रं मिरवत असताना; का म्हणून मी उपकाराचं ओझं घेऊन तुमच्या टाचेखाली राहू? का म्हणून तुमच्या चाबकाचे फटकारे झेलू? का म्हणून तुमची थुंकी झेलू? का तुमच्या हुकुमाचा ताबेदार राहू? का स्वातंत्र्य गहाण टाकू? पिढ्यान्‌पिढ्या आम्हाला चिंध्या पुरवल्यात म्हणून? तुमच्यासमोर शेकडो वेळा वाकलो आम्ही. आता या क्षणापर्यंत फक्त वाकलो आम्ही. पण तुम्ही तर गुडघे टेकण्याची आणि तुमची थुंकी झेलण्याचीच अपेक्षा करताहात. का असल्या आत्मघातकी संस्कृतीची आमच्याकडून अपेक्षा करताहात? का अशा नपुंसकतेच्या मर्यादेची अपेक्षा बाळगता आहात? कोणत्या भ्रामक अधिकाराखाली मला इथे बोलावून माझ्या वैयक्तिक बाबीत दखल देताहात तुम्ही?

हनुमंताच्या प्रत्येक शब्दागणिक महाराजांना स्वत:च्या डोक्यातील शीर अन् शीर फुटू लागलीय असं वाटत होतं. ज्या हनुमंताच्या प्रकृतीची, शिक्षणाची, बऱ्यावाईटाची आपण एवढी काळजी घेतली तो हनुमंता साऱ्या राजघराण्याबद्दल अशा तऱ्हेने बेमुर्वतखोरपणानं, एवढ्या कृतघ्नपणानं बोलतोय? की स्वत:चे कान ऐकण्यात चूक करताहेत? की आपल्याला भ्रम झालाय?

पण त्याचबरोबर या वज्राघातानं त्यांच्यातला राजेशाही ताठा मात्र गळून पडला. त्यांच्यातला सुसंस्कृत सहृदय माणूस तेवढा शिल्लक राहिला. त्यामुळेच की काय हनुमंताच्या त्या बेफाम बोलण्यानं त्याचा शिरच्छेद करावा असं न वाटता वडिलकीच्या नात्यानं त्याची समजूत घालावी, असं त्यांना

उत्कटपणे वाटलं. स्वत:ला सावरून क्षणभर त्यांनी, आता जड आणि कापऱ्या आवाजात म्हटलं, ''हनुमंता, नायडू राजघराण्याच्या या शेवटच्या महाराजांच्या असहाय आणि अखेरच्या काळात त्यांना समजावून घ्यायला कुणी उरला नाही!''

महाराज सत्येंद्रांच्या संतापानं लाल झालेल्या चेहऱ्यावर आता फिक्कटपणाची अवकळा पसरली. डोळ्यांच्या कडा ओल्या झाल्या.

खवळून उठलेला, बेफाम झालेला हनुमंता महाराजांच्या त्या हताश आणि खिन्न चेहऱ्याकडे पाहून गलबलून गेला. त्वेष ओसरला आणि तो एकदमच गहिवरला. त्याच्या नकळत महाराजांच्या आंतरिक ओढीनं कळवळून जाऊन त्यानं म्हटलं, ''महाराज माफ करा. तुमचा व्यक्तिश: उपमर्द मला अजिबात करायचा नव्हता. पण माझ्या माथी तुम्ही नसलेला दोष मारलात. गुन्हेगारांच्या पंक्तीला बसवून मला धमकावलंत, त्यामुळे माझा तोल गेला. वास्तविक रेड्डी हा नरपशू होता. त्याची हत्या म्हणजे गुन्हा नव्हे... मग तरीही तुम्ही मलाच खच्ची केलं. पण... मला माफ करा.''

''जाऊ दे'' त्याला मध्येच तोडत महाराज हताशपणे म्हणाले, ''तुला माफी देणारा मी कोण? तुझा बाप इथे सेवक आहे; पण तू काही माझा सेवेकरी नाहीस. तुला बोलावून घेऊन मी चूकच केली. आत्मीयतेपोटी नको तो अधिकार गाजवला! रेड्डीच्या हत्येचा न्याय देण्यासाठी आज माझ्याकडे राजसत्ता नाही, राजमुकूट नाही, राजवस्त्रं नाहीत! राजधर्माची जबाबदारी नाहीच... पण हक्कही नाही! त्यामुळे तुला अशा तऱ्हेनं बोलावणं हा अधर्मच घडला माझ्या हातून...''

''महाराज! महाराज!'' हनुमंताचा आवाज एकदम कातर झाला. ''महाराज मला माफ करा. खरोखरच मला कळत नाहीय की तुम्ही मला का बोलावलंत... आणि तेही त्या रेड्डीच्या हत्येसंदर्भात!''

''खरंच हनुमंता ... तुला कसं समजावू? अरे, वेड्या मी तुला ब्लॅकमेल करीन असं कसं काय वाटलं रे तुला? अन् कानउघाडणी करायला तू काय लहान पोर आहेस? ... व्यंकटेशा काय ऐकायला जिवंत ठेवलंस?''

''महाराज खरोखर मी तुमची माफी मागतो, माझ्या उध्दटपणाबद्दल. पण मला समजावून सांगा का बोलावलंत ते.''

''हनुमंता, ते कळायला पितृहृदयाची कल्पना हवी. राजा नसेन. पण

वयानं तरी वडील आहे. तुला चार गोष्टी सांगू शकतो, तसाच अडचणीत सांभाळू शकतो ना मी? आपल्या माणसाची जबाबदारी वाटते... काळजी वाटते.''

''पण महाराजा... तुमच्याबद्दल पूर्ण आदर बाळगून एक बाब बोलल्याशिवाय राहवत नाही. तुमची आत्मीयता कळते मला. तुमच्याबद्दल संशय नाही. पण महाराज, तुमच्या काळजीची व आत्मीयतेचीही एक मर्यादा आहे. याउलट आम्हा कष्टकऱ्यांची व्यथा, आमची वेदना, आमची हलाखी, आमची असहायता, सारी अमर्याद आहेत... असाध्य रोगाप्रमाणे असाध्य आहेत...'' हनुमंताच्या बोलण्यात आता एकीकडे आत्मीयता होती तर दुसरीकडे अन्यायाविरुध्दची तीव्र नाराजी, संताप ... विरोध ... प्रत्याघात... प्रतिशोध होता.

महाराज सत्येंद्राच्या मनातही एका बाजूला हनुमंताबद्दल सहानुभूती होती पण दुसऱ्या बाजूनं त्याचे विचार, कष्टकरी मुक्ती मोर्चाची ती कृती, राजघराण्याविषयीची त्याची कलुषित दृष्टी याबद्दल तीव्र नापसंती होती. हनुमंताला त्यांनी म्हटलं, ''हनुमंता, राजघराण्याचे राजधर्माचे, राजशिष्टाचाराचे काही संकेत असतात. त्या संस्कारात आम्ही वाढलो. गरिबांबद्दल मलाही सहानभूती आहे. पण राजा, प्रजा व राजाचा सेवक यात फरक असणारच. ज्याचा जसा धर्म तशी त्याची जबाबदारी आणि त्या प्रमाणात त्याला सुविधा मिळायच्या हा संकेत पुरातन आहे. आम्ही तयार केलेला नाही!''

हनुमंताला त्यांचं म्हणणं पटलं नाही. पण महाराजांची पार्श्वभूमी, त्यांचे संस्कार, त्यांचे अनुभव, त्यांची पिढी, त्यांचा काळ हे सारं पाहता त्यांचं म्हणणं समजण्यासारखं होतं. किबहुना इतरांच्या तुलनेत त्यांचा दृष्टिकोन निश्चितपणे अधिक सहृदय आणि उदार होता. त्यांच्या मतांना मर्यादा असली तरी ते त्याचे हितशत्रू नक्कीच नव्हते. त्याला स्पष्टपणे जाणवलं की महाराज सत्येंद्रांचं, त्यांच्या परंपरांचं आणि त्यांच्या विचाराचं वर्चस्व झुगारून देणं जसं गरजेच होतं त्याचप्रमाणे त्यांच्याशी व्यक्तिश: शत्रुत्व न ठेवणंही आवश्यक होतं. स्वत:च्या पिढ्यान्‌पिढ्यांचं नामुष्कीचं जीवन महाराजांच्या राजधर्मानं सुधारलं नव्हतं तसंच नेहमी डसणारं हे जळतं वास्तव त्यांच्या राजधर्माबद्दल व त्यांच्याबद्दल आग ओकून बदललं नसतं. त्यातून त्याच्या मनालाही समाधान मिळू शकणार नव्हतं.

त्याला विचारात पडलेला पाहून महाराजांनी पुढे म्हटलं, ''आमच्या मर्यादांमुळे आम्ही तुझ्यासारख्या लाखो गोरगरिबांना गरिबीतून मुक्ती देऊ शकत नाही हे खरं आहे. पण तुझ्या एकट्याची मात्र काळजी घेऊ शकतो. तुला वेळप्रसंगी सांभाळू शकतो. तुला बोलावलंय ते या काळजीपोटी. अविचारातून संकटात सापडशील म्हणून सावध करण्यासाठी. त्यामुळे मी काय म्हणतोय ते थंड डोक्यानं ऐकून घे. या घटनेबद्दल माझं म्हणणं एवढंच की विधायक आणि निर्धोक काम करून कल्याण साधा. कष्टकरी मुक्ती मोर्चाचे कार्यक्रम त्या पध्दतीने आखा. मी मदत करीन तुम्हाला.'' त्याच्या डोळ्यांतली ती संशयाची भावना पाहून त्यांनी विचारलं, ''तुला नाही पटत मी म्हणतो ते?''

''खरं सांगू महाराजा?''

''हो... हो नि:शंकपणे''

''महाराजा मला नाही पटत तुमचा सल्ला!''

''अरे, वनवासी - आदिवासी - कष्टकरी यांच्यासाठी कल्याण कार्यक्रम नकोत?''

''महाराज कल्याणकारी कार्यक्रम हवेत. फक्त कल्याण म्हणजे काय याबद्दलच वाद आहे!''

''म्हणजे?''

''सर्वंकष स्वातंत्र्य व न्याय मिळवण्यासाठी संघटितपणे लढणं, त्यासाठी स्वत:ला सुसज्ज करणं हा एकमेव कल्याणकारी कार्यक्रम आहे. उलट तुम्हाला अभिप्रेत असलेल्या बालवाड्या, शाळा, संस्कारगृह वगैरे निरुपयोगी आहेत. निरर्थक आहेत.''

''पण हनुमंता... तुला कळत कसं नाही? असल्या स्वातंत्र्याच्या धडपडीत तुला त्या उघड्यानागड्या कंगाल आणि निर्बुध्द आदिवासींची काय मदत मिळणार?''

''महाराज, जन्मत: कुठे कुणामध्ये कुवत असते? पण जोपासली तरच ती वाढते ना? आम्ही सारे मिळून आमची स्वप्नं साकार करू!''

''तुझी कुवत आहे... पण हनुमंता ते आदिवासी ... त्यांची क्षमता...'' महाराजांच्या प्रत्येक शब्दात संशय होता.

''महाराज, तुम्ही निर्बुध्द म्हणता ते निर्बुध्द नाहीत. पण त्याहूनही

महत्त्वाचं म्हणजे स्वातंत्र्य व विकास कुणाच्या दयेने साध्य होत नाहीत. स्वत:च साध्य करावे लागतात. आज आम्ही अन्यायाचा प्रतिकार न करणं म्हणजे स्वत:चे मुक्तिपंख स्वत:च छाटून टाकणं!'' हनुमंताच्या शब्दात निर्धार होता.

त्याच्या युक्तिवादानं महाराज सत्येंद्र स्तंभित झाले! त्यांच्या नजरेसमोर वाढलेल्या हनुमंताच्या गर्जनेत त्यांना उद्याच्या युगाची नांदी जाणवली! लक्षावधी पददलितांनी सहस्र सूर्यांचं तेज पिऊन मुक्तिघोष केला, तर सारं विश्व कसं अंतर्बाह्य उजळून निघेल याची ती डोळे दिपवून टाकणारी झलक होती!

कधी नव्हे ते त्यांना वाटलं की राजेशाही संपली ते जनता-जनार्दनाच्या कल्याणाचंच झालं. रेड्डीची हत्या ही शासकीय अन्यायाला प्रतिक्रिया होती. त्यांच्या राजधर्माला न पटणारी बाब असली तरी सध्याची परिस्थिती त्यांच्या राजधर्माच्या आवाक्याबाहेरची होती. त्याच्या राजवैभवाबरोबरच त्यांचा राजधर्मही काळाच्या झंझावातासमोर निरुपयोगी बनत चालला होता. किंबहुना नामशेषच होत चालला होता.

प्रांजळपणानं सारा मोठेपणा बाजूला ठेवून अखेर ते उदगारले, ''हनुमंता, तुझं खरं आहे. आम्ही आता कालबाह्य झालो! किती मोठा झालास रे! मला कल्पनाही नव्हती! त्यांच्या डोळ्यात आनंदाश्रू उभे राहिले. ''हनुमंता... अरे पण...''

त्यांच्या डोळ्यांतली निष्कपट माया आणि काळजी पाहून हनुमंता एकदम गलबलून गेला. त्याने आवेगानं महाराजांचे पाय धरले.

त्याला उठवत महाराजांनी छातीशी कवटाळलं,

''महाराजा... तुम्हाला आता अगदी खरं सांगतो. रेड्डीची हत्या आमच्यातल्या कुणी केली नाही. कष्टकरी मुक्ती मोर्चानं जबाबदारी स्वीकारलीय फक्त. पण यापुढे आणखी काही विचारू नका.'' हनुमंता मनापासून बोलला.

'' त्याही स्थितीत महाराज थक्क झाले. अरे मग मघापासून का नाही बोललास?''

''महाराजा प्रश्न आमच्या भूमिकेचा होता.आमच्या कृतीची बाब नंतरची.''

महाराजांच्या डोळ्यांत आता समाधान होतं. क्षणात त्यांची काळजी मिटली होती. डोक्यावरचं चिंतेचं दडपण नाहीसं झालं होतं. हनुमंताच्या पाठीवर थोपटत ते म्हणाले,''मला कळली तुमची भूमिका. पटलीदेखील पण माझं ऐक. रात्र वैऱ्याची आहे. अतिसावध राहायला हवं, बळ कमवायला हवं. तुमची स्वप्न साकार होण्यासाठी केवळ अविचारी कृत्य करून चालणार नाही... तर तशा कृत्यात गोवलं न जाण्याची काळजी घेणंही आवश्यक आहे... जा आता तू काळजी करू नको.''

''महाराज, तुमचा आशीर्वाद हवाय आम्हाला!''

महाराजांना उचंबळून आलं.

निर्दोष आणि निष्पाप हनुमंताला पुन्हा एकदा गाढ आलिंगन देऊन त्यांनी म्हटलं,''जा, माझा अखंड आशीर्वाद आहे. देव तुम्हाला सद्‌बुद्धी देवो. यश देवो.''

भूतकाळाला भविष्यकाळ भेटला. युगसंगम झाला. गतयुगाच्या पान्ह्यानं भावी युग तरारलं.

■

हनुमंता बाहेर आला तेव्हा रघुराम खाली मान घालून उभा होता. महाराजांनी अशा तऱ्हेने रागानं हनुमंताला बोलावल्यामुळे त्याच्या छातीत धस्स झालं होतं. पोटात गोळा उठला होता. शंकाकुशंकांनी मन उद्विग्न झालं होतं. बाहेर येताच हनुमंता त्याला घेऊन पागेकडे निघाला. जाता जाता रघुराम आणखीनच अस्वस्थ झाला.

''काही काळजी करू नका नायना, सर्व काही ठीक आहे.'' बापाची चिंता जाणून हनुमंतानं म्हटलं.

तरी पण न राहवून रघुरामनं, विचारलं, ''काय झालं ते सांग तरी. कशाला बोलावलं, काय बिनसलं?''

'' काही नाही नायना... खरंच काही नाही! काही काळजी करू नका. आमचं थोडं बोलणं झालं वेगवेगळ्या विषयांवर''

रघुरामचं समाधान झालं नाही. पण हनुमंता खुशीत असल्याचं पाहून त्याची काळजी मात्र दूर झाली. सुटकेचा श्वास सोडत त्यानं म्हटलं, ''सारी व्यंकटेशाची कृपा. महाराजांनी नाराजीनं तुला बोलावून घेतलं, तेव्हा मला

त्रिभुवन आठवलं!''

" नायना, सारे विसरून जा आता. उगीच झाल्या गोष्टीचा गाजावाजा नको.'' हलक्या आवाजात हनुमंता म्हणाला.

पण त्या दोघांचा संवाद कुशाग्र बुद्धीच्या एका स्त्रीनं ऐकला होता! रेड्डीच्या हत्येच्या संदर्भात तिलाही प्रथम हनुमंताचा संशय आला होता.

होय, ती कामिनीच होती. आजूबाजूला घडणाऱ्या साऱ्या घटनांकडे तिचं बारकाईनं लक्ष असायचं.

त्या दोघांच्या नजरेला न पडता,अडून तिनं दोघांमधलं बोलणं ऐकलं होतं आणि पावलांचा आवाजही न करता ती तिथून निसटली होती. त्या दोघांच्या बोलण्यातून तिच्या एक ध्यानात आलं की तिचा संशय खोटा ठरला होता. एरवी हनुमंता एवढा निर्धास्त आणि आनंदात दिसला नसता. पण मग कष्टकरी मोर्चानं ही जबाबदारी का घेतली यामागे कोण असेल? या तरुणांना कोण वापरून तर घेत नाही ना? कोणी षड्यंत्र तर रचत नाहीय? तिच्या मनात प्रश्नांचं काहूर माजलं. कामिनी स्वत:च्या खोलीत आली, तोच फोन घणघणला. तिनं फोन उचलला, ''हॅलो,मिसेस कामिनी नायडू हीअर''

''हॅलो, मिसेस कामिनी मी डॉ. गायत्री माथूर बोलतेय.''

''डॉ. गायत्री माथूर? कामिनीचा त्या नावानं काहीच बोध झाला नाही.

''हो. मी डॉ.गायत्री माथूर. अमेरिकेहून कालच आले. तुमच्या पतींना ओळखते मी.''

''हो का? असं असं...''

''तुमचे पती खुशाल आहेत. अचानक माझ्या वडिलांची तब्येत बिघडली म्हणून मला यावं लागलं''

''काय होतंय वडिलांना'' ? कामिनीचा सूर औपचारिक होता.

''मायोकार्डिअल इन्फार्क्शन....हार्ट ॲटॅक!''

''ओ,आय सी. आता कसे आहेत?''

''आता ठीक आहेत. ही इज रिकव्हरिंग पण मिसेस कामिनी मुद्दाम फोन एवढ्यासाठी केला की तुमच्या पतींची खुशाली कळवावी आणि तुमची खुशाली वा निरोप त्यांना कळवावा. कसं आहे सारं?''

''सर्व ठीक आहे'' कामिनीनं तुटकपणे म्हटलं.

''मुद्दाम विचारते, कारण टी.व्ही वर व्हायोलन्सची न्यूज आली...''

"काही विशेष नाही हो. वुई आर फाईन."

"बरं मग पुन्हा जाण्यापूर्वी फोन करीन."

"बरं बरं ... ओ.के "म्हणून कामिनीनं घाईघाईनं फोन ठेवून दिला. अशा तऱ्हेच्या फोनला विशेष महत्त्व न देता उत्तर देणं तिच्या आताशा अंगवळणी पडलं होतं. आपल्यासारख्या राजघराण्याशी जवळीक साधू पाहणारे पुष्कळ असतात पण असल्या गोडबोल्यांशी संबंध वाढवणं म्हणजे गळ्यात धोंड बांधून घेण्यासारखं वाटू लागलं होतं. विशेषत: आर्थिक परिस्थिती खालावल्यापासून तर तिला असल्या परिचितांचा काहीसा तिटकाराच येऊ लागला होता. त्यातून महाराज सत्येंद्र कमलेंद्राकडून पैसे स्वीकारायला तयार नव्हते. स्वैपाक्याकडून पैसा स्वीकारणं त्यांना कमीपणाचं वाटत होतं. अन् शिवाय त्याच्याबद्दल मनात अजूनही अढी होती. रागही होता.

"नुसत्या गोड बोलण्यानं खरं प्रेम निर्माण होत नाही अन् खरी आत्मीयता कृत्रिमपणे गोड न बोलण्यानं नाहीशीही होत नाही!" ती स्वत:शी पुटपुटली आणि स्वत:च्या कामाला लागली.

■

सोमनिलयमपासून शेकडो मैलांवर मुंबईतल्या गजबजलेल्या माटुंगा परिसंरातील त्या चाळीमध्ये डॉ. गायत्रीचे आई-वडील आणि अपंग धाकटा भाई गोविंद राहत असत. पण आज यावेळी तिथे चिंतेचं वातावरण होतं. अमेरिकेतून आलेल्या गायत्रीला हॉस्पिटलमध्ये दाखल केलेल्या वडिलांना भेटायला जायचं होतं. माणसांची कमतरता असल्यामुळे काल रात्री वडिलांपाशी कोणी राहिलं नव्हतं.

कामिनीला फोन करून झाल्यावर लगेच गायत्रीनं बाहेर जायची तयारी केली. उन्हं वाढवायच्या आत हॉस्पिटलमध्ये जाऊन यायला हवं होतं. तेवढ्यात तिचं लक्ष धाकट्या भावाकडे गोविंदाकडे गेलं. गोविंदा वेडीवाकडी हालचाल करीत केविलवाणेपणानं हसला. त्याच्या हसण्यानं चेहऱ्यावरचे भावही आणखीनच वेडेविद्रे बनले. "ताई मी येऊ का?" अस्पष्ट अन् बोबड्या स्वरात त्यानं विचारलं. तिला कळवळा आला. पण त्याला नेणं शक्यच नव्हतं. मोठ्या मायेनं, समजावणीच्या सुरात गायत्री त्याला म्हणाली, "आज नको रे, फार घाई आहे. बाबांना बघून मी अगदी लवकर



येते हं, अगदी लवकर!"

त्याच्या हिरमुसल्या चेहऱ्याकडे पाहून तिचे डोळे पाणावले. मनात आलं, "कोणत्या अपराधांची शिक्षा भोगतोय हा?"

तिच्या डोळ्यांपुढे त्याच्या बालपणीचं ते आजारपणाचं दृश्य उभं राहिलं. जेमतेम चारपाच वर्षांचा असेल गोविंदा. अन् ती होती असेल दहा अकरा वर्षांची. काही दिवस त्याला ताप येत होता. अचानक त्याची ही अवस्था झाली. पुढे तिच्या लक्षात आलं की तो आजार बहुतेक करून व्हायरल एन्केफॅलायटीसच होता. पण त्यावेळी कुणाला निदानच झालं नाही!

गरिबीमुळे चांगल्या डॉक्टरकडे जाताही आलं नाही!

त्या क्षणी गायत्रीला के.के. नायडूबरोबरच्या आर्ग्युमेंटची आठवण झाली. मनात आलं, ह्या श्रीमंतांना कसं काय कळेल आपलं दु:ख?

गोविंदा विकलांग होऊन पडण्यापूर्वी ती जेव्हा त्याच्या कलाकलानं त्याच्याबरोबर खेळे तेव्हाचं त्याचं रूप तिच्या नजरेसमोर आलं. त्याच्या डोळ्यांतली चमक, बोलण्यातला चटपटीतपणा, हालचालीतली चपळाई डोळ्यांपुढे आली.

त्या त्याच्या रूपाची कशी ही दुर्दशा झाली होती! एखाद्या राजवाड्याच्या भग्नावशेषांप्रमाणे गोविंदाची सद्यस्थिती होती. त्याच्या विकलांग, लुळ्या-पांगळ्या देहाकडे, त्याच्या घायाळ व असहाय नजरेकडे पाहून त्याच्या मूळ स्वरूपाची कल्पनाही करता आली नसती.

तिला भडभडून आलं. विशीतला गोविंदा आज अव्यंग असता तर मिळवता जोडता होऊन स्वत:च्या संसाराला लागला असता. आई-वडिलांना हक्काचा आधार झाला असता. पण आज? साऱ्या कुटुंबाला घोर लावतोय आणि स्वत: दीनवाणं परावलंबी जीवन जगतोय!

कसंबसं स्वत:ला सावरून गायत्रीनं झटपट सँडल चढवले आणि ती रस्त्यावर येऊन टॅक्सीकरिता थांबली. तीन-चार टॅक्सीवाले तिथेच होते. पण भाडं जवळचं असल्यामुळे त्यांनी नकार दिला. गायत्री वैतागली. दुरून ते पाहणाऱ्या एका म्हाताऱ्या टॅक्सी ड्राय़व्हरला अखेर तिची दया आली. त्यानं तिला त्या सार्वजनिक रुग्णालयापाशी आणून सोडलं.

ती पोर्चमध्ये शिरताच, ‘‘ओऽ बाई कुठे चाललात? काय घर आहे का तुमचं? ’’एक सुरक्षा कर्मचारी ओरडला. ती एकदम चपापली. अपमानानं खचली अन् खवळली. खेकसण्याची कानांना आताशा सवय राहिली नव्हती! पण मनातली खळबळ तशीच दाबणं भाग होतं. भांडणात वाया घालवायला वेळ नव्हता. तिनं व्हिजिटर्स पास दाखवला. तिचा तो पास पाहूनही जणू काही उपकार करतोय अशा चर्येनं त्या कर्मचाऱ्यानं तिला आत जाऊ दिलं. लगबगीनं ती अतिदक्षता विभागात आली.

तिथे येते ना येते तोच तिथल्या स्टाफ नर्सनं तिला दटावलं, ‘‘भेटण्याची वेळ संपलीय! आत कशा आलात तुम्ही?’’

गायत्रीनं पुन्हा तिचा पास काढून त्या नर्सलाही दाखवला.

पण तो बघून न बघितल्यासारखं करून, ''ते माहीत आहे. राऊंड चालू आहे. आता भेटायला नाही मिळणार'' नर्स डाफरली.

आता मात्र गायत्रीचा संयम संपला. संताप अनावर झाला. रागानं तिच्या तळपायाची आग मस्तकात गेली. विचार आला, स्वत: डॉक्टर असून आणि प्रतिष्ठित असूनदेखील आपल्याला ही वागणूक? रागाच्या भरात तिनं नर्सकडे एक जळजळीत कटाक्ष टाकला आणि तिरीमिरीतच त्या नर्सला न जुमानता ती तडक आत घुसली. ती स्टाफ नर्स भडकली. गायत्रीच्या मागोमाग धावली. तिला पाहून गायत्री आणखीनच खवळली. एकदम सफाईदार इंग्रजीत कडाडली,'' सिस्टर, तुमचा एक शब्दही ऐकायचा नाही मला. काय करायचं ते तुम्ही करून घ्या. माझा पेशंट मी या क्षणी आत्ता बघणार, कळलं?''

गायत्रीचा तो चंडिकावतार पाहून नर्स एकदम गारच झाली.

ते पाहून गायत्रीला आणखी उत्साह आला. नर्सला काही बोलू न देता एकदम स्वत:चं कार्ड दाखवून तिनं म्हटलं,''लक्षात ठेवा, मी कुणी असहाय अशिक्षित बाई नाहीय. पुन्हा असं वागलात तर हायेस्ट लेव्हलपर्यंत तक्रार करीन. तुम्हाला सोडणार नाही.''

ती स्टाफ नर्स पोरगेलीशी आणि अगदी नवीन होती म्हणून की काय, वरमून गप्प राहिली. मग नाइलाजानं हात चोळत क्षणभर गायत्रीकडे रागाने बघून पाय आपटत चरफडत ती काऊंटरकडे गेली.

त्याचवेळी गायत्रीला जाणवलं की आपला तोल गेला! एखादी अनुभवी मेट्रॅन असती तर तिला हाकलून काढायला कमी केलं नसतं तिनं! पण तिचाही इलाज नव्हता. हे सारं अनपेक्षित होतं. तशीच ती वडिलांच्या खाटेपाशी आली. पाहते तर काय? वडिलांची दशा पाहून तिला धक्काच बसला. पलंगपोस भिजलेला होता. दोन्ही हातांवर शीरेतील इंजेक्शनच्या जागी सूज आली होती. इंजेक्शन देताना झालेल्या चुकीमुळे त्वचेखाली रक्तस्राव झाल्यामुळे निळसर फुगे आले होते. लघवीचं पात्र भरून उतू चाललं होतं. त्याच्यावर माश्या बसत होत्या. पुन्हा तिच्या डोक्यात सणक गेली. घाईघाईनं तिनं वडिलांची चौकशी केली. आणि मग सारं काही बारकाईनं विचारून घेतलं. तिथल्या नर्सेस आणि वॉर्डबॉयनी त्यांना दिलेली वागणूक ऐकून तिला आणखीनच संताप आला. त्यांच्या केसपेपरवर लिहिलेले

आतापर्यंत केलेले आणि पुढे चालू करणार असलेले उपचार तिनं वाचून पाहिले. मग कार्डिॲक मॉनिटरवरील हृदयाच्या स्पंदनाचा आलेख काळजीपूर्वक पाहिला.

एवढी गलिच्छ व्यवस्था असतानाही केवळ सुदैवानचं की काय, काळजी करण्यासारखी परिस्थिती नव्हती.

थोडा वेळ वडिलांशी बोलून ती राऊंड घेत असलेल्या डॉक्टरांच्या पथकापाशी आली आणि बाजूला उभी राहिली.

राऊंड संपवून डॉक्टर काही सूचना देत बाजूला उभे होते. ते थोडे मोकळे झालेले दिसताच गायत्री ''ऍक्स्क्यूज मी'' म्हणून जशी पुढे झाली तशी डॉक्टरांच्या कपाळाला आठ्या पडल्या. आपण कामात असताना मध्येच डिस्टर्ब करणारी ही आंग्लाळलेली जादा शहाणी,अनाहूत बाई कोण? असं प्रश्नचिन्ह त्यांच्या कपाळावरच्या आठ्यांमध्ये होतं !पण गायत्रीनं स्वत:ची ओळख करून देताच मनातल्या मनात आशा-अपेक्षांची व संभाव्य फायद्यांची समीकरणं मांडली गेली, अनेक हिशेब झाले, आणि त्यांची चर्या तात्काळ बदलली.

''मी डॉ.देशपांडे, चीफ ऑफ द युनिट'' त्यांनी स्वत:ची ओळख दिली.

गायत्रीनं त्यांना थोडं बाजूला बोलावून घडलेला प्रकार सांगितला तेव्हा खूप आपुलकी आणि काळजी असल्याप्रमाणे डॉ.देशपांड्यांनी तिची माफी मागितली. मग हळूच म्हटलं,''इथल्या वॉर्डबॉयजचे हात गरम केलेत तर सर्व व्यवस्थित होईल.''

'' पण डॉक्टर हा तर उघड भ्रष्टाचार झाला...''

''डॉ. माथूर, ही अमेरिका नाही. तुम्हाला तुमच्या पेशंटची सेफ्टी आणि कम्फर्ट हवा की नको? हाच इथला व्यवहार आहे.''

पण डॉ.देशपांडे, ''तुमचा काहीच कंट्रोल नाही? तुमची जबाबदारी नाही?''

''डॉ. माथूर, ते सारं विसरा, ज्यांच्या हाती सत्ता नसते त्यांच्या माथ्यावर जबाबदारीचं कसलं ओझं लादताय?''

डॉ. देशपांडेचा तो युक्तिवाद गायत्रीला समजला नाही.

''म्हणजे?'' तिनं भाबडेपणानं विचारलं.

"डॉ. माथूर,क्लास थ्री, क्लास फोर कर्मचाऱ्यांच्या युनियन्स असतात. त्यांची ताकद किती असते हे कळायचं नाही तुम्हाला. उलट आम्ही पांढरपेशे. संख्येने कमी. या सिस्टिममध्ये आम्हाला किंमत शून्य, आमची ताकद शून्य!"

डॉ. गायत्रीला आत्ता कळून चुकलं की एका वेगळ्या स्तरावर सारं काही "बळी तो कान पिळी" याच नियमानं चाललंय.

"डॉ. माथूर, तुम्ही उगाच वैतागू नका. तुमच्या हिताचं ते मी सांगितलं, अहो ड्यूटी वगैरे म्हणाल तर सारं कागदावर असतं."

"म्हणजे याला पर्याय नाही?"

डॉ. देशपांडेना डॉ. गायत्री माथूरचा कॉन्टॅक्ट महत्त्वाचा होता. त्यांनी पुन्हा तिची माफी मागून म्हटलं," तुमची तत्त्व उदात्त आहेत. आदर्श आहेत. मला शंभर टक्के पटतात. पण खरंच माझा नाइलाज आहे."

"ओ.के. डॉक्टर", त्यांच्या स्पष्टीकरणानं गायत्री गोठून गेली. पण पर्याय नव्हता. डॉ. देशपांडेचं म्हणणं मान्य करणं भाग होतं. ही अमेरिका नव्हती. भारतवर्ष होता. स्वदेश होता. भाऊ, आई-वडील तिघांना अमेरिकेला घेऊन जाणं तिला शक्य नव्हतं. म्हणजे पर्यायानं त्यांना इथेच दिवस काढायला लागणार होते. अडल्यापडल्याला याच लोकांची मदत लागणार होती. गरजेला यांच्याकडे यावं लागणार होतं. वाकड्यात शिरण्यात अर्थ नव्हता. ती वडिलांच्या खाटेपाशी आली.

तिचं आणि डॉ. देशपांड्याचं बोलणं चालू असताना त्यांच्याकडे एकटक पाहात उभ्या असलेल्या गलेलठ्ठ वॉर्डबॉयला बोलावून त्याच्या हाती पन्नास रुपयांच्या नोटेची घडी सरकवून "बाटके लेना" म्हणून तिनं पर्स बंद केली.

"सलाम मेमशाब"... म्हणून त्यानं तिला सलाम केला. त्याच्या तोंडातल्या पानामुळे त्याचा आवाज थोडासा बोबडा झाला होता. शिवाय "पहिल्या धारेची" रिचवल्यामुळे मिश्र दर्पही येत होता. त्याच्या नजरेत केवळ फुकट कमाईची तृप्ती नाही तर बाजी मारल्याची गुर्मी आणि घमेंड होती. चेहऱ्यावर छद्‌मी भाव होते.

मनातल्या मनात चरफडत पण बाहेरून तसं न दाखवता," बाद में और देगी" म्हणून ती वडिलांकडे वळली.

तो धटिंगण वॉर्डबॉय बाहेर गेला आणि काही सेकंदातच दोन वॉर्ड-बॉइज् आत आले. काही क्षणात सारं चित्र पालटलं.

वडिलांचा निरोप घेऊन निघाली तेव्हा एकीकडे तिचं समाधान झालं होतं तर दुसऱ्या बाजूनं तिचा जळफळाट होत होता. तिच्या मनातं आलं, काय ही सडलेली व्यवस्था! कर्तव्याचं नाव नाही! पण उद्दामपणा किती! मगरुरी किती! मिजास किती! आपण मात्र? सुशिक्षित! असहाय! केविलवाणे. ...वाटलं, सत्ता असती तर सगळ्यांना कसं वठणीवर आणलं असतं!

पण हॉस्पिटलमधून बाहेर पडताच तिला जाणवलं की संधिसाधूपणा, फसवणूक,खोटेपणा, बेपर्वाई,ही इथली सन्मान्य रीत बनलीय. कर्तव्य करणं म्हणजे खुळेपणा बनलाय. कारण कर्तव्य केलं की जादा मलिदा मिळत नाही! वरपासून खालपर्यंत लागलेली भ्रष्टाचाराची कीड आता दु:साध्य झाली आहे! सारं बदलण्यापलीकडचं आहे!

मग अचानक तिच्या मनात विचार आला, जाऊदे हा नसता ताप नकोच. पैसे टाकून कामं करून घ्यावी आणि अमेरिकेचा रस्ता धरावा!

रस्त्यावर येताच तिनं टॅक्सी गाठली. अपेक्षेप्रमाणेच त्यानं जवळचं भाडं म्हणून कुरकुर करताच पन्नासची नोट त्याच्यापुढे टाकली.

टॅक्सीवाला हबकलाच. दुसऱ्याक्षणी मीटर डाऊन करून त्यानं टॅक्सी सुरू केली.

टॅक्सीतून जाताना गायत्रीच्या मनात विचार आला, लहानपणी आपल्याला शिकायला मिळालं होतं की '' विद्वान सर्वत्र पूज्यते'' पण आता थोडासा बदल करावा लागणार होता! विद्वान ऐवजी श्रीमान हा शब्द घालणं आवश्यक होतं. श्रीमान् सर्वत्र पूज्यते! प्रदूषणानं तिचे डोळे चुरूचुरू लागले. डोळ्यांतलं पाणी पुसत घरासमोर टॅक्सीतून उतरून निघाली तेव्हा टॅक्सीवाल्यानं तिला थांबवलं.

'' ताई तुम्ही सुशिक्षित अन् सुसंस्कृत आहात. एका शब्दानं बोलला असतात तरी चाललं असत! अहो आम्हालाही माणुसकी आहेच की! व्यवसायात परवडत नाही म्हणून काही वेळा जवळची भाडी नाकारावी लागतात. पण ते काही स्वखुशीनं नव्हे.

हे उरलेले पैसे घ्या. कृपा करून राग नका मानू ! टॅक्सीचा धंदा

आजकाल खूपच जिकिरीचा झालाय. हप्ता, खंडणी, महागाई, मंदी यांनी आम्हालाही भयंकर फटका बसलाय.''

त्यानं दिलेले पैसे घेताना गायत्रीच्या लक्षात आलं की जीवनाचा अर्थ सोपा नाही!

■

ती घरी आली तेव्हा तिची आई दारातच उत्कंठेनं तिची वाट पाहत होती. त्यामुळे आल्या आल्या आईला तिनं वडिलांची तब्येत सुधारत असल्याचं सांगितलं आणि काळजी दूर केली. मंग लगेच चहा केला आणि



आईला दिला, गोविंदाला पाजला आणि मग स्वत: घेतला.

थोडावेळ इकडे-तिकडे केल्यावर स्वयंपाक जेवण वगैरे सारं आटोपून ती थोडी लवंडली. सहज तिनं बाजूला पडलेलं एक मासिक उचलून उघडलं नि तिला आश्चर्याचा धक्का बसला! हो, तो फोटो के.के. नायडूचाच होता. आणखी तीन-चार फोटोही होते. अमेरिकेत यश मिळवलेल्या भारतीयांबद्दल तो लेख होता. लेखातल्या परिचयामध्ये के.के. नायडूच्या हॉटेल व्यवसायाची प्रशंसाही होती.

तिच्या मनांत आलं, काय ऋणानुबंध तरी! इथेही के.के.आहेच!

डोळ्यांवर झापड आल्यानं तिनं मासिक बाजूला ठेवलं. तेवढ्यात कॉल बेल वाजली. उठून बाहेर येऊन पाहते तो बाहेर तिची मैत्रीण सुलभा चित्रे!

"हाय सुलभा! ये,ये ना ऽऽ!"

ख़ादीची राखाडी रंगाची साडी, त्याच रंगाचा ब्लाऊज आणि खांद्याला खादीचीच शबनम अडकवलेली सुलभा दमलेली आणि घामेजलेली दिसत होती. गायत्री घरात असल्याचं पाहून प्रसन्न झालेली सुलभा हाश्श्य, हुश्श्य करीत आत आली.

"सुलभा, किती बरं वाटलं तू आलीस! अगदी वेळेवर आलीस. अस्सा कंटाळा आला होता."

सुलभाला ते ऐकून खूप बरं वाटलं. तिला जाणवलं, गायत्री बदलली नव्हती. पहिल्यासारखीच निरागस, प्रेमळ. फक्त बाह्यरूप बदललं होतं.

" काही फरक नाही गायत्री तुझ्यात. होतीस तश्शीच आहेस अगदी!"

" अगं फरक काय व्हायचा? हळूहळू म्हातारपण येईल एवढंच!" प्रसन्न हसत गायत्रीनं पुढे म्हटलं. " पण तुझं काय चाललंय सध्या? तिनं सुलभाच्या खादीच्या पेहरावाकडे न्याहाळून बघत विचारलं.

"मी ना? मी एका पार्टीची पूर्णवेळ कार्यकर्ती आहे."

" म्हणजे.? पॉलिटिक्समध्ये पडलीस की काय?" थोडं नवल वाटून गायत्रीनं विचारलं.

" तसं म्हणायला हरकत नाही. मी, ऑल इंडिया पार्टी फॉर सायंटिफिक सोशॅलिझमची सदस्य आहे. पार्टीच्या कामगार संघटनांचं कामही करते."

"युनियन्सचं काम? काय सांगतेस सुलभा? अगं हे कामगार एवढे माजलेयत! त्यांना फक्त पगारवाढ हवी. हक्क हवे. जबाबदारी नको. कर्तव्याचं तर नांवच नको. सगळं सोडून ह्या झुंडशहांची कसली सेवा करतेस? एवढी चांगली ग्रॅज्युएट असताना आणखी काहीच नाही का करता येणार?"

गायत्री एवढी उत्तेजित झालेली पाहून सुलभाची करमणूक झाली. कामगार चळवळीबद्दल बहुतेक मध्यमवर्गीयांमध्ये हीच भावना तिला आढळायची ! तिनं अजिबात अस्वस्थ न होता म्हटलं, "गायत्री कामगार चळवळीत दोष आहेत हे मान्य. परंतु आपण नुसती टीका करून... नामानिराळं राहून ते दूर होतील का? पुष्कळ जण नावं ठेवतात पण काम करायला कोणी पुढे येत नाहीत. पांढरपेशा बुद्धिवाद्यांच्या अशा वृत्तीमुळे दोष दूर होत नाहीत, वाढत जातात. त्यामुळे कामगारांसकट साऱ्यांचा तोटा होतो. फायदा होतो फक्त स्वार्थी हितसंबंधीयांचा! म्हणून मी कामगार संघटनेत काम करते."

गायत्री क्षणभर विचारात पडली. तिच्या स्वत:च्या भावना खऱ्या असल्या तरी सुलभाच्या म्हणण्यातही तथ्य असल्याचं तिला जाणवलं. पण तिच्या मनातला संशय मात्र फिटला नाही. "सगळं आकाशच फाटलंय तिथं तू एकटीनं ठिगळं लावण्याचा प्रयत्न करून काय होणार?" गायत्री स्वत:शीच बोलल्यासारखी म्हणाली.

ते खरं आहे. गायत्री खरं पाहायला गेलं तर आकाशच फाटलंय असं नव्हे. अंतर्बाह्य सारंच बिघडलंय. आपण कुठे सर्वगुणसंपन्न आहोत? पण प्रामाणिकपणानं स्वत:ची सुधारणा करताना इतरांनाही फायदा होतो आणि इतरांना प्रगती करण्यात मनापासून सहकार्य केलं तर स्वत:चीही प्रगती होते हे साधं पण मूलभूत तत्त्व आहे. नाही का? त्यामुळे मी वैयक्तिक स्वच्छता, सार्वजनिक स्वच्छता, व्यायाम, योगासनं, आहार, लोकसंख्या नियंत्रण समतोल, औद्योगिकीकरण, पर्यावरण शिक्षण यांचं महत्त्व स्वत: समजावून घेत व प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न करत इतरांनाही पटवून देण्याचं काम करते. खेड्यापाड्यांतून शहराकडे येणारा लोंढा लक्षात घेऊन तंत्रज्ञान, ग्रामीण उद्योग यावरदेखील आम्ही भर देतो. अमेरिकेत आमचा एक परिचित आहे. तो देखील आम्हाला खूप मदत करतो."

"ते सारं ठीक आहे. तुझं बरोबर असेलही कदाचित पण व्यवहार

देखील बघ ना!'' सारं लक्षपूर्वक ऐकणारी गायत्री मध्येच म्हणाली, मग क्षणभर थांबून तिनं पुढे म्हटलं, '' शेवटी वैयक्तिक जीवनात कशाला महत्त्व आहे? तुमच्यापाशी चार पैसे नसले तर तुम्हाला कुत्रंसुद्धा विचारत नाही. खरं की नाही? अगं ज्या पक्षाची तू सदस्य आहेस तो पक्षदेखील विचारणार नाही तुला!''

गायत्रीच्या बोलण्यानं सुलभा खट्टू झाली. तिची आर्थिक परिस्थिती गायत्रीपेक्षा नक्कीच खालची होती. पण गायत्री तसं बोलून दाखवील असं तिला वाटलं नव्हतं. त्यामुळे तिला काय बोलावं सुचेना. गायत्रीचा प्रतिवाद कसा करावा समजेना. किंबहुना प्रत्यक्ष श्रीमंती आली तरच गायत्रीला उत्तर मिळालं असतं. आणि ते तर शक्य नव्हतं. मग अचानक तिला आठवलं की अमेरिकेतून आलेलं पत्र तिच्या शबनममध्येच होतं. ते बाहेर काढून तिनं म्हटलं, ''गायत्री ते जाऊ दे. हे पत्र वाचून पाहा. तुला यातलं काही पटतंय का? नाही तर फरगेट इट. आपण आपल्या आपल्या मार्गांनी जाणारच. थोड्या गप्पा मारू. मी तुझ्या हातचा चहा घेईन. तुझे अमेरिकेतल्या फोटोंचे अल्बम पाहीन आणि मीटिंगसाठी सटकेन.''

''बरं,बरं, बघू दे'' म्हणून गायत्री पत्र वाचू लागली.

प्रिय सुलभा व सहकारी मित्र,

सोबत चेक आहे. मिळाला की कळवा.

तुमचं काम गती घेत असलेलं पाहून खूप समाधान वाटलं. पण माझ्या मते तुमच्या कार्याला, मार्क्सवादाला सर्वतोपरी सामावून घेणाऱ्या पण त्याच्या अतीत असलेल्या वेदान्ताचं,आत्मज्ञानाचं अधिष्ठानं हवं. आज जगात सर्वत्र मूलभूत अशी एकच समस्या आहे. ती म्हणजे अविद्या आणि तज्जन्य मूल्यसंभ्रमाची. केवळ आत्मज्ञानानं व्यक्ती आणि अखिल मानव मुक्ती पर्वात प्रवेश करू शकतात. समर्थ, विश्वात्मक आणि संकुचित सुख-दु:खातीत होऊ शकतात. या उन्नत अवस्थेचा आविष्कार उदात्त संस्कृतीत होऊ शकतो.

तुमच्या महाकार्यात हा आशय येऊन आपलं सर्वांचं खरं कल्याण व्हावं हाच काळाचा संकेत आहे.

शुभेच्छा!

तुम्हा सर्वांचा,

के.के. नायडू.

पत्र वाचून होताच गायत्रीनं थोड्या आश्चर्यानं हसून म्हटलं, ''अगं या के.के. नायडूला ओळखते मी!'' मग तिनं त्यांच्या भेटीची हकीकत सुलभाला सांगितली.

सुलभालाही खूप आश्चर्य वाटलं. तिनं गायत्रीला म्हटलं, ''कल्याण म्हणजे दुसरं-तिसरं काहीच नाही गायत्री. आपण सामान्य माणसं ओंडक्यासारखं जगतो. वेदान्त आपल्याला 'नदी' बनायला शिकवतो. आपण धुळीचे कण असतो. वेदान्त आपल्याला आकाश व्हायला शिकवतो. के.के. नं त्याच्या अगोदरच्या पत्रात गीतेबद्दल फार छान लिहिलंय.'' तो म्हणतो की हा वैचारिक काथ्याकूटाचा भाग नाही. हा प्रत्यक्षानुभूतीचाच भाग आहे! स्थित्यंतरित अवस्था अनुभवण्याचा भाग आहे!''

गायत्री सुलभाचं बोलणं ऐकून स्तिमित झाली. ''अगं किती गहन आणि गंभीर बोलतेस? तुझं सगळं मान्य. मग तर झालं? तुम्ही सगळे ग्रेट आहात. पण मला नाही झेपत असलं बोजड तत्त्वज्ञान.''

''पण गायत्री, आपल्यातल्या दोषांची मूळंच उपटून टाकायची तर हे आवश्यकच आहे. एरवी कामगारांना नावं ठेवण्यात कसली आलीय सिन्सिरिटी ?''

''तिच्या बोलण्यातली खोच गायत्रीला कळली. पण सुलभा धाकट्या बहिणीसारखी प्रेमळ आणि प्रामाणिक होती. तिला ते बोलायचा हक्क होता. तिच्या ध्यानात आलं की के.के. जेव्हा स्वरूपाच्या शोधाबद्दल बोलला तेव्हा या मथितार्थाची तिला पुसटची जाणीवदेखील नव्हती. तिच्या मनात एक कल्पनाचित्र तयार झालं. सुलभाचं कार्य तिला धबधब्यासारखं दिसलं. क्षणातच शेकडो शेकडो दिशांनी प्रपात कोसळतायत असं तिला दिसायला लागलं. त्या धबधब्यांचा आवाज आसमंत भरून टाकू लागला. ते धबधबे मग एवढे वाढले की सारं विश्व त्यांत बुडून गेलं. मग क्षणात ते सर्व पाणी आटून अंतर्बाह्य तेजानं भरून गेलेलं नवं विश्व तिच्या डोळ्यांपुढे उभं राहिलं. सुलभासारखे लाखो तरुण-तरुणी चैतन्याची केंद्रे बनली होती आणि त्यांच्याकडून साऱ्या जगाला अंत:प्रकाशाचा पुरवठा होत होता. ते विलक्षण प्रकाशमान पूर्वी कधीच न पाहिलेलं दृश्य म्हणजे ज्ञानेश्वरांचं पसायदान असं तिला भासलं. तत्क्षणी तिच्या अंगावर रोमांच उठले. ते चित्र पाहताना

चक्रावून गेल्यासारखं झालं. सारं काही गरागरा फिरतंय असं वाटलं कशी-बशी ती उठली. चेहऱ्यावर पाणी मारलं आणि परत आली.

तिच्या त्या गप्प गप्प वागण्याचा सुलभाला बोध झाला नाही. तिला वाटलं आता हा विषय पुरे झाला. मग तिनं सहज स्वरात गायत्रीकडे तिच्या फोटोंचे अल्बम मागितले.

गायत्रीलाही तेच हवं होतं. वातावरण हलकं-फुलकं व्हायला हवं होतं. त्यामुळे लगेच उठून ती अल्बम घेऊन आली. मग त्या अल्बममधील एक एक फोटोची तिनं सुलभाला माहिती द्यायला सुरुवात केली.

खूप आठवणी निघाल्या. मध्येच गायत्रीच्या आईनं दिलेले चहा-पोहे झाले.

सगळं वातावरणच बदलून गेलं. खेळकर झालं. गायत्रीची आईही गप्पात सामील झाली. त्यातच सुलभाच्या लग्नाचाही विषय निघाला!

सुलभा निघाली तशी गायत्रीनं तिला आग्रहानं परत बोलावलं.

पाठमोऱ्या सुलभाकडे पाहताना गायत्रीच्या मनात आलं, अनाथाश्रमात वाढलेली ही आपली मैत्रीण! वयानं लहान, शिक्षणानं कमी, पैशानं गरीब... पण मनानं किती मोठी! दृष्टीनं किती विशाल! विचार आणि कृतीनं किती श्रीमंत! पुन्हा एकदा तिला निमुळत्या पर्वत शिखरावर उभं राहिल्यावर यावी तशी चक्कर आली. शांत बसल्यावर तिला जाणवलं की खरोखरच सुलभाचा मार्ग वेगळा आहे. दोघांच्या दिशा वेगवेगळ्या आहेत! सुलभाचा मार्ग प्रकाशाचा खरा पण आपल्याला तो प्रकाश सहन होत नाहीय ! ती संथपणे गोविंदाकडे गेली.

■

डॉ. गायत्रीच्या घराच्या शेजारीच मराठे नावाचा एक युनियन लीडर राहात असे. जुना परिचय आणि शेजारधर्म अशी दोन्हीं कारणं पुढे करून त्यानं गायत्री आणि गोविंदाला जेवायला बोलावलं होतं. अमेरिकेला परत जाण्यापूर्वी आलंच पाहिजे, असा त्यानं फारच आग्रह केल्यामुळे गायत्रीनं त्या दुपारी त्याच्याकडे जेवायला जायचं ठरवलं. गोविंद त्याच्या सायकलवर अन् ती पायीच मराठेच्या घरासमोर पोचली.

माटुंग्यामधल्या एका बोळात ती छोटीशी चाळ होती. चार खोल्यांची बैठी चाळ. कोपऱ्यावरच्या स्वत:च्या खोलीत मराठे आरामखुर्चीत बसून

मांजराबरोबर खेळत होता. अधूनमधून जेवणाची तयारी कितपत झाली ते बायकोला विचारत होता. त्याच्या मुली टी.व्ही. बघत होत्या. टी.व्ही चा आवाज आणि बाहेरून येणारा रामाच्या देवळातील आरतीचा आवाज एकमेकात मिसळत होते. स्वयंपाकाच्या फोडणीचा वास आणि बाहेर साठलेल्या कचऱ्याचा कुबट वास यांचंही मिश्रण होत होतं.

अचानक क्रिकेट खेळणाऱ्या पोरांचा चेंडू दरवाजावर आपटला म्हणून मराठे बाहेर आला. पाहतो तो बाहेर डॉ. गायत्री माथूर उभी. खेळणाऱ्या पोरांना दम मारायचं विसरून मराठेनं एकदम गायत्रीचं स्वागत केलं. तिच्याबरोबर तिचा अपंग भाऊही त्याच्या सायकलवर बसून आला होता.

ती आत शिरता शिरताच फिदी फिदी हसत मराठेनं विचारलं, "काय, कसं काय आहे? बरं झालं मुद्दामहून वेळ काढून आलात. काय म्हणतंय भांडवलदारांचं नंदनवन... धनिकांचा स्वर्ग... अमेरिका?" हसता हसता तिला उत्तर देण्याची संधी न देता स्वतःच बाजूच्या खूर्चीवर बसत त्यानं तिच्या वडिलांच्या चौकशीची फॉरमॅलिटी उरकून टाकली. त्याही प्रश्नाच्या उत्तराकडे लक्ष न देता गोविंदाकडे रोखून पाहत मराठेनं जोराचा उसासा सोडला . मग कृत्रिम सहानुभूतीनं म्हटलं, "ह्याचे मात्र खरंच हाल आहेत!"

गोविंदानं ते ऐकलं त्यालाही मराठेची भावना कळल्यानं की काय त्याचा चेहरा वेडावाकडा झाला.

मराठेनं खूप आग्रह केला म्हणून जेवण्यासाठी आलेल्या गायत्रीला ते सारं असह्य झालं.

गायत्रीनं गोविंदाला तिथे बसायला मदत केली. तेवढ्यात बाजूच्या मोरीमधून पडदा बाजूला करून नुकतीच आंघोळ केलेली मराठेची थोरली मुलगी बाहेर आली. मोरीच्या बाजूलाच स्वयंपाकाच्या कट्ट्यावर आईनं भरून दिलेला पाण्याचा ग्लास तिनं ट्रेमधून गायत्रीसमोर आणून ठेवला.

गायत्रीनं गोविंदाला पाणी दिलं त्याचवेळी टी.व्ही. तल्या कार्यक्रमामध्ये कव्वालीचा आवाज चढला आणि त्याचवेळी बाहेरच्या आरतीचा आवाजही वाढला.

गायत्रीनं उठून ग्लास परत दिलं आणि मराठेच्या बायकोबरोबर ती बोलत बसली.

थोड्या वेळानं जेवणं झाली तशी पुन्हा मराठेनं म्हटलं." काय

डॉक्टरबाई? आता मोठ्ठा फ्लॅट घ्या. अमेरिकेतील तर बंगलागाडी असणारच; आई-वडिलांनाही ह्या वयात थोडे सुखात ठेवा.''

त्याच्या बोलण्यानं मराठेची बायको संकोचली. तिला शरमल्यासारखं झालं.

पण गायत्रीनं मराठेच्या बोलण्याकडं दुर्लक्ष करून म्हटलं, ''बरं आहे. फार छान जेवण झालं. आता निघू मी?''

त्याबरोबर गडबडीनं मराठेनं म्हटलं,'' आमच्या या मिसेसला लो बॅक एक की काय म्हणतात ना, तसं आहे. पुष्कळ वर्षं झाली. खूप उपाय केले. पण आता आलाच आहात तर म्हटलं एवढ्या मोठ्या डॉक्टरचा सल्ला तरी घ्यावा...''

''पुष्कळ वर्षांची पाठदुखी आहे?''

''होय... मराठेच्या बायकोनं म्हटलं.''

'' किती बाळंतपणं झाली?''

'' सहा. ह्या चार मुली जगल्या. '' मध्येच मराठे म्हणाला.

मग गायत्रीनं त्या मुलीना बाहेर धाडलं आणि विचारलं, ''ऑपरेशन केलं की नाही?''

''कसलं?''

''कुटुंबनियोजनाचं?''

''नाही हो... अजून मुलगा नाही ना!''

''अस्सं, अस्सं'' स्त्री-पुरुष समानता, कुटुंबनियोजन वगैरे बाकींबद्दल त्याच्याशी हुज्जत घालण्याचा तिला अजिबात उत्साह नव्हता.''

तेवढ्यात मराठेच्या बायकोनं जुने रिपोर्टस् दाखवीत म्हटलं,''तुम्हीच सांगा यांना. मला आता मूल नको.''

तिला दुजोरा देत गायत्रीनं आणखी काही सूचना दिल्या आणि पर्समधल्या चिटपॅडवर प्रिस्क्रिप्शन लिहून मी उठली.

ती उठताच पुन्हा एकदा मराठे घुटमळला. म्हणाला,'' त्याचं काय आहे, तुमच्या लेटरहेडवर म्हणजे काय... तुम्ही अमेरिकेला असताना आम्ही तुमचे शेजारी... म्हणजे... तसं नव्हे... जबाबदारी नाही म्हणत मी... गोविंदा, तुमचे आई-वडील म्हणजे आमचीच माणसं! काही हवं नको लागलं तर कर्तव्य म्हणून आम्हीच बघणार...''

मराठेच्या बोलण्यात ती आणखीनच बुचकळ्यात पडली. "काय ते नीट सांगा ना, मराठे?"

"नाही, तुमच्या लेटरहेडवर बिल द्या ना पाच एकशे रुपयांचं"

एरवी कुणाच्याही लक्षात आलं असतं की मराठे साधा सौदा करतोय. पण अमेरिकेत बरीच वर्षं राहिल्यामुळे मराठेचं आडवळणाचं बोलणं तिच्या लक्षात आलं नाही. तिनं चमकून विचारलं, " बिल कसलं? मी तर फी घेतली नाही?"...

" ते खरं हो. पण कंपनी देते ना! असं करावंच लागतं, डॉक्टर. आमचे शोषणकर्ते भांडवलदार मालक एरवी कुठे आम्हाला काय मिळू देतील?" आमचं इन्कम लिमिटेड! आपणच नको का एकमेकांना मदत करायला?"

आत्ता तिच्या डोक्यात सारा प्रकार आला. मनातून किळस आली एकूण प्रकाराची. पण या 'शेजारधर्मा'ला जागलं तर तिच्या घरच्यांना अल्पशी मदत तरी होऊ शकली असती कदाचित. मुकाट्यानं तिनं पर्समधून लेटर-हेड काढून हजार रुपयांचं बिल लिहून सही करून दिली.

हजाराचा आकडा बघताच नकळत मराठेनं आवंढा गिळला.

त्यानं तिचे खूप आभार मानले.

गोविंदाला घेऊन ती दिसेनाशी होताच मराठेचे डोळे चकाकले. बायकोपुढे ते बिल नाचवत तो खदाखदा हसला!

डोक्यावरची आठी त्याला दिसू न देता त्याची बायको मुलींना बोलवायला बाहेर गेली.

तिच्याकडे दुर्लक्ष करून त्यानं ब्रिस्टॉल पेटवली आणि शांतपणे आरामखुर्चीत पडला.

■

सकाळी उठून मराठेनं प्रातर्विधी उरकले. प्रात:स्मरण, प्रात:स्नान, प्रातर्विधी,प्रात:काल हे सगळे शब्द अजून जसेच्या तसे होते. पण पाचशे वर्षांपूर्वी याच भागातली प्रात:काल आणि प्रातर्विधी कसे असतील? प्रातर्विधीच्या रांगेत एक तास कुचंबणा होताना मराठेच्या मनात विचार आला होता! नाश्ता आटोपल्यावर तो बाहेर पडला.

गायत्रीकडून घेतलेलं बिल पास झाल्याच्या खुशीत मराठेनं आज



विल्सचं पाकीट विकत घेतलं. मग लगेच रस्ता क्रॉस करून आठ लिमिटेड बस पकडली. बसमध्ये बसल्या बसल्या त्याच्या मनात विचार आला, हे तर साले अमेरिकेत खोऱ्यानं पैसा ओढतात. आम्हाला इथे पै-पैसाठी जिवाचा आटापिटा करावा लागतो. बरी मिळाली बकरी. इथल्या डॉक्टरकडून घेतलं असतं तर बिलातले तीसचाळीस टक्के तरी त्याला काढून द्यावे लागले असते! परळच्या फ्लाय-ओव्हरवरून बस निघाली तशी त्याला क्षणभर भीती वाटली. या पुलावरून जाताना नेहमीच त्याच्या पोटात भीतीनं गोळा उठायचा! भायखळ्याच्या फ्लायओव्हरच्या विचारानं खड्डा पडायचा! इतक्या उंचावरून बस कोसळली किंवा पूल कोसळला तर काय होईल! ''काय साला भ्रष्टाचार सगळीकडे!'' स्वत:शी पुटपुटत तो भारतमाता सिनेमाच्या सिग्नलला उतरला.

आज युनियनच्या कार्यकारिणीची मीटिंग होती. अध्यक्ष आणि उपाध्यक्ष येणार नव्हते. सेक्रेटरीही येणार नव्हता. त्यामुळे जॉइंट सेक्रेटरीच्या नात्यानं त्यालाच सगळं बघावं लागणार होतं. मुख्य म्हणजे पार्टीची धोरणं, पार्टीची लाइन उगाळावी लागणार होती. खरं तर त्याला मीटिंगमध्ये इंटरेस्ट नव्हता. पार्टीच्या लाइनमध्येही स्वारस्य नव्हतं. कारण स्वास्थ्य वाटण्यासाठी आवश्यक तो अभ्यास नव्हता. उत्साहही नव्हता. पण ही सगळी 'अंदर की बात' होती. बाहेरून तसं दाखवून चालणारं नव्हतं! जॉइंट सेक्रेटरीशिपची पोझिशन टिकवणं महत्त्वाचं होतं. नाही म्हटलं तरी ती उपयुक्त होती. या पोझिशनमुळे चार लोकांत मान होता. वजन होतं.

भारतमाता पान-विडी स्टॉलसमोरील काथ्याच्या दोराच्या जळत्या टोकानं मराठेनं सिगरेट पेटवली. मग सावधपणे लोअर परळकडे जाणारा रस्ता पार करून बाजूच्याच पेपरवाल्याकडून त्यानं संध्यावार्ता विकत घेतला. सकाळी 'दैनिक नवयुग' मध्ये रोजच्या शिरस्त्याप्रमाणे त्यानं स्वत:चं भविष्य पाहिलं होतंच. संध्यावार्तामध्येही त्यानं स्वत:चं भविष्य बघितलं. मग स्थानिक घडामोडींच्या मथळ्यावर नजर टाकत, पडवळ बिल्डिंगच्या तळमजल्यावरील गजानन टी स्टॉलमध्ये चहाची ऑर्डर देऊन, तो जिना चढू लागला. युनियन ऑफिस त्याच बिल्डिंगच्या पहिल्या मजल्यावर होतं. जिन्याची ती करकर, पानाच्या पिकांनी भरलेले ते कोपरे, लडबड हलणारा जिन्याचा तो लाकडी कठडा, कोळिष्टकांसकट छतातून लोंबणारी ती इलेक्ट्रिक वायर्सची भेंडोळी, सारं काही त्याच्या सवयीचं होतं. जिव्हाळ्याचं होतं. तिऱ्हाईताला अस्वस्थ वाटेल, गुदमरायला होईल अशा त्या अंधाऱ्या,कळकट वातावरणात मराठेला मात्र माहेरवाशिणीप्रमाणे सुरक्षित वाटे.

जिन्यातून मराठे चढत होता तेव्हाच समोरून झाडलोट करणारा तातोबा जिना उतरत होता. तातोबानं त्याचं नेहमीचं पेटंट हास्य केलं. साच्यातून पडावं तसं ते हास्य होतं. कधीही न बदलणारं! त्या हास्याला काय म्हणावं असा प्रश्न मराठेला नेहमी पडे. दिलखुलास? करुण? प्रसन्न? केविलवाणं? कुत्सित? तातोबाचं हास्य त्याला नेहमीच कोड्यात टाकत असे. त्याला वाटे हे मेलेलं हास्य एक अगम्य गूढ आहे. गेली दशकानुदशकं

झाडलोट करणाऱ्या तातोबाचा जन्म,वय,उदरनिर्वाह, करमणूक,त्याच्या मनुष्यसुलभ भावना सारं काही अनाकलनीय असं रहस्य होतं. तातोबा म्हणजे त्या अंधाऱ्या वातावरणात सामावलेली अंधारी गुहा होती! त्याचा आगापिछा कुणालाच माहीत नव्हता. तो सर्वांना ओळखे, एवढीच काय ती त्याची ओळख!

तातोबाचा विचार झटकून मराठे युनियन ऑफिसमध्ये शिरला तेव्हा त्याच्या आधी तिथे जमलेल्यांनी मोठ्या कष्टाने वेगवेगळ्या हालचाली केल्या! त्याला उशीर झाल्याबद्दल नाराजी व्यक्त करण्याची ही तऱ्हा मराठेला तशी नवीन नव्हती. मुद्दाम काहींनी घड्याळ बघितलं, तर कुणी त्याच्याकडे हेतूपूर्वक दुर्लक्ष करून पेपरात डोकं घातलं! कुणी त्याच्याकडे पाहून आळोखे-पिळोखे दिले. कुणी मुद्दाम खाकरले,तर कुणी मोठा आवाज काढून जांभई दिली. पण असले प्रकार अंगवळणी पडल्यामुळे मराठेला काही वाटलं नाही.

आरामात त्यानं रजिस्टर घेऊन तिथे ठाण मांडलं आणि,''चला तर! मीटिंगला सुरुवात करूया,''म्हणून सरळ अजेंडा वाचायला सुरुवात केली.

ते पाहताच नाइलाजानं सारेजण सावरून बसले.

अजेंडातले विषय एकामागून एक गडूप्रमाणे गडगडत गेले. शेवटी त्यानं अजेंडातला महत्त्वाचा विषय वाचून दाखवला.

''सोमनिलयममधील कष्टकरी मुक्ती मोर्चाच्या संबंधात पक्षाची भूमिका मांडणे व त्यासंबंधी युनियनच्या कार्यकारिणीत ठराव पास करणे.''

ते ऐकताच सभासदांमध्ये हलक्या आवाजात कुजबूज सुरू झाली. काहींनी त्या संघटनेचं नाव प्रथमच ऐकलं होतं. तेवढ्यात राऊत आणि लोखंडे एकमेकांकडे पाहत म्हणाले, ''प्रथम पक्षाची अधिकृत भूमिका तरी सांगा म्हणजे त्या अनुरोधानं ठराव तयार करून चर्चेला घेता यईल. शिवाय ठरावावर मतदान घेणंही सोपं होईल.''

''बरोबर आहे. अधिकृत भूमिका मांडा.'' आणखी दोघा-तिघांनी लोखंडे-राऊतच्या सुरात सूर मिसळला. त्यांना वाटत होतं की एकदा ठराव तयार झाला की डोकेदुखी नाही. मतदान करायचं आणि निघून जायचं.

पण मराठेनं म्हटलं, पक्षाची भूमिका स्पष्ट आहे. देशाची एकात्मता,

अखंडता, कायदा व सुव्यवस्था धोक्यात आहेत. त्यांना अधिक धोका उत्पन्न करणाऱ्या व त्यामुळे धर्मनिरपेक्ष, उदारमतवादी, लोकशाहीवादी पुरोगामी शक्तींचं नुकसान करणाऱ्या कोणत्याही साहसवादी कृत्याचा आम्ही निषेध करतो. अशा कृत्यांमुळे नवस्वतंत्र लोकशाहीवादी राष्ट्रांचं अस्तित्वच धोक्यात येतं आणि त्यामुळेच साम्राज्यवाद्यांचा त्यांना छुपा पाठिंबा असतो. कधी पुराणमतवादी धर्मवेड्यांच्या रूपातल्या तर कधी तथाकथित सशस्त्र वर्गसंघर्षाच्या रूपातल्या अशा दहशतवादी कृत्यांना पाठिंबा देऊन नवस्वतंत्र देशांना दुबळे बनवणं आणि स्वत:वर अवलंबून ठेवणं हे साम्राज्यवादी राष्ट्रांचं धोरण आहेच मुळात. वंशविद्वेषी, हुकुमशाही, अतिरेकी, धर्मवेडे आणि विविध गुन्हेगार यांची भली मोठी साखळीच आहे ही! साम्राज्यवाद्यांनी पोसलेल्या अतिरेक्यांमुळेच धार्मिक दंगे पेटून धर्म बदनाम होतात. आणि त्यांच्यामुळे डावे पक्षही बदनाम होतात! आमच्या मते अशा कृत्याला जबर शासन व्हायला हवं.''

स्वत:चं बोलून होताच मराठेला स्वत:चं अत्यंत आश्चर्य वाटलं! गेल्या कित्येक दिवसात काहीही वाचन नसताना आपण एवढे सुसंबद्ध आणि तर्कशुद्ध कसे बोललो त्याला कळलं नाही! त्यानं पुढं म्हटलं, ''सत्तालोलुप व अर्थलोलुप साम्राज्यशाही ही सर्वात विकृत आणि राक्षसी ताकद आहे आणि नवस्वतंत्र देशांना दुबळे करून मिंधे बनवून स्वत:चा सर्वतोपरी फायदा करून घेणं हेच तिचे उद्दिष्ट आहे. सर्वत्र संघर्ष पेटवून शस्त्रास्त्रे विकत राहणं, कर्ज देणं हेच जगभरातले बहुद्देशीय कंपनीवाले, बडे भांडवलदार व मक्तेदार करतात. म्हणून अतिरेकी कृत्याचा आणि अतिरेकी संघटनांचा निषेधच नव्हे तर निर्दालन व्हायला हवं.

मराठेची रेकॉर्ड सुलभाला एकसुरी वाटली. ती रेकॉर्ड ऐकताच तिला राग आला. राष्ट्र म्हणजे काय? राष्ट्राची घटना काय सांगते? कशाकरिता असते? कायद्याचा हेतू काय? कायदा व सुव्यवस्था म्हणजे काय? शोषण करणाऱ्या मूठभर धनाढ्यांना दारिद्र्याच्या आगीत होरपळणाऱ्या लाखोंनी आव्हान दिलं, तर ते कायद्यात बसत नाही या कारणासाठी ठेचून काढणं हा न्याय आहे का? असह्य झाल्यामुळे अन्यायाचा प्रतिकार करण्यात आक्रस्ताळेपणा घडला तर लगेच तो राष्ट्रद्रोह होतो का? याचा अर्थ अन्याय गुपचूप सोसणं आणि इतरांना सोसायला लावणं हीच काय ती फक्त राष्ट्रनिष्ठा

झाली? राजकीय, आर्थिक, सामाजिक अशा सर्वतोपरीनं आपल्या लोकांवर अत्याचार व अन्याय करणं आणि तो चालू देणं म्हणजे देशभक्ती काय? पार्टीची ही भूमिका म्हणजे शोषणकर्त्यांना पर्वणीच नाही का ठरत? ह्याचमुळे कामगारांमध्ये आपली संघटना अप्रिय होत चालली आहे की काय? सुलभाच्या मनात विचारांचं काहूर उठलं.

तिनं एकदम विचारलं, ''हे पाहा मराठे, अन्यायाचा प्रतिकार हा राष्ट्रद्रोह कसा ठरतो? मग आपली सारी आंदोलनंदेखील राष्ट्रद्रोही नाही का ठरत?''

तिच्या प्रश्नांनं मराठे एकदम गडबडला. तिचा प्रश्न मूलभूत स्वरूपाचा होता. सध्या पक्षाची जी वैचारिक आणि धोरणात्मक कोंडी झाली होती ती भल्याभल्यांना हतबल करीत होती. एका बाजूला राष्ट्रविकासाला व राष्ट्रहिताला महत्त्व द्यावं तर लागत होतं. पण या भूमिकेचा दुसऱ्या बाजूला भांडवलदारी शोषणकर्ता अतोनात फायदा उठवत होते! राष्ट्रविकासापेक्षा न्याय महत्त्वाचा असं म्हटलंच तर लगेच राज्यकर्ते लोक पक्षाच्या धोरणाला राष्ट्रद्रोही म्हणून बदनाम करीत होते. थोडा विचार करून मराठेनं म्हटलं,''हे पाहा मिस् चित्रे, तुमचा गोंधळ होतोय. आपली आंदोलनं वेगळी आणि दहशतवादी कृत्यं वेगळी. त्यांच्यात तुलना होऊ शकत नाही!''

''मराठे, अन्यायात होरपळणारे नाइलाजानं दहशतीचा मार्ग चोखाळतात,... त्यांनी का हसत-खेळत कायम आपल्याला पाठिंबा द्यायचा? काहीही उपयोग होत नसतानादेखील?'' तिच्या प्रश्नात आता उपहास होता.

'' हे पाहा मिस् चित्रे, मी तुमच्या भावना समजतो. पण दहशतवादाचा बीमोड व्हायलाच हवा.''

''किती बेजबाबदारपणे बोलता हो तुम्ही?'' सुलभा आता रागानं लाल झाली होती.

ती जुगलबंदी ऐकणारे बाकीचे बहुतेक सुस्तावले होते. काहीजण तर परस्परांत इतर गप्पा मारीत होते. मधूनच फिसकन् हसत होते.

तिच्या बोलण्याचा मराठेलाही आता राग आला. खरं म्हणजे कधी नव्हे ते पक्षाची भूमिका त्यानं नीट मांडली होती... आणि त्याच्या मते ती योग्यही होती. तोही रागानं ओरडला, ''ह्यात कसला आलाय बेजबाबदारपणा? उलट तुम्हीच जीभ सैल सोडून मर्यादेचा भंग करता आहात!''

ते ऐकून सुलभाचा तळतळाट झाला! चडफडाट झाला! संयम ठेवून तिनं थोड्या नरमाईच्या सुरात म्हटलं,'' अहो पण, अन्यायात होरपळणाऱ्या आदिवासींमध्ये आपल्या पक्षानं का काम करू नये? किमानपक्षी त्यांचे प्रश्न घेऊन आंदोलनं तरी करायला हवी की नको? की त्यांना राष्ट्रद्रोही म्हणून ठेचायला सरकारला मुभा दिली, पाठिंबा दिला की पार्टीचं काम झालं?''

मराठेला आता सुलभा चित्रेच्या बोलण्याचा अगदी कंटाळा आला होता. त्याला माहीत होतं की तिच्या म्हणण्यात तथ्य होतं पण पक्षाकडे तेवढे कार्यकर्ते नव्हते. ताकद नव्हती. तिचा आवाज खाली आलेला पाहून त्यानंही तिला समजावण्याच्या सुरात म्हटलं,'' मिस् चित्रे, तुमचं बरोबर आहे. पण खेडोपाडी संघटना बांधण्याचं काम तुमच्यासारख्या तरुण कार्यकर्त्यांचं आहे. पार्टीची भिस्त आता तुमच्यावरच आहे! पण तोपर्यंत तरी या हिंसेचा निषेध करणं आपल्याला भाग आहे.''

मराठेच्या ह्या बोलण्यावर काही बोलणं सुलभाला शक्यच नव्हतं. ती निरुत्तर झाली! तिच्या लक्षात आलं की, आपल्या पक्षाचं धोरण नव्हे तर आचरण कुठे तरी चुकतंय. मराठेचं शेवटचं वाक्य नाकारणं तिला शक्यच नव्हतं. तिला जाणवलं की, तिच्यासारख्या तरुणांनी खेडोपाडी चाललेल्या चळवळीत स्वारस्य दाखवण्याची आणि त्यांना योग्य दिशा देण्याची गरज आहे.

तेवढ्यात गिरणीचा भोंगा वाजू लागला. काहीच ऐकू येत नसल्यामुळे सुलभासकट सर्वांना गप्प राहणं भाग होतं.

भोंगा संपताच मराठेनं गडबडीनं ठराव सांगितला.'' दहशतवादी कृत्य करणाऱ्यांना सरकारने योग्य ते शासन करावे. युनियन सदर कृत्याचा निषेध करते.''

सुलभानं तिच्याशी सहमत असणाऱ्या दोघा-तिघांशी बोलून स्वत:ची मतं लिहून दिली. आणि ठरावाला प्रोव्हिजनल मान्यता दिली. मनातल्या मनात तिला जाणवलं की ह्या निषेधाचा परिणाम शून्य आहे. त्याचवेळी तिच्या असंही मनात आलं की आपणच त्या कष्टकरी मुक्ती मोर्चाशी संपर्क साधावा! के.के.नायडूशीही याबद्दल पत्रव्यवहार करायचं तिनं ठरवून टाकलं.

त्याचवेळी खालच्या गजानन रेस्टॉरंटमधला छोटा शंकर चहाची

किटली घेऊन वर आला तेव्हा त्याची नजर भिरभिरत भिंतीवरच्या फोटोंकडे गेली. आठ-दहा वर्षाचा अशक्त शंकर जेव्हा जेव्हा चहा पोचवायला वर येई तेव्हा तेव्हा त्याची नजर त्या फोटोंकडे जात असे. फोटोतले ते दाढीवाले आपल्याकडेच बघताहेत असं त्याला वाटत असे. आजही तसंच झालं. पण हसत-खिदळत बसलेल्या युनियनवाल्यांना चहा दिला नाही तर ते ओरडतील, म्हणून त्यानं चहाचा एकेक ग्लास भरायला पटकन सुरुवात केली. बाकी कुणाचं शंकराकडे लक्ष नव्हतं. पण बारकाईनं शंकरच्या हालचाली बघणाऱ्या सुलभाला मात्र चटका लागली. विचार,धोरणं,कृती आणि हे वास्तव यातल्या विरोधाभासानं ती बेचैन झाली.

युनियनची मीटिंग संपली. जो तो आपापल्या घरी गेला. हळूहळू रात्र झाली. गजानन टी स्टॉलच्या शंकरनं वडा-पाव खाल्ला. पाणी पिऊन तो भारतमाता सिनेमापाशी आला. नट्यांची चित्र पाहताना हरखून गेला, मग थोड्या वेळानं ती चित्रं मनात साठवत जिन्याखालच्या त्या बाकावर येऊन झोपला. डास आणि ढेकूण यांच्या साथीनं निद्रादेवीच्या आधीन झाला. ■

यावेळी चार्लस्टनमध्ये सकाळचे अकरा वाजले वाजून गेले होते. सकाळपासून कामाला लागलेल्या के.के नायडूच्या डोक्यात माशांचा बाजारभाव,आज आणलेल्या स्ट्रॉबेरीची क्वॉलिटी, काही सिनेटर्सनी आयोजित केलेली टॉप ब्रॅट्सची जंगी पार्टी अशा बाबी होत्या. झपाझप हाताखालच्या लोकांना सूचना देण्यात तो मग्न होता.

सारी व्यवस्था झाल्यानंतर के.के. त्याच्या ऑफिसमध्ये येऊन बसला. दोन मिनिटं बसतो आणि कपाळावरचा घाम पुसतो न पुसतो एवढ्यात टेबलावरचा फोन घणघणला. अनिच्छेनं के.के. नं रिसिव्हर उचलला.

"हॅलो, के.के. नायडू हीअर"

"हॅलो ! मि. के.के. नायडू ! धीस इज डॉ. गायत्री माथूर!"

गायत्रीचा आवाज उत्तेजित होता. "हॅलो, हाऊ आर यू? वडील कसे आहेत, ट्रिप कशी झाली?" त्यानं थोड्या कष्टानंच विचारलं. नकळत त्याचा स्वर कोरडा झाला. बोलणं तुटक झालं.

"मि.नायडू! सारं ठीक आहे. वडील बरे आहेत, ट्रीप पण चांगली झाली. थोडी धावपळ झाली एवढंच... पण मि. नायडू मुद्दाम फोन केला,

तो तुमच्या घरची खुशाली कळवायला. तुमच्या पत्नीशी बोलणं झालं फोनवर."

कामिनीच्या उल्लेखानं के.के. चा सूर एकदम बदलला. आस्थेनं त्यानं विचारलं," पण डॉ. माथूर एवढ्या गडबडीत होता ना तुम्ही... मग एवढी का तसदी घेतलीत वेळात वेळ काढून मुद्दाम फोन करण्याची?"

"मि. नायडू, आवड असली की सवड मिळते!" मग गायत्रीनं सोमनिलयममध्ये घडलेली त्या, कामिनीशी झालेलं बोलणं एवढंच नव्हे तर सुलभा चित्रेशी झालेलं संभाषण ही त्याला सांगितलं.

तिचं बोलणं ऐकता ऐकता के.के. च्या डोळ्यांसमोर सारी चित्रं उभी राहत होती.

सोमनिलयमचा राजवाडा, रघुरामाचं छोटं घर, हनुमंता, कष्टकरी मुक्ती मोर्चातले तरुण, त्यांच्या चर्चा, त्यांचे विचार, आदिवासींच्या झोपड्या,जंगलखात्याची वागणूक, त्यांच्याबद्दलचा असंतोष, तातांचा दिनक्रम, कामिनीची घालमेल, मधूच्या बाललीला, नुकत्याच झालेल्या हत्येचा आणि हनुमंताचा संबंध, पोलिसांचं दमनसत्र, इकडे मुंबईतील गायत्रीचं घर,तिचा परिवार,अपंग गोविंदा, सुलभा चित्रेची धडपड सारी कल्पनाचित्रं... नकळत तो त्या विश्वात हरवला.

फोनवरून ' हॅलो हॅलो' ऐकू येताच तो भानावर आला. घाईघाईनं त्यानं गायत्रीला प्रथम तिच्या भावाबद्दल-गोविंदाबद्दल विचारून घेतलं. बाकी कितीही घाईची कामं असली तरी गोविंदाबद्दल त्याला खास आस्था होती, मग ओ.के. म्हणून गायत्रीनं फोन ठेवून दिला तसा त्यानंही फोन ठेवला.

नेहमीच्या वेळी म्हणजे रात्री अकराच्या सुमारास सारी कामं संपवून जेव्हा घरी परतला तेव्हादेखील के.के. च्या डोक्यात गायत्रीच्याच फोनचा विचार चालला होता. गायत्री म्हणाली होती, "भारताची एवढी ओढ वाटते पण तिथे गेलं की मात्र जीव नकोसा होतो. आपल्या माणसांच्या भेटीचा आनंद तिथल्या सडलेल्या जीवनाच्या गदारोळात पार झाकोळून जातो. मग वाटू लागतं की वुई आर बेटर हीअर अँड हेन्स वुई बेटर बी हीअर फॉर एव्हर!" त्यानं गायत्रीचा विचार बाजूला सारताच सोमनिलयमचा विचार उसळून आला. साऱ्या परिस्थितीचा विचार करता करता त्याला त्याचे कॉलेजचे दिवस आठवले.

तो कॉलेजला असताना कल्चरल ॲक्टिव्हिटीज पुष्कळ चालत. विद्यार्थांनी वेगवेगळे क्लब्ज स्थापन केले होते. गिर्यारोहण, चित्रकला, साहित्य, वक्तृत्व कला, काव्य, छायाचित्रण, संगीत एक ना दोन. पण या घडीला त्याला प्रकर्षानं आठवण झाली ती ह्या सगळ्यांपेक्षा वेगळ्या अशा विद्यार्थ्यांच्या एका गटाची! हे विद्यार्थी स्वत:च्या ग्रुपला पी.एस. एफ म्हणजेच 'प्रोग्रेसिव्ह स्टुडंट्स् फ्रंट' म्हणवून घेत. रोज संध्याकाळी एकत्र जमून ते राजकारणावर चर्चा करीत. त्यांच्या खोल्यातून मार्क्स, लेनिन, कॅस्ट्रो, गुव्हेरा,माओ वगैरेंचे फोटो असत आणि मार्क्सप्रमाणेच कांट,हेगेल, ब्रेश्ट,नेरुदा, कॉडवेल इत्यादींची पुस्तकंही असत. तो स्वत:ही त्या ग्रुपमध्ये काही काळ सहभागी झाला होता. चिली, क्युबा, निकारागुवा, व्हिएटनाम, कंबोडिया,चीन, रशिया वगैरे देशातल्या घडामोडी, देशोदेशींच्या डाव्या चळवळी वगैरेंबद्दल ते ज्या चर्चा करीत त्यांमध्ये त्यानंही पुष्कळदा भाग घेतला होता. त्यांच्या सहवासातच डाव्या विचारसरणीची पुस्तकंही वाचली होती.पण हळूहळू त्याला जाणवू लागलं होतं की त्यांची माहिती व वाचन दांडगं असलं तरी त्यांच्यावर प्रचाराचा पगडा होता. वेद, उपनिषदं, गीता, ब्रह्मसूत्रे, रामायण, महाभारत, भागवत, योगसूत्रं, वगैरेंकडे दुर्लक्ष करून सारा भर ते हेगेल,कांट,सार्त्र,मार्क्स, पिकॅसो, ब्रेश्ट इत्यादींवरच देत. तेच त्यांना जवळचे वाटत. त्यांचाच वारसा त्यांना आपला वाटे. त्यातले काहीजण तर रामकृष्ण परमहंसांना मनोरुग्ण म्हणत. काहीजण स्मृतिग्रंथ, यज्ञसंस्था व अथर्ववेदातील उल्लेख दाखवून भारतातील सर्व काही अमानुष व रानटी असल्याचा दावा करीत. साधुसंतांना देखील ते ढोंगी किंवा प्रस्थापितांचे, राज्यकर्त्यांचे हस्तक ठरवीत. स्थितीवादी ठरवीत. थोडक्यात भारतातलं सर्व काही हीन ठरवीत.

के. के. ला याक्षणी जाणवलं की कष्टकरी मुक्ती मोर्चामध्ये साधारणत: अशा प्रकारच्या विचारांचाच प्रभाव असणार. हनुमंता तर नक्कीच अशा विचारधारांनी भारला गेला असणार. सर्वंकष वेदान्ती दृष्टी, पसायदानाची विश्ववंद्य आणि अचूक कल्पना यांना डावलून मार्क्सची पूजा करणं म्हणजे मार्क्सच्या अंत:प्रेरणा लाथाडून त्याचे पुतळे पुजण्यासारखं आहे असं त्याला वाटलं. अन्यायाचा प्रतिकार अन्यायग्रस्तांनी संघटित होऊन करणं हे सयुक्तिक असल्याने त्यांनी तो तसा एकत्र येऊन करायला हवा हे मार्क्सचं

सूत्र प्रत्यक्षात आणण्यासाठी विशाल दृष्टीचं अधिष्ठानं अन् तज्जन्य सामर्थ्य यांची नितांत आवश्यकता आहे याबद्दल त्याची खात्री झाली होती. हनुमंतासारखे तरुण आजही आर्थिक, सामाजिक, धार्मिक वर्गवारी करून समता आणण्याचा विपरीत प्रयत्न करताहेत हे त्याला झोंबलं. विशिष्ट, वैचारिक, आर्थिक किंवा राजकीय ढाच्याला मर्यादा असते. ती लक्षात घेतल्याशिवाय खरी सदसद्विवेकशाही आणि उदात्त व समृद्ध परिस्थिती प्रत्यक्षात येऊ शकणार नाही याबद्दल त्याची खात्री पटल्यामुळे कष्टकरी मुक्ती मोर्चाबद्दल आणि विशेषत: हनुमंताबद्दल त्याला काळजी वाटू लागली. पण एवढ्या दूरवरून तो काहीच करू शकत नव्हता.त्याला स्वत:ची कीव आली. त्याचवेळी त्याला पी. एस.एफ. गटाच्या सदस्यांचा तो टोमणा आठवला; धनाढ्य माणूस सहृदय असला तरी गरिबीचे चटके न भोगल्यामुळे कष्टकऱ्यांच्या बाजूनं संघर्षात झोकून द्यायला सहजासहजी धजावत नाही!, नकळत त्याचं मन अपराधीपणाच्या भावनेनं खचलं अन् नकळत आत्मपरीक्षणात गुंतलं. वाटलं, कालची तरुण पोरं लढताहेत पण आपण मात्र विचारांच्या आवर्तात फिरतोय. फिरता फिरता माणुसकी हरवत चाललोय! तो अस्वस्थ झाला. पण पुन्हा विचारांची चाकं उलट्या दिशेनं फिरली तसं त्याला जाणवलं, हनुमंता व तत्सम तरुणांचा झगडा ही प्रतिक्षिप्त क्रिया आहे अन्यायाविरुद्धची. आपलं हे अधांतरी जिणं, हे त्रिशंकूसारखं जिणं म्हणजे प्रत्यक्षात व्यापक समाजहिताची... समेष्टियोगाच्या सिद्धीची पूर्वतयारी आहे. पण हा विचारही समाधान देईना. अस्वस्थ मनात पुन्हा विचार आला की सर्वत्र संघर्षाचे वारे वाहत असताना आणि निष्पाप तरुण अविचारानं आत्मनाश किंवा दारुण वैफल्याच्या आहारी जाण्याची शक्यता असताना ह्या निर्वाणीच्या वेळी आपण मात्र काहीच कसं करीत नाही?

के.के. विचारांच्या अशा महत्त्वाच्या टप्प्यावर आला असता दारावरची बेल वाजली. तो तसाच उठून बाहेर आला आणि दार उघडलं. पाहतो तर डॉ. टेलर उभे! त्यांना अशा अवेळी पाहून के.के. ला आश्चर्य वाटलं. थोडा वैतागही आला. एवढ्या रात्री अगोदर काहीही न कळवता हे इथं कसे? काही अघटित तर घडलं नाही?

"आय ॲम सॉरी टु डिस्टर्ब टू... अशा अवेळी यावं लागलं. माफ करा, पण"

" असू दे....आत या."

डॉ. टेलर आत येऊन कोचावर बसले.

एक दोन मिनिटं परस्परांची चौकशी आणि इकडचं तिकडचं बोलणं झाल्यावर डॉ. टेलर म्हणाले, "के.के. आपण त्या दिवशी रेव्ह. बेटझ्च्या घरी जी चर्चा केली, तिचं फलित माहीत आहे?"

के.के.ला कळेना की त्या चर्चेतून काय अघटित घडलंय. कोणतं संकट डॉ. टेलरवर ओढवलंय. आधीच विचारांनी भंडावून गेल्यामुळे त्यानं त्रयस्थपणे विचारलं, "काय झालं?"

"अरे, माझी सुस्ती गेली. कंटाळा गेला. एकाकीपणा पळाला!"

के.के.ला ते गुलदस्त्यातलं बोलणं ऐकण्यात रस नव्हता, त्यांनी घेतलेला त्याचा प्रत्येक क्षण या क्षणी त्याला अधिकाधिक अस्वस्थ करत होता. त्याच्या मनात आलं, एकदम ओरडून त्यांना काय ते तात्काळ बोलायला भाग पाडाव आणि लगेच हाकलून काढावं.

के.के. च्या चेहऱ्याकडे पाहून डॉ.टेलर मोठ्यानं हसले! म्हणाले, "हे सारे तुझे उपकार! वीस वर्षांनी तरुण झालोय मी!"

"अच्छा, हे सांगायला आलात?" त्याच्या बोलण्यात आता प्रकट नाराजी होती. कपाळावर आठ्या होत्या.

"नो, नो" आत्ता डॉ. टेलर स्वत:च्या विश्वातून बाहेर आले. के.के. च्या चेहऱ्यावरील तणाव जाणवून एकदम म्हणाले, "तुमचा गीतेचा स्वधर्म आचरणाचा व्यापक दृष्टीचा वारसा विज्ञानाच्या विविध क्षेत्रातील मित्रांशी बोलल्यावर विश्वकल्याणाच्या व सुरक्षिततेच्या संदर्भात वैज्ञानिकांचा दृष्टिकोन व सहभाग निश्चित झाला. आमचं ठरलं की एक अण्वस्त्रविरोधी मेळावा घ्यायचा व त्यासाठी तुम्हाला पाचारण करायचं. वेळ थोडा होता. म्हणून अवेळी यावं लागलं." " आता त्यांच्या शब्दात खरी दिलगिरी आणि आर्जव होतं.

क्षणात के.के. ची चर्या बदलली. "डॉ. टेलर! यू आर व्हेरी फास्ट! हॅट्स् ऑफ टु यू! तुम्ही एवढ्या झपाट्यानं कामाला लागलात. पण मी मात्र अजून अडखळतोय, धडपडतोय!"

आदरानं डॉ. टेलर म्हणाले, "के.के. चढण जेवढी अवघड तेवढी ती पार करायला अधिक वेळ लागणारच! तुम्ही विश्वाचंच कोड सोडवायला

बसलाहात...''

"डॉ. टेलर हा तुमचा समंजसपणा झाला. माझ्या निष्क्रियतेला समजावून घेण्यात तुमचा मोठेपणा आहे. माझ्या निष्क्रियतेचा नाही!''

के.के. विचाराच्या तंद्रीत तसाच उठला.

डॉ. टेलर, त्याच्या मनाची अवस्था जाणूनच की काय काहीच बोलले नाहीत.

एक-दोन फेऱ्या मारून त्यानं चेहरा धुतला. त्याला जाणवलं की कष्टकरी मुक्ती मोर्चासारखे गट आणि डावी विचारसरणी मानणारे पक्ष यांचा मोठा गुण म्हणजे, व्यापक कल्याणाचं, भौतिक समृद्धीचे दरवाजे सर्वांना खुले करण्याचं ध्येय व कृती हा होता. डाव्या विचारसरणीची शक्ती पीडितांना ह्या ध्येयासाठी संघटित करण्यात होती. पण डाव्या विचारसरणी आणि कृतीचा कच्चा दुवा आत्मानुभूतीच्या प्रभावात होता! त्यामुळे विविध प्रकारची वैचारिक, आर्थिक व राजकीय मॉडेल्स अभ्यासण्यात त्यांची शक्ती वाया जात असून आशयघन व परिणामकारक आंदोलनामध्ये डावी चळवळ कमी पडत होती. मार्क्सवादाचा तपशील मुळात विश्वकल्याणासाठी आहे. पण तपशील हे साधन आहे. ते चिरंतन सत्य नव्हे, हे विसरून गेल्यामुळे जगत्वंद्य साधु,संत, ऋषी यांची मूल्येच डाव्या लोकांनी डोळ्यांआड केली आहेत व ही चूक सुधारणं अगत्याचं आहे. आत्मज्ञानानं आंदोलनांना पराजाणिवेचं सामर्थ्य आणि विश्वव्यापी परिमाण मिळतं. मार्क्सवादच नव्हे तर सर्व धर्म आणि विचार विश्वकल्याणाच्या साध्यतेसाठी डोळसपणे वापरायच्या तरफा आहेत आणि आत्मज्ञान ही अशा तरफा सुयोग्यपणे वापरण्याची प्रेरणा व शक्ती आहे. त्याला जाणवलं की, गेली वर्षानुवर्षं स्वत:शी प्रामाणिक राहण्याच्या प्रयत्नात यशापयशात, सुख-दु:खांत, विरह-मीलनात त्याला अस्वस्थता वाटण्याचं कारण आत्मानुभूती, तज्जन्य विचार व तज्जन्य कृती यातील त्रुटी व तफावत हेच होतं!

"आय ॲम क्लोझ टु इट... डॉ. टेलर!'' अचानक के.के. म्हणाला.

"काय झालं?'' डॉ. टेलरांनी विचारलं,

"गणितं चुकतात. नेम चुकतो. अंदाज चुकतात. प्रचीतीही हुलकावण्या देते! डॉ. टेलर आयुष्यभर ठेचकाळतोय मी. पण ना अंतर्यामी समाधान, ना बाहेर कुणाला काही फायदा! बट आय ॲम क्लोझ टु इट!''

डॉ. टेलरना त्याची अस्वस्थता जाणवली. ते सौम्यपणे म्हणाले, ''पण के.के मला वाटतं तुमच्या हृदयातला उदात्त दृष्टिकोन तुम्हाला नेहमीच क्षुद्र सुख-दु:खांच्या अतीत ठेवीत आलाय... शिवाय त्याचे परिणामही होत आले आहेत. फक्त तुम्हाला ते एकदम दिसत नाही एवढंच!''

के.के. काहीच बोलला नाही. अचानक त्याला बेड्या तुटून पडाव्या तसं झालं. जाणवलं की नकळत आपण किती स्वार्थी बनतो! वरपांगी पैशाचा स्वार्थ सुटला, शारीरिक भोगाचा स्वार्थ सुटला, मानमरातबाचा स्वार्थ सुटला, कौटुंबिक सुखाचा स्वार्थ सुटला तरी खोलवर त्यांचा विचार जिवंत असतो! पैशाचा स्वार्थ सुटला तरी त्याचा योग्य विनियोग व्हावा असं वाटतं. कौटुंबिक विरह स्वीकारला तरी खोलवर त्यांच्या सहवासाची ओढ असते, मानमरातब सोडला तरी सूक्ष्मपणे अपमानाबद्दल नाराजी असते... पण ह्या सर्वांपेक्षा जास्त म्हणजे जगासाठी आपण महान कार्य करणार असा भ्रामक अहंकार असतो! वास्तविक हे शरीर, ह्या भावना, ही बुद्धी, हे विचार यांचा एवढा बडिवार कशाला? या मर्यादित ''मी'' च्या अंतर्बाह्य असलेला सर्वव्यापी खरा 'मी'च महत्त्वाचा नाही का? भ्रामक अहंकारानेच अस्वस्थतेचे आणि वैफल्याचे तडाखे बसतात! आत्मज्ञानी आणि स्वरूपाकार व्यक्ती शांतपणे निर्भयपणे सहजपणे तिची भूमिका पार पाडत जाते! अचानक त्याला जाणवलं की तो ओंडक्यातून स्थित्यंतरित होऊन नदी बनला होता! इतस्तत: भरकटणाऱ्या धूलिकणातून परिवर्तित होऊन आकाश बनला होता! त्याला तत्क्षणी जाणवलं की त्या अवस्थेला शब्दातीत का म्हणतात!

बराच वेळ त्याच्या प्रसन्न चेहऱ्याकडे पाहत बसलेल्या डॉ. टेलरकडे लक्ष जाताच त्यानं उठून म्हटलं,'' चला आपण कॉफी घेऊ.''

डॉ. टेलरना आश्चर्य वाटत होतं की काही क्षणांपूर्वी पिंजऱ्यातील भुकेल्या वाघाप्रमाणे अस्वस्थपणे फेऱ्या मारणारा के.के. एकदम एवढा शांत आणि प्रसन्न कसा झाला? कोड्यात पडलेला के.के. कोड्यासाठी कोडं बनला होता. असहाय के.के. याक्षणी हतबलतेला हतबल करीत होता. त्यांच्या मनात आलं, ''याच्या प्रश्नावर आपण उत्तर शोधण्यापूर्वी हा सारं काही समजून स्वस्थ झालाय!''

त्यांच्याबरोबर कॉफीचे घुटके घेत के.के. नं शास्त्रज्ञांच्या मेळाव्यात त्यांचा सर्व कार्यक्रम विचारून घेतला आणि त्यासाठी यायचं वचन दिलं.

बोलता बोलता पुन्हा के.के. ला जाणवलं की नवोदित पोहणारा हात-पाय मारत राहतो तसा माणूस जन्मभर भाबडी धडपड करतो अन् जगण्याच्या समाधानाला पारखा राहतो. ''इलेक्ट्रिसिटीचा बल्ब'' बनून जगणारे ''पॉवर हाऊस'' होण्यातली मजा चाखू शकत नाहीत! त्याक्षणी कुटुंब, समाज,देश-विदेश,भूतकाळ, वर्तमानकाळ, भविष्यकाळ,पाप-पुण्य, गुण-दोष,आशा-निराशा, आरंभ-शेवट... सारं सारं विरघळून गेलं.

के. के. ला जाणवलं की ही सच्चिदानंदमय अवस्था व्यक्ती अनुभवते. पण संपूर्ण जगाचं तर सोडाच एका व्यक्तीला स्वतःपुरतीदेखील अशी अवस्था प्राप्त करून घेऊ म्हणून घेता येत नाही. खरा त्याग व खरा स्वार्थ ज्या अवस्थेत असतो ती ही देहातीत अस्तित्वाच्या अमरत्वाच्या अनुभूतीची अवस्था! अंतर्बाह्य सारे व्यापणारी व म्हणून विश्वात्मक अस्तित्वाची प्रचीती देणारी अवस्था. हीच ब्रह्मानुभूती आणि हीच आत्मानुभूती. विश्वसंस्कृतीचा हाच खरा उगम आणि संस्कृतीच्या उन्नयनाचं हेच खरं पर्यवसान. साऱ्या वैयक्तिक इच्छांची गुलामी संपवणारी पण संपूर्ण आयुष्याचे सार्थक करणारी हीच अवस्था. हेच खरं ईश्वर दर्शन.

के.के.ला जाणवलं की ह्या अजरामर शब्दातीत, वर्णनातीत व स्थलकालातीत अस्तित्वालाच बह्म म्हणतात. व्यक्तीला त्याची अनुभूती मिळणं आणि प्रतिभा व दृष्टी प्राप्त होणं हे कधीही कुण्या देहाचं नव्हे तर त्या वैश्विक अस्तित्वाचंच कार्य असतं! म्हणूनच ही अवस्था अनुभवणारा लीन होतो! नम्र होतो! अहंकारशून्य होतो. अन् त्यावेळी क्षुद्रत्वातून येणारा अहंकार व लाचारी यांच्या अतीत जगतो! विश्वात्मक व स्थलकालातीत. अशा 'मी' ची अनुभूती घेत सुरक्षित आणि निर्भय बनतो. क्षुद्र स्वार्थाच्या अतीत जगत राहतो!

प्रतिक्षणी के. के. ला जाणवलं होतं की आत्मज्ञान हे किती महान सत्य आहे. त्याला डोळ्यापुढे भविष्यकाळाचं स्पष्ट चित्र दिसू लागलं. त्याच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. त्याला स्पष्टपणे जाणवलं की सच्चिदानंदांची लीलाच हे सारं विश्व सच्चिदानंदानं भरून टाकील आणि ज्ञानेश्वरांचं पसायदान प्रत्यक्षात येईल.

के.के. च्या डोळ्यांना अश्रूंच्या धारा लागलेल्या पाहून डॉ. टेलर सद्‌गतीत झाले. त्यांनी उठून के. के. च्या पाठीवर थोपटत विचारलं, ''काय

झालं के.के.?'' त्यांना त्याचे ते बदलते भावावेग अधिकाधिक गोंधळात टाकत होते.

''डॉ. टेलर! काही नाही! आनंदाचं भरतं आलं हो! जाणवलं की आत्मज्ञानाचा सूर्य सर्व क्षेत्रात आमूलाग्र कल्याणकारी परिवर्तन घडवणार आहे. ऋषिमुनींच्या, साधु-संतांच्या, कर्मयोगी माहात्म्यांच्या, क्रांतिकारी तत्त्ववेत्त्यांच्या स्वप्नपूर्तीचा क्षण जवळ आलाय. मुक्तिपर्वाचा आरंभ झालाय... डॉ. टेलर, मुक्तिपर्वाचा आरंभ झालाय!''

पुन्हा दोघेही जण काही क्षण स्तब्ध राहिले. मग स्वतःचा भावावेश सावरून के. के. ने डॉ. टेलरना निरोप दिला.

■

के. के. च्या घरून निघाल्यानंतर उरलेल्या दिवसांत डॉ. टेलरनी सहकार्यांच्या मदतीने मोर्चा आणि मेळाव्याची सारी व्यवस्था झाल्याची खात्री केली. पोलिसांचं संरक्षण, प्रेस, शासनाची परवानगी अशा कितीतरी बाबी त्यांनी जातीनं केल्या.

मेळाव्याच्या, ठिकाणी ते निघाले तेव्हा त्यांच्या मनात आलं. हजारो मैल दूर असणाऱ्या माणसांच्या मनात सारखेच विचार येतात! हजारो वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या आणि आजच्या व्यक्तीमध्येही सारखे विचार येतात! काही तरी चांगलं घडायचं असेल तर ही एकात्मता नक्कीच महत्त्वाची ठरेल. के.के. चं सोमनिलयम असो वा आपलं चार्लस्टन आंतरिक एकात्मतेचं सामर्थ्य वेगळेच आहे! ते तिथे पोचले तेव्हाच पार्किंग लॉटमध्ये स्वतःची टोयोटा पार्क करून के. के. नायडू लॉर्ड कॅलहूनच्या पुतळ्यापाशी आला होता.

एरवी त्या भल्यामोठ्या आवारात अशा संध्याकाळच्या वेळी एखाद दुसरा विद्यार्थी किंवा मवाली सोडल्यास चिटपाखरूदेखील आढळत नसे. पण आज मात्र तरुण तरुणींचे घोळके हातात विविध प्रकारच्या घोषणांचे फलक घेऊन गप्पा मारताना दिसत होते.

लॉर्ड कॅलहूनच्या पुतळ्याकडे तो पाहत असताना त्याच्याकडे डॉ. टेलर आले. त्यांच्याबरोबर दांत थोडेसे पुढे असलेली एक तरुण मुलगी होती. तिच्या रूपावरून के. के. नं लगेच ओळखलं की ती डॉ. टेलरची मुलगी लेस्ली आहे. डॉ. टेलरनी त्या दोघांची औपचारिक ओळख करून दिली आणि खास अमेरिकन ढंगात मस्करीत टोमणा मारला, ''आम्ही तुमच्या लॉर्ड

कृष्णाच्या विरोधात चाललोय! राग नाही ना?''

त्यांचा विनोद समजून के. के. नं हसत म्हटलं, ''नाही डॉक्टर! कृष्णाच्या विरोधात देखील वाट चुकलेले असले तरी महात्मेच होते! तुम्ही त्यांच्या पंक्तीला बसताहात?''

त्याच्या उत्तराला दाद म्हणून डॉ. टेलर खळखळून हसले. म्हणाले, ''आय वॉज किडिंग... प्लीज डोंट माइंड... मी विनोद केला.''

त्यावर पुन्हा हसून के. के. नं म्हटलं, ''इन फॅक्ट, तुम्ही कृष्ण, बुद्ध, ख्राइस्ट... सर्वांचे मित्र आहात! खरं?''

ते काही बोलणार एवढ्यात कार्यक्रम सुरू करण्यासाठी त्यांना बोलवायला दहा-बारा स्वयंसेविकांचा ताफा आला!

डॉ. टेलरनी पुन्हा एकदा घाईघाईनं कार्यक्रमाची रूपरेषा त्याला सांगितली आणि त्याला बसण्यासाठी जागा देऊन त्याची रजा घेतली.

थोड्या वेळानं मिरवणुकीला सुरुवात झाली. कॅलहूनच्या पुतळ्यापासून रोपर हॉस्पिटल, इन्स्टिट्यूट ऑफ फॅमिली मेडिसीन अशा मार्गानं मोर्चा चार्लस्टनमधील बॅटरी या नावानं ओळखल्या जाणाऱ्या भागात आला. अण्वस्त्राविरोधी घोषणांबरोबरच काहीजण गाणी गात होते, काहीजण नाचत होते, तर काहीजण विनोदी चाळे करीत होते! मोर्चाबरोबर चालणारा के. के. सगळं काहीशा कौतुकानं व कुतुहूलानं पाहात होता.

ईस्ट बे स्ट्रीटजवळच्या गार्डनमध्ये मोर्चाचं सभेत रूपांतर झालं. सभा सुरू करण्याच्या वेळी डॉ. टेलरनी त्याला हाक मारली. तो पुढे होऊन व्यासपीठावर जाताच त्याला ओळखणाऱ्या काही जणांनी टाळ्या वाजवल्या.

डॉ. टेलरनी त्यांच्या नेहमीच्या मिस्किल पद्धतीनं पण प्रसंगाला साजेशा तऱ्हेनं जमलेल्या समुदायाला के. के. ची ओळख करून दिली. त्यात मुख्यत: वैज्ञानिक, अध्यापक आणि पदव्युत्तर विद्यार्थीच होते. उत्साही श्रोत्यांनी टाळ्यांचा कडकडाट केला. तो थांबताच संघटक या नात्यानं डॉ. टेलरनी के. के. ला यासंदर्भात त्याचे विचार सांगण्याची विनंती केली.

के. के. बोलायला उभा राहिला. प्रथम त्यानं साऱ्या समुदायावरून नजर फिरवली. मग अगदी उत्स्फूर्तपणे त्या सर्वांचं अभिनंदन केलं.

प्रत्येक व्यावसायिकाला स्वतःचा धर्म कसा समजावून घ्यावा लागतो आणि त्याचं पालन करण्यात जीवनाची कशी कृतार्थता असते हे विशद करून

त्यानं वैज्ञानिकांचा धर्म स्पष्ट केला. वैज्ञानिकांनी विज्ञानाचे व्यापक परिणाम-दुष्परिणाम लक्षात घेतले पाहिजेत असं सांगून अण्वस्त्रे, रासायनिक शस्त्रे, तसेच विज्ञानाच्या क्षेत्रातील दडपशाही आणि मक्तेदारी यामागील क्षुद्र व हिंस्त्र स्वार्थाचं विवरण करून त्यानं अण्वस्त्रविरोधी चळवळीचा आशय समजावून दिला. त्याचप्रमाणे यावर सर्व माध्यमातून प्रचार होण्याची गरज प्रतिपादन केली.

मग वैज्ञानिकांनी वेदान्त समजावून घ्यावा. त्याचा अनुभव घेण्याचा प्रयत्न करावा व ही सद्य: काळाची हाक आहे असं ठासून सांगितलं. त्यानं पुढे म्हटलं, की खरी विशाल दृष्टी प्राप्त झाली तर ते सारे श्रोते शिक्षण, संशोधन, उत्पादन आदी साऱ्या क्षेत्रांतील धोरणे, योजना व अंमलबजावणींना विश्वकल्याणाचे अधिष्ठान प्राप्त करून द्यायला उद्युक्त होऊ शकतील. किंबहुना त्यासाठी स्वयंस्फूर्तपणे सर्वस्वही झोकून देतील. त्यानंतर थोडक्यात, ही दृष्टी म्हणजे सर्व धर्म आणि सर्व विचारांची उच्चतम परिणती कशी आहे व यामध्ये भाबडेपणाने स्वीकारण्याची व करण्याची कोणतीही बाब कशी नाही हे देखील विशद केलं.

त्यानं म्हटलं, "अन्यायाला प्रभावीपणे विरोध करण्यासाठी जसा निःस्वार्थीपणा व निर्भयपणा लागतो व त्यासाठी आत्मज्ञानाचं अधिष्ठान लागतं, त्याचप्रमाणे अण्वस्त्रांनाही प्रभावी विरोध करण्यासाठी मृत्यूच्या भीतीपासून मुक्ती आणि आत्मज्ञानाची अनुभूती महत्त्वाची असते. क्षुद्र स्वार्थासाठी अन्यायाला विरोध करणं किंवा भीतीपोटी अण्वस्त्रांना विरोध करणं गैर नव्हे. परंतु अशा विरोधाला दूरगामी यश मिळू शकत नाही!"

मग थोड्याशा खेळकर पद्धतीनं त्यानं भस्मासुर आणि मोहिनीची पौराणिक कथा सांगितली आणि कथेतील तात्पर्य भस्मासुरासारख्या अण्वस्त्रनिर्मात्यांच्या बाबतीत किती लागू आहे हे समजावून दिलं.

शेवटी सर्वांना शुभेच्छा देऊन त्यानं आपलं बोलणं संपवलं.

के. के. नंतर डॉ. टेलरनीही एक छोटेखानी भाषण करून अण्वस्त्रनिर्मितीतील पुष्कळ वैज्ञानिकांच्या पर्यायी उपजीविकेचे प्रश्न उपस्थित होईल याकडे लक्ष वेधलं आणि त्या दृष्टीनं पावलं टाकण्याचं आवाहनही केलं.

सरतेशेवटी अण्वस्त्रविरोधी घोषणा आणि गाणी झाली आणि सभा

विसर्जित झाली.

■

अण्वस्त्रविरोधी चळवळीचा तो मेळावा यशस्वी झाल्यानंतर काही दिवसांनी के. के. नं कामिनीशी संपर्क साधला. त्याच्या मनातल्या पुष्कळ गोष्टी त्यानं ऑफिसमध्ये बसल्या बसल्या तिला लिहिल्या आणि काही निर्णयदेखील कळवले.

आज त्यानं सर्व मित्रांना डिनरसाठी बोलावलं होतं. कॉलनी हॉऊसची बँक्वेट रूम गजबजून गेली होती. के. के. नं मुद्दाम आयोजित केलेल्या डिनरसाठी रोझी, फ्रँकलीन, पीटरपासून डॉ. टेलर, लेस्लीपर्यंत सारेजण होतेच. पण योगायोगानं चार्लस्टनमध्ये कामानिमित्त आलेली गायत्री-शंभू माथूरची जोडगोळीही होती. शिवाय डॉ. सतीश देसाईदेखील उपस्थित होता!



चोवीस-पंचवीस जणांचा तो घोळका कॉलनी हाऊसमध्ये जमून एकमेकांची चौकशी करीत हसत-खिदळत होता. स्वत: मॅनेजरनं जातीनं सर्वांची बसण्याची नीट व्यवस्था लावली. स्वागताला के. के. होताच.

पार्टीला आलेला जो तो आश्चर्य व्यक्त करीत होता. तो के. के. नं अचानक पार्टी जाहीर करून सर्वांना आग्रहानं बोलावल्याबद्दल. तशी पार्टी ही नित्याचीच बाब असली तरी कॉलनी हाऊससारख्या महागड्या हॉटेलात अन् ते देखील एकदम एवढ्या साऱ्यांना बोलावण्याचं प्रयोजन काय असावं याबद्दल कुणाला अंदाज येत नव्हता! जो तो आपापला तर्क लढवीत होता. कुणी म्हणालं, "तो नवीन हॉटेल सुरू करणार असेल." दुसऱ्यानं म्हटलं, "कदाचित त्याची फॅमिली आली असेल." तेवढ्यात तिसऱ्यानं वेगळीच संभाव्यता प्रगट केली. "त्याला कदाचित कॉलनी हाऊसच्या मालकीत हिस्सा मिळाला असेल."

ड्रिंक्स आली तशी ही कुजबूज थांबली. क्षणभर मंडळी आपापल्या ड्रिंक्समध्ये गुंतली. मग पुन्हा गप्पा सुरू झाल्या.

डॉ. टेलर मोठ्या खुशीत येऊन सतीशला त्यांच्या नवीन संशोधनाची रूपरेषा सांगत होते.

तेवढ्यात के. के. नं सर्वांना उद्देशून म्हटलं, "आज सर्वांनी नुसती ड्रिंक्स आणि जेवण घेऊन घरी जायचं नाही. पार्टी खऱ्या अर्थानं साग्रसंगीत आणि मन रिझवणारी व्हायला हवी."

के. के. बसला तशी सर्वांनी डॉ. टेलरना सर्वप्रथम गाणं म्हणायचा आग्रह केला. सर्वांच्या म्हणण्याला मान देऊन डॉ. टेलरनी 'माऊंटन म्युझिक' प्रकारात मोडणारं एक गाणं, एका पायानं ताल धरून हातवारे व हावभावासकट मोठ्या झोकात म्हणून दाखवलं. त्यांच्या त्या रंगतदार गाण्यानं दिलखुलास वागण्यानं इतरजणदेखील रंगात आले. गाऊ लागले. एकेकजण स्वतःला जमेल तसं गाणं म्हणून लागला. अचानक, गिरकी घेत रोझी उठली आणि पीटरचा हात धरून त्याला उठवून तिनं हळुवार आणि लयदार पदन्यास करीत नृत्य करायला सुरुवात केली. लगोलग इतरही जण भारल्यासारखे आपापला जोडीदार बरोबर घेऊन नृत्य करू लागले.

डान्सची ती ठेक्यातली बेहोषी ती तालबद्ध धुंदी पाहताना सतीशला राहून राहून वाटत होतं, की आपल्यालाही असं दबावशून्य होऊन, तणावमुक्त

होऊन, स्वतःवरची बंधनं विसरून, मनमोकळेपणाने, मुक्तपणे नाचता आलं असतं तरी किती बरं झालं असतं! पण त्याला नृत्याचा परिचयदेखील नव्हता. स्मार्ट बनून नृत्य करायला गेला तर त्याच्या बेडकासारख्या वाकड्यातिकड्या उड्या बघून लोकांनी त्याची टर उडवली असती याची त्याला खात्री होती. तो असा खट्टू होऊन बसला असतानाच त्याच्यापाशी ट्रेसी आली. त्याच्या मनातली आंदोलनं तिनं ताडली होती. परकी देश आणि परकी वातावरण यामुळे तो बुजतो हे मागेही एकदा के. के. च्या घरी तिनं पाहिलं होतं. त्याला आपुलकीची, मायेची गरज आहे हे जाणून त्याचा हात हातात घेत तिनं म्हटलं, ''कम ऑन डॉक, लेट अस डान्स.''

ट्रेसीच्या पाचारणानं सतीश एकदम हुरळून गेला. उत्तेजित झाला. पण त्याला अवघडल्यासारखंही झालं. कसंबसं आढेवेढे घेत त्यानं म्हटलं, ''मला नृत्य येत नाही.''

पण ट्रेसीनं त्याचा संकोच जाणून त्याला नृत्यासाठी ओढूनच घेतलं.

आता मात्र सतीशचा नाइलाज झाला. पण मनातून खूप बरं वाटलं.

पावलं तालात पडेनात. तेव्हा पुन्हा अतिसावध होऊन त्यानं म्हटलं, ''खरंच मला नृत्य अजिबात येत नाही.''

ट्रेसीनं हसून म्हटलं, ''सर्वांनाच शास्त्रशुद्ध नृत्य यायलाच हवं असं मुळीच नाही. ही काही स्पर्धा नव्हे नृत्याची. गंमत आहे!''

तिच्या त्या बोलण्यानं त्याच्या मनावरचं दडपण पुष्कळ कमी झालं. भीड चेपली. सतीशला आणखी मोकळं वाटलं. तिच्या निकटतेनं आणि धुंद नृत्य-संगीतानं त्याच्या शरीरातला रोम अन् रोम फुलला. ती सुखद जाणीव तो हृदयात साठवत राहिला.

हळूहळू एकेकाला जेवणाचे वेध लागू लागले. जेवणाची टेबलं भरून गेली.

जेवणासाठी जाताना सतीश ट्रेसीला म्हणाला, ''वाटतं आपण आयुष्यभर असंच नाचत राहावं. मदहोश होऊन! काही विवंचना नसाव्यात... अडचणी नसाव्यात...''

त्याच्या उद्गारांवर ट्रेसी आपुलकीनं हसली.

सर्वजण जेवायला बसले, तसा के. के. पुन्हा सर्वांना उद्देशून म्हणाला, ''कृपाकरून सर्वांनी सावकाश आणि यथेच्छ जेव्हा. जे लागेल ते मागवा.

मॅनेजरला स्पष्ट सूचना आहेत की हे इच्छाभोजन आहे!'' मग त्यानं अगदी थोडक्यात विविध पदार्थांची पाककृती आणि वैशिष्ट्यं यांची खमंग अन् उपयुक्त माहिती दिली.

मध्येच ड्रिंक्स थोडी जादाच झालेल्या एकानं म्हटलं, ''पण मि. नायडू, तुम्ही हे अजून सांगितलंच नाहीत, की ही एवढी लॅव्हीश पार्टी आहे कशाकरिता?''

के. के. नं हसून त्याला म्हटलं, ''आहे एक खास कारण! पण आत्ताच सांगण्यापेक्षा शेवटी सांगितलेलंच बरं!''

सर्वांची जेवणं आटोपली; तसे कॉफी, शँपेन, वाइन, आईस्क्रीम, कस्टर्डस्, पुडिंग्स् वगैरे पदार्थांवर सर्वजण मोकळेपणानं तुटून पडले. पुन्हा एकदा आपापल्या जागांवरून उठून मंडळी गप्पांसाठी मिसळली.

शेवटी खास भारतीय प्रकार म्हणजे पानाचे विविध प्रकार आले. बनारसी, पुना मसाला, मघई, कलकत्ता मसाला इत्यादी इत्यादी.

सर्वजण तृप्त झालेले बघून के. के. म्हणाला, ''मित्रांनो कृपया जरा आता माझ्याकडे लक्ष द्या.''

सर्वजण धुंद होऊन तृप्त मनानं आणि कुतुहूलानं के. के. काय म्हणतो ते ऐकू लागले. सर्वांची उत्सुकता शिगेला पोचलेली पाहून के. के. म्हणाला, ''आज पार्टी देण्याचं कारण जाणून घ्यायचं आहे, ना? नाऊ नो मोअर सस्पेन्स! धीस इज अ 'गुड बाय' पार्टी! पुढच्या आठवड्यापासून मी अमेरिकेत नसेन!

ते ऐकताच सारे एकदम स्तिमित झाले. कुणाचाच स्वतःच्या कानावर विश्वास बसेना! सारेजण अवाक् होऊन बघतच राहिले.

क्षणभर थांबून के. के. नं पुढे म्हटलं, ''मित्रांनो, मी तुमचं जेवण पुष्कळदा चवदार केलं असेल कदाचित् ... पण तुमच्यामुळे माझं जीवन चविष्ट झालं!'' मग त्यानं अगदी प्रेमानं ओथंबून, आत्मीयतेनं स्वतःचा सोमनिलयमली परतण्याचा निर्णय जाहीर केला.

त्याच्या निर्णयानं सर्वच चकित झाले होते हे खरंच. पण त्यातल्या त्यात डॉ. गायत्री आणि डॉ. टेलर यांच्या चर्या फारच बदलल्या होत्या.

पुन्हा एकदा के. के. च्या बोलण्यावर उलट-सुलट प्रतिक्रिया व्यक्त होऊ लागल्या.

डॉ. टेलर टॉमला उद्देशून म्हणले, "स्वतःच्या अत्युत्कट आणि तरल संवेदनांचा आविष्कार करण्यासाठी हे एक ठोस आणि अचूक पाऊल के. के. उचलतोय.

"असेल." फारसा बोध न झालेला टॉम काहीतरी बोलायचं म्हणून बोलला.

"आम ॲम शुअर.... त्याला भारतामध्ये चाललेल्या विविध आंदोलनात सक्रिय सहभाग घ्यायचा असणार... त्या चळवळींना विशाल परिमाण देण्यासाठीच तो भारतात चाललाय याबद्दल निदान मला तरी शंका नाही!"

डॉ. टेलरांच्या म्हणण्याला ट्रेसीनं दुजोरा दिला.

त्या दोघांचं म्हणणं न पटलेला सतीश मध्येच म्हणाला, "आज अचानक स्वतःचा मार्ग सापडल्याचं के. के. म्हणतोय! पण प्रत्यक्षात , ही श्रीमंतानाच परवडणारी एक स्वप्नाळू लहर आहे! कोणत्याही प्रकारे पाहिलं तरी ज्याच्या त्याच्या समस्येला जो तो स्वतःच जबाबदार नसतो का? लबाड लीडर्सना सोडून सामान्य लोकांना उपदेशाचे डोस देत फिरणं म्हणजे भोंदूपणा आहे! हे असलं मला नाही पटत!"

सतीशला थांबवत डॉ. टेलर म्हणाले, "डॉ. सतीश, तुझा भ्रमनिरास होईल तेव्हा तुला कळेल! स्वप्नात तू आहेस के. के. नाही!"

"नाही, डॉ. टेलर!" ठामपणानं सतीश म्हणाला, "उलट के. के. प्रामाणिक असेल तर त्याचाच भ्रमनिरास होईल! कधी काळी या निस्वार्थी वागण्यापायी सारं गमावून बसेल अन् त्यावेळी जेव्हा चणचण भासू लागेल, हलाखीचे दिवस येतील, तेव्हा त्याला भोवतील आणि उमगतील त्याच्या आजच्या वागण्याचे दुष्परिणाम! पण तेव्हा वेळ निघून गेलेली असेल!"

"डॉ. सतीश!" डॉ. टेलरना काय बोलावं सुचेना.

"त्याचं काय आहे डॉ. टेलर, प्रत्येक व्यक्ती स्वतःच्या सुखासाठी जगते! अर्थात त्यात गैर काही नाही माझ्या मते! पण स्वतःचा अहंकार कुरवाळण्यासाठी उगाच गरिबांचा पुळका आल्याचा दावा कशाला करायचा? कोणती योजना मनुष्य समाजाला वासनेपासून मुक्त करू शकते? जगाचा बाजार सुखदुःखांनी भरून असाच चालू राहणार! ही जगरहाटी आहे! शेक्सपीअरच्या म्हणण्याप्रमाणे काहीही करणं म्हणजे अखेर स्वतःची

भूमिका, स्वतःचा रोल पार पाडणंच नव्हे का ? मग स्वतःच्या श्रीमंती फॅड्स्चा एवढा डामडौल करून स्वतःचा उदो उदो कशाला करायचा? असल्या मृगजळापाठी आमच्यासारखे गरीब लागले, तर सर्वस्व गमावतात!''

सिगरेटचा एक झुरका मारून सतीश पुढे म्हणाला, ''बदलत्या जगात बरं-वाईट, राक्षसी-मानवी, शोषक-शोषित, वगैरे द्वंद्वे वेगवेगळ्या पातळ्यांवर राहणारच. आपण तथाकथित शोषणमुक्तीसाठी - के. के. म्हणतो त्याप्रमाणे- लढणं पूर्णपणे निरुपयोगी आहे. समतेसाठी लढणं व्यर्थ आहे. वाघ, किडा, मुंगी, रोगी, निरोगी, निर्बुद्ध, बुद्धिवान यात फरक राहणारच. के. के. एक तर भंपक तरी आहे किंवा तो आत्मवंचना तरी करतोय! दुसरं काही नाही!''

डॉ. टेलर विचारपूर्वक सतीशचं म्हणणं ऐकत होते. अचानक ते म्हणाले, ''आता मात्र तू एखाद्या महान तत्त्वचिंतकासारखा बोललास!''

सतीश एकदम खुलला! त्याला डॉ. टेलरच्या बोलण्यातली खोच कळली नाही. उपहास जाणवलाच नाही!

पण लगेच डॉ. टेलर पुढे म्हणाले, ''अहो तत्त्वचिंतक, के. के. चा निर्णय हे फॅड नाही. ढोंग नाही. आत्मवंचना तर मुळीच नाही. तुला वाटतंय तसली शोषणमुक्ती, समानता त्यात अजिबात अभिप्रेत नाही. त्याला हा अचानक झालेला साक्षात्कारही नाही. के. के. त्याच्या निर्णयाला कोणत्याही मोठ्या विशेषणानं मुलामा देण्याचा प्रयत्नही करीत नाहीय. मला के. के. ची जी माहिती आहे त्यावरून मी सांगतो, सर्व प्रामाणिक माणसांप्रमाणे के. के. च्या मनाचीही स्वाभाविक प्रेरणा मुक्तीची आहे. पण मुक्तीच्या आकांक्षेची, तिच्या जाणिवेची आणि तिच्या अभिव्यक्ती व आविष्काराची क्षितिजं आणि परिमाणं नेहमीच रुंदावत जातात. प्रगल्भ होत जातात! त्यांची कक्षा वाढत जाते! संकुचित व स्वार्थी जीवनापासून अधिकाधिक प्रबुद्ध व विशाल जीवनाविष्कारामध्ये परिवर्तित होण्याच्या प्रक्रियेलाच पौर्वात्य तत्वज्ञानात समेष्टियोग म्हणतात. प्रत्येक व्यक्तीमध्ये ही प्रेरणा कार्यरत असते, हे ऐतिहासिकच नव्हे तर चिरंतन सत्य आहे!''

सतीश डॉ. टेलरचं बोलणं अवाक् होऊन ऐकत होता. क्षणभर त्याच्या मनांत विचार चमकून गेला, खरोखर हे अमेरिकन सारं काही मनापासून करतात! म्हातारा पार्टी एंजॉय करतोच पण सारं कसं मनस्वी... युक्तिवाद- देखील कसा तर्कशुद्ध करतोय!

डॉ. टेलरनी त्याला हटकून पुढे म्हटलं, ''ह्या मुक्तिप्रक्रियेचं पर्यवसान आत्मज्ञान आहे. ह्यालाच पुरोगामी म्हणायचं, किंबहुना ऊर्ध्वगामी म्हणायचं. जे ह्या मुक्तिप्रक्रियेशी फटकून राहतात ते प्रतिगामी किंवा अधोगामी! जे मुक्तिप्रक्रियेतील स्वतःची भूमिका पार पाडण्याचा प्रयत्न करतात ते जीवनाचं सार्थक करतात, तर जे तसं करीत नाहीत, ते त्यांच्या नकळत षंढाची भूमिका पार पाडत आयुष्य वाया घालवतात!''

डॉ. टेलरचा शेवटचा शब्द सतीशच्या वर्मी लागला. त्याचा चेहरा एकदम पडला! त्याला भारतातील आणीबाणीच्या काळात आचार्य विनोबांनी वापरेला शब्द आठवला. कर्ममुक्ती!... खरंच विनोबांना त्यावेळी पुष्कळांनी दिलं ते 'कर्ममुक्ती'ची भूमिका पार पाडल्याचं अपश्रेय! पण इतरजण ऐकताहेत हे पाहून संकोचित झालेल्या सतीशला बोलू न देता डॉ. टेलरनी पुढे म्हटलं, ''अर्थात मेल्यानंतर आपल्याला श्रेय मिळतं की अपश्रेय याच्या विचारानं आजचं आपलं जीवन कशाला खराब करायचं असा प्रश्न तू नक्कीच विचारू शकशील! अन् ते खरंही आहे! सारं काही स्वतःच्या समाधानासाठीच आपण करतो. फक्त समाधानाची परिमाणं आणि साधनं वेगळी असतात एवढंच! के. के. च्या मागाहून कुणी जाण्याचा प्रश्न नाही... स्वतःचा निर्णय ज्यानं-त्यानं स्वतंत्रपणे घ्यायचाय. पण के. के. च्या वागण्याचं तुझं विश्लेषण आणि तुझं अनुमान उथळ अन् चुकीचं आहे एवढंच!''

सतीशला डॉ. टेलरचं म्हणणं अजूनही पटलं नव्हतं. पण इतरजण सारं आटोपून याक्षणी आपल्यासाठीच खोळंबले आहेत हे लक्षात आल्यानं आणि के. के. त्यांच्याच दिशेने येत असल्याचं पाहून सतीशनं, फक्त, ''एनी वे लीव्ह इट'' म्हणून नापसंतीनं मान उडवली.

डॉ. टेलरनीही के. के. ला येताना पाहून, आता उगीच कटुता नको असा विचार करून बोलणं आवरतं घेतलं. पण मनातल्या मनात मात्र म्हटलं, ''हीज स्टमक इज फुल बट हार्ट इज एम्टी!'' मग उठत त्यानी रेव्ह. बेट्झना म्हटलं ''तुम्ही काहीतरी बोला, बिफोर वुई डिस्पर्स... आपण के. के. ला शुभेच्छा तरी देऊ!''

रेव्हरंड बेट्झनी त्यांनाच सर्वांच्या वतीनं बोलायला सांगितलं. मग बेट्झकडे बघत डॉ. टेलर म्हणाले, ''डॉ. बेट्झ एका धर्माचे उपदेशक आहेत म्हणून की काय कुणास ठाऊक त्याना इथे बोलणं काही कारणास्तव

अप्रस्तुत, गैरसोयीचं वाटत असावं. पण भारतामध्ये जाऊन के. के. जे करू पाहतायत ते सर्व धर्मांच्या मूलभूत प्रेरणेशी अगदी एकजीव आहे. बियाँड प्राइड ॲण्ड प्रेज्युडिस. अभिमान आणि पूर्वग्रहाच्या अतीत आहे. मी त्यांना आपल्या सर्वांच्या वतीनं मनःपूर्वक शुभेच्छा व्यक्त करतो!'' बोलता बोलता डॉ. टेलरचा स्वर गदगदाला.

रेव्ह. बेट्झचा चेहरा मात्र खर्रकन उतरला.

आतापर्यंत गप्प बसलेल्या डॉ. गायत्रीच्या मनांत आलं, 'एक कैदी सुटून निघाला. आम्ही मात्र जन्मभर हेच भोगणार.' तिला के. के. बद्दल सुलभाशी झालेल्या गप्पांची आठवण झाली. त्याचक्षणी तिचं लक्ष शंभूकडे गेलं. लो कट ब्लाऊज घातलेल्या रोझीच्या उरोजांकडे पाहण्यात तो धुंद झाला होता...

■

के. के. नं दिलेली ती पार्टी संपली. त्याचबरोबर के. के. ची भूमिकाही संपली! के. के. परत कमलेंद्र झाला. कमलेंद्रगारू झाला. हजारो मैलांचा प्रवास आणि सोळा वर्षांचा जीवनप्रवास वेगळ्या आणि विहंगम टप्प्यावर



आला. जगभरच्या प्रवासात एकात्मतेची वीण विणता विणता नकळत नायडू राजघराण्याच्या एकीकरणाची वीणही विणली गेली. भौगोलिक अंतर आणि ऐतिहासिक विभिन्नता असतानाही एकात्मतेची पहाट मनामनातून उजाडत गेली. नायडू राजघराण्यासाठी तर ही आनंदपर्वणीच होती. त्याचंच प्रत्यंतर आज सोमनिलयममध्ये येत होतं.

सोमनिलयमच्या त्या ऐतिहासिक वास्तूवर आज पताका आणि तोरणं दिमाखानं फडकत होती. सकाळपासून सनईचा मंगलध्वनी वातावरणात प्रसन्नता फुंकीत होता. महाराज सत्येंद्रांनी कधी नव्हे तो त्यांचा घोड्याचा रपेटीचा दैनंदिन कार्यक्रम आज रद्द केला होता. सर्वांनी ठेवणीतले कपडे घातले होते. सर्वजण उत्सुकतेनं आणि आतुरतेनं एकमेकांकडे पाहात, तर कधी परस्परांची नजर चुकवीत इकडून तिकडे फिरत होते.

कृष्णाबाईंनी ठेवणीतला शालू तर कामिनीनं कमलेंद्राच्या आवडीची साडी परिधान केली होती. मधूनं तिचा भारी किमतीचा फ्रॉक घातला होता. एवढंच कशाला, आज रघुराम-सीताबाईपासून साऱ्या सेवकांसकट सर्वजण अगदी सण असल्यासारखे सजले होते. बाहेरचीही पुष्कळ माणसं राजवाड्यावर जमली होती.

सोमनिलयमचा निद्रिस्त अन् पक्षाघात झालेला इतिहास जणू काही जागा होण्यापूर्वी कूस परतत होता... पुन्हा एकदा नव्या दमानं भरधाव घोडदौड करण्यासाठी! सोमनिलयमच्या भूतकाळात जमा झालेलं पुण्यपर्व, जणु काही कुणा देवदूताच्या कुणा पुण्यात्माच्या तपश्चर्येमुळे पुन्हा परत अवतीर्ण होऊ लागलं होतं. लाखो लोकांच्या अंतःसंवेदनांच्या भक्तिपाठानं जणु काही सोमनिलयममध्ये कल्याणपुष्पक उतरणार होतं!

तर आजची ही सारी तयारी होती, 'युवराजपुत्र' कमलेंद्राच्या स्वागताची! अनोखी हुरहूर आणि उत्सुकता सर्वांच्याच डोळ्यांतून ओसंडण्याला तेच कारण होतं! सुमारे दीड तपाच्या प्रदीर्घ अन् कटू विरहानंतर आणि सलणाऱ्या दुराव्यानंतर युवराजपुत्र कमलेंद्र आज कायमसाठी परत येणार होता. कमलेंद्राच्या वाटेकडे डोळे लावून सारेजण स्वागताची जय्यत तयारी करून अस्वस्थपणे वावरत होते.

काहीजण विमानतळावर कमलेंद्रगारूंना आणण्यासाठी गेले होते. पण राजघराण्यातील सर्वांना राजवाड्यातच राहावं आणि तिथेच स्वागत सोहळा

साजरा करावा, असं महाराज सत्येंद्रांचं मत पडल्यामुळे सर्वजण असे उतावीळ होऊन थांबले होते.

त्याच वेळी कमलेंद्रला घेऊन येणारी पांढरी ॲम्बॅसिडर टॅक्सी सोमनिलयमच्या सीमेमध्ये शिरली, तेव्हा कमलेंद्राला अत्यंत आनंद झाला. त्याच्या चित्तवृत्ती बहरून आल्या. तो हर्षभरित झाला.

सोमनिलयम सोडल्यानंतर तो इथे आला नव्हता असं नव्हे. परंतु ते येणं कसं परत जाण्यासाठी होतं. अल्पकाळासाठी होतं. त्या भेटी कशा ताण-तणावाखाली झाल्या होत्या. त्यामुळे आज सोमनिलयममध्ये शिरताच नकळत त्याची दृष्टी दिसेल ते पाहात होती. सारं काही नजरेत साठवत होती.

सोमनिलयममध्ये पडलेला फरक आज त्याला प्रकर्षानं जाणवला. रस्ते काही काही ठिकाणी डांबरी झाले होते, इमारती झाल्या होत्या, झाडी कमी झाली होती, बहुतेक ठिकाणी विजेच्या तारा पेलणारे खांब दिसत होते. शिवाय जिकडेतिकडे मोठमोठ्या जाहिरातींचे बोर्ड्स दिसत होते. अमेरिकेतल्या कोकाकोलाप्रमाणे 'रिफ्रेशिंग कोल्यांच्या आणि अमेरिकन 'स्प्राइट'च्या भाऊबंदाच्या जाहिराती झळकत होत्या.

महिरपि खिडक्यांनी शोभून दिसणाऱ्या जुन्या दिमाखदार वाड्यांचं नूतनीकरण होऊन त्यांची जुनी शान झाकोळली गेलेली दिसत होती. त्यातल्या काहींमध्ये सरकारी कार्यालयं, बँकांची कार्यालयं, लॉजिंग बोर्डिंग्स वगैरे येऊन त्या वाड्यांचं मूळ स्वरूपच नव्हे तर अंतरंगही बदलल्याचं जाणवत होतं.

त्याच्या वाडवडिलांच्या चाकरीतल्या दरबारी मानकऱ्यांच्या, सरदार-दरकदारांच्या वाड्यांची अवस्था आसन्नमरण, असहाय्य, सारं काही सोसत कसंबसं जगणाऱ्या रोग्यांसारखी करुण झाली होती. एक दोन ठिकाणी परमिट रुम्स झाल्या होत्या.

गॉगलमधून सारं काही निरखून पाहणाऱ्या कमलेंद्रच्या नजरेला त्याचवेळी एक पोस्टर पडलं. "कष्टकरी मुक्ती मोर्चा जिंदाबाद!" "कष्टकरी मुक्ती मोर्चात सामील व्हा... अन्यायाचा प्रतिकार करा!"

त्याला त्याच्या बालपणी अनुभवलेलं निवडणुकीच्या धामधुमीचं राजकीय वातावरण आठवलं.

गाडीनं वळण घेतलं. रस्त्याच्या कडेला पाच-सात जण पत्ते खेळताना

दिसले. देशाचं राजकारण आणि समाजकारण वळणा-वळणांनी आणि टप्प्या-टप्प्यानं कुठपर्यंत येऊन पोचलंय या विचारात तो असतानाच पुढच्याच वळणावरच्या बसस्टॉपवर एक तरुण आणि तरुणी उघड्या-वाघड्या प्रेमचेष्टा करताना दिसली. त्यांचं ते खिदळणं, त्यांच्या वागण्याची ती पातळी त्याला बरंच काही सांगून गेली.

गाडी पुढे गेली तसा समोरच्या चौकाच्या मध्यभागी केलेल्या वर्तुळातला त्याच्या वडिलांचा अर्धपुतळा दृष्टीस पडला. चौकात गाडी थांबवून तो खाली उतरला. चबुतऱ्यासमोर वाकून त्यानं पुतळ्याला वंदन केले. परत फिरणार एवढ्यात त्याच पुतळ्याच्या डोळ्यावरील कुणा पक्ष्याची सुकलेली विष्टा त्याच्या नज़रेत पडली. वडिलांची मृत्यूनंतरची ती विटंबना पाहून तो गंभीर झाला.

त्याच्या स्मृतीमध्ये अजून घर करून असलेला सकाळी वाजणारा चौघडा, झडणाऱ्या नौबती, पहाटे-पहाटे गाव जागवत फिरणारे फकीर, माधुकरी, ब्राह्मण, पूजेची तबकं आणि फुलांच्या परड्या घेऊन देवपूजेला जाणारी व पूजेहून परतणारी शूचिर्भूत माणसं, शालीन स्त्रिया, आपापल्या व्यवसायाला निघालेले बलुतेदार, समोरच्या वेदशाळेतून चालणारी... अजून कानात घुमणारी ती सुरातली संथा...

आज यातलं काहीही नव्हतं!

वेदशाळेच्या पडक्या इमारतीच्या आवारातल्या उकिरड्यांत डुकराची पिल्लं खेळत होती!

कमलेंद्रच्या पोटात कालवाकालव झाली.

तो मुकाट्यानं गाडीत बसला. जणू काही आपण आपल्या आसन्नमरण आईचीच विटंबना पाहतोय असं त्याला वाटलं. त्याचवेळी मनात आलं, बरं झालं! आपण परतलो. बरं झालं... या आईची सेवा होईल, त्या आईचं समाधान होईल... नवजीवनाचे कोंब फुटतील... संस्कृती कात टाकील... नव्या जोमानं बहरून येईल...

त्या उत्तेजक विचारासरशी केव्हा एकदा आपण घरच्या साऱ्यांना भेटतो असं त्याला झालं!

अखेर राजप्रासाद नजरेच्या टप्प्यात आला!

■

प्रथमदर्शनीच त्याला जाणवलं की राजवाड्यासमोरच्या महाद्वाराजवळचे बुरुज ढासळले होते. देवडीची तर नामोनिशाणी राहिली नव्हती.

आवारात शिरताच नजरेत भरली ती त्या परिसरातील बगीच्याची स्थिती! तरारून फुलणारी फुलझाडं त्यांच्या भोवतालची रंगी-बिरंगी विटा-दगडांची वर्तुळाकार अळी, दगडी फरसबंदी, कारंजा सारं नष्टप्राय झालं होतं. रानटी, काटेरी झाडं-झुडुपं तयार होऊन भकासपणात भर घालीत होती. नाही म्हणायला कोरांटी, जास्वंदी वगैरे अजिबात निगा न लागणारी झाडं तेवढी शिल्लक होती...

जिथून लाखोंचं भविष्य घडवलं जायचं... हजारोंच्या जीवन-मृत्यूचे निर्णय व्हायचे ते हे सत्तेचं केंद्र आज अनाथ असहाय भिकाऱ्यासारखं करुण, दयनीय दिसत होतं!

काळाच्या घणाघातानी बरं-वाईट सारं काही इतिहासजमा होत चाललंय! राहिलेयत फक्त मृतप्राय अवशेष! संमिश्र भावजांनी त्याचे डोळे पाणावले.

गाडी राजप्रासादासमोर थांबली. तसा घाई-घाईनं गाडीचा दरवाजा उघडून कमलेंद्र बाहेर आला. पोर्चमध्येच राजघराण्याच्या प्रथेप्रमाणे त्याला सुवासिनींनी ओवाळलं. मग त्यानं साऱ्या वडीलधाऱ्यांना चरणस्पर्श करून अभिवादन केलं आणि मग स्थानापन्न झाला. मधू धावत येऊन त्याला बिलगली.

थोड्या वेळानं उठून तो बाजूच्या दरबार हॉलमध्ये गेला. जमलेल्या परिचितांशी थोडा वेळ बोलून त्यांच्या चहा सरबत-फराळयाची व्यवस्था करायला सांगून तो आत आला.

थोडा वेळ गप्पा झाल्यानंतर तो आंघोळ करून फ्रेश होण्यासाठी स्वतःच्या खोलीत आला.

हरीनं साऱ्या सामानाची व्यवस्था सेवकांकरवी लावून घेतली होतीच.

आपले डॅडी येणार या उत्कंठेने त्याची वाट बघणारी मधू त्याला प्रत्यक्षात पाहिल्यावर भेटल्यावर मात्र एकदम गोंधळली होती. स्वतःचा आनंद व्यक्त कसा करावा हे तिला समजत नव्हतं. हरखून जाऊन तिनं विचारलं, ''डॅडी, तुम्हाला टोस्ट आणू का? मला येतात बनवायला!'' अन् हळूच त्याच्या हातात एक लिफाफा दिला. कमलेंद्रानं उघडून पाहिलं, तर मधूनं

स्वतः रंगवून तयार केलेले ग्रीटिंग कार्ड! कमलेंद्रला उचंबळून आलं.

कमलेंद्रनंदेखील बॅग उघडून तिच्यासाठी आणलेल्या मॅकिन्टॉश, पर्सनल कॉम्प्युटर, इलेक्ट्रॉनिक पियानो, टेडी बेअर्स, ग्लो फ्रेन्ड्स, बार्बी सेट्स वगैरे वस्तू तिच्या स्वाधीन केल्या.

पिता-पुत्रीच्या गप्पा खूप रंगल्या. तिची शाळा, वर्गमैत्रिणी, शिक्षक-शिक्षिका, खेळ, संगीत सारं त्यानं विचारून घेतलं. तिनंही त्याला पुष्कळ माहिती विचारली.

त्या दरम्यान गावातले आणखी काही प्रतिष्ठित त्याला भेटायला आले होते त्यांना भेटून तो परत स्वतःच्या खोलीत आला. त्याला माहीत होतं की ते सारेजण मतभेदांमुळे घर सोडलेल्या, सोळा वर्षं परदेशी राहिलेल्या युवराजपुत्राला पाहण्याच्या उत्सुकतेनं आले होते! केवळ आदरापोटी वा आपुलकीपायी नव्हे!

थोड्या वेळानं मधू खेळायला गेली.

एकटा राहताच त्याला प्रवासाचा शीण जाणवू लागला. गरम पाण्यानं स्नान झाल्यामुळे त्याला आता झोप येऊ लागली होती. कामिनी कशी नाही आली? की फराळाची व्यवस्था करतेय, असा विचार मनात यायला आणि कामिनी आत यायला एकच गाठ पडली!

कामिनी त्याच्या सोफ्यावर येऊन बसली. दोघांची दृष्टादृष्ट होताच कमलेंद्रला युगायुगाची तहान भागावं तसं वाटलं. पण त्याचबरोबर तिच्याविषयी आर्त ओढदेखील वाटली!

थोडा वेळ एकमेकांशी बोलून ती दोघं नाश्त्यासाठी जेवणाच्या दालनाकडे निघाली.

दिवसभर विश्रांती घेतल्यानंतर कमलेंद्र थोडा ताजातवाना झाला. सायंकाळी पुन्हा काही वेळ गप्पा रंगल्या. मग रात्र झाली तशी भोजनं पार पडली. आता यावेळी प्रथमच कित्येक वर्षांनी त्यानं भोजनापूर्वी तो श्लोक म्हटला! अन्नं ब्रह्म रसो विष्णुः भोक्ता देवो महेश्वरः। प्रीयताम् भगवान ईशः परमात्मा सदाशिवः ।। अहम् वैश्वानरोभूत्वा प्राणिनाम् देहामाश्रितः । प्राणापान समायुक्तः पचाम्यन्नम् चतुर्विधम् ।। भोजन झाल्यानंतर मुखशुद्धी करीत तो शय्यागृहात आला.

त्या पुरुषभर उंचीच्या खिडकीसमोर उभा असताना कमलेंद्रच्या मनांत

अमेरिकेतील त्याच्या अपार्टमेंटची आणि ह्या अतिप्रशस्त शय्यागृहाची तुलना झाली. जागेची मुळीच वाण नसलेल्या काळातील आणि राजवाड्यातील ते शय्यागृह म्हणजे भलं मोठं दालनच होते. खिडकीच्या बाहेर सज्जा होता. कमलेंद्र सज्जात आला तशी वाऱ्याची झुळूक आली. बाजूलाच एक सुंदर कोरीव झोपाळा होता. कमलेंद्र त्यावर बसताच तो कर्र कर्र वाजू लागला. दूरवर पसरलेला सोमनिलयमचा परिसर आणि तो शाकारणारं आकाश अस्पष्ट दिसत होतं. चित्रविचित्र रंगाचे ढग इतस्ततः घरंगळत होते. वातावरण शांत होतं. पण त्यात एक विलक्षण गूढरम्यता होती. कमलेंद्र तसाच आत आला. भिंतीवरील राजस्थानी शैलीतील राधाकृष्णाचं ते अतिप्रचंड तैलचित्र विलक्षण मनोहर आणि सात्विक शृंगार आणि अत्युत्कट प्रणयभावना फुलवणारं होतं.

तो पलंगावर घेऊन बसला तेव्हा तर त्याला तो स्वतः एकदम छोटा झाल्यासारखं वाटलं. त्याला जाणवलं की खऱ्या अर्थानं प्रौढ झाल्यानंतर प्रथमच तो राजेशाही शय्यागृहाचा अनुभव खऱ्या अर्थानं घेत होता. मनात आलं. काही पिढ्यांचा राजवैभवसंपन्न प्रणय इथं बहरला असेल. उंची अत्तराचा सुवास आणि रेकॉर्डप्लेअरवर चालू असलेली बासरीची धून यांनी धुंद केलेल्या वातावरणात प्रथमच त्याला स्वतःच्या राजवैभवी पार्श्वभूमीची, राजघराण्याची आणि राजपुरुष असण्याची अस्वस्थ करणारी ओळख पटली. परंपरेचा स्पर्श काळजाला भिडला. वाटलं आपले सगळे पूर्वज आजही आपल्याकडे अपेक्षेनं पाहताहेत! इथल्या गूढरम्यतेमागे हेच तर कारण नाही? एक अनामिक भावनेनं तो शहारला...

तेवढ्यात कामिनी आत आली.

तो अलगद उठून दरवाजा बंद करून आला.

तो बाहेर सज्जातल्या झोपाळ्याकडे गेला तशी ती त्याच्या पाठोपाठ आली. तो झोपाळ्यावर बसला आणि तिला बाजूला बसवून घेतलं. मंद प्रकाशात कामिनी जबाबदारीनं थोडीशी ओढल्यासारखी पण तरीही विलक्षण सुंदर दिसत होती.

त्यानं काहीच न बोलता तिला अलगद जवळ ओढली, तसा तिच्या केसातील मोगऱ्याच्या फुलांचा सुवास त्याला प्रफुल्लित करत राहिला.

वळवाच्या पावसानं, तापलेली धरणी एकदम मोहरली. टवटवीत

झाली. हर्षभरित झाली. मधुर मीलनाच्या आकंठ मधुपानाची तृप्ती कामिनीच्या नजरेतून ओसंडली!

बराच वेळ दोघंही काहीच बोलली नाहीत.

कमलेंद्र तिला निरखून पाहात होता. दृष्टी आणि स्पर्शानं मनांचा संवाद रंगत चालला होता.

त्याच्या मनांत आलं, आपल्या अपरोक्ष हिनं साऱ्यांना आपलेपणा दिला. खरं तर आपण हिला आधार द्यायचा. पण आपल्या गैरहजेरीत हिनंच ताता, अम्मा, मधू साऱ्यांना माया दिली, सांभाळलं.

''कामिनी! किती सहन केलंस एकटीनं तू!''

''एकटीनं? छे:! एकटीनं कसं? हा इथे माझ्या हृदयात, नेहमी माझ्याच बरोबर होतास तू!

''पण कामिनी... इथली सारी जबाबदारी...''

''त्याला कुणाचाच इलाज नव्हता... पण तरीही एक विश्वास होता, खात्री होती की आपण दोघंही शरीरानं दूर असलो तरी प्रामाणिकपणानं... उत्कटतेने... निस्वार्थपणे परस्परांवर प्रेम करतोय आणि जगतोय! आत्मीयतेमुळेच की काय कधी खिन्नता नाही आली. वाटायचं आज ना उद्या आपण प्रत्यक्षातही एकत्र येणारच... फक्त नेमकी वेळ समजत नव्हती एवढंच!''

कमलेंद्राला तिचं विलक्षण कौतुक वाटलं. मोठमोठ्या तत्त्वज्ञानी मंडळीना देखील जे पेलणं कठीण जातं ते सत्य ती अगदी सहज आणि स्वानुभवाने बोलत होती! आधी त्याला वाटलं होतं की ती त्याला प्रश्न विचारून भंडावून सोडेल. ''आमची आठवण नव्हती का येत? आपल्या बायको-मुलांकडे परतावंसं वाटलं कसं नाही? आमची उणीव नाही का भासली?'' एक ना दोन. पण तिनं काहीच विचारलं नाही. भारल्याप्रमाणे तो स्वतःच्या शोधात स्वतःला हरवून जगत होता हे जणू काही तिला माहीत होतं! जीवनाची गुंतागुंत सोडवण्यात, तो, स्वतःचं, स्वतःच्या कुटुंबाचं सुख-दुःख, आशा-आकांक्षा सारं काही पणाला लावून वणवण करत होता सुख-दुःखाचे आघात प्रयासानं पचवत होता, हे जणू काही ती जाणत होती! संकुचित सुखाचा हव्यास सोडून विशाल आणि म्हणूनच अंतःसामर्थ्यानं परिपूर्ण असं जीवन जगण्याच्या त्याच्या खडतर प्रवासात जणू काही ती त्याची अदृश्य सहप्रवासी होती. ज्या धैर्यानं, तारुण्यसुलभ ओढीचे आणि मीलनाचे

गुलाबी धुंद क्षण त्यानं आत्मप्रचीतीच्या दिव्य अनुभूतीत विरघळवून टाकले त्याची ती जणू जाणती भागीदार होती!

अगदी अंतःकरणपूर्वक त्यानं तिला स्वतःच्या बाहुपाशात घेतलं....

कामिनीनंही मोठ्या उत्कटतेनं त्याच्या केसातून बोटं फिरवत त्याला प्रतिसाद दिला. मग जणु काही त्याच्या मनातले सारे विचार ओळखून तिनं म्हटलं, ''कमलेंद्र, निःस्वार्थी प्रेमानं व्यक्ती एक तर अजाण बालकाप्रमाणे हट्ट धरते किंवा काहीच मागत नाही... पण तिच्या मनांत शंका नसते. संशय नसतो. हिशेब नसतो. दोषारोप करून न्यायदान करण्याची मिजास नसते. निःस्वार्थी प्रेमात व्यक्ती ज्याप्रमाणे क्षुद्र स्वार्थासाठी जिवलगाला अंतर देत नाही त्याचप्रमाणे उदात्त ध्येयासाठी किंवा स्खलनशीलतेमुळे विरह झाला तरी शिक्षा देऊन अद्दल घडविण्याचा प्रयत्नही करीत नाही. अशा आत्मिक नात्यांमुळेच मानवी संस्कृतीला उदात्त परिमाण मिळतं... तुमच्या पाश्चात्य मित्रांना ... आणि इथल्या त्यांच्या नकलाकारांना तू हे सांगायला हवंस.''

कामिनीच्या त्या बोलण्यानं तर कमलेंद्रला जणू काही अंतर्बाह्य अमृतानुभव प्राप्त झाला. त्याच्या सर्वांगावर रोमांच उठले. ''कामिनी! कामिनी!'' त्याला पुढे बोलवेना... शब्दातीत... कल्पनातीत... कालातीत... परिमाणातीत अशा अमर आनंदानं भरलेले हजारो शाश्वत वसंत आणि त्यातल्या कोकिळांचं अमरसंगीत हृदयात सामावलेले ते दोन जीव .... चिरंतन बंधनात आणि अजरामर मुक्तीच्या आनंदात रममाण झाले.

काळ विलक्षण कौतुकानं स्तब्ध झाला.

■

कमलेंद्र आल्याचा सर्वांनाच जरी आनंद झाला होता तरी वृध्द सत्येंद्र महाराजांना जे विलक्षण समाधान व अप्रूप वाटत होतं ते काही वेगळंच. शुष्क मृतवत झाडाला पालवी फुटावी तशी त्यांच्या निराश, वैफल्यग्रस्त आणि खच्ची झालेल्या मनामध्ये, कमलेंद्राच्या येण्यानं नवी उमेद उत्पन्न झाली होती. जी स्वप्न बेचिराख झाली असं गृहीत धरून ते कशी तरी मनाची समजूत घालीत दिवस ढकलत होते ती स्वप्न पुन्हा एकदा बहरण्याची, प्रत्यक्षात येण्याची सुचिन्ह त्यांना कमलेंद्र आल्यामुळे वाटू लागली होती! सोमनिलयममध्ये आल्याच्या दुसऱ्या दिवसापासून कमलेंद्रानं पिढीजात जमिनी, खंड, कुळे, आर्थिक गुंतवणूक, कर्जे, परतपेड, नोकरांचे पगार, त्यांच्या अडचणी सर्व

व्यवस्था आग्रहावरून मोठ्या उत्साहानं स्वतःकडे घेतली होती. साहजिकच त्यांनीही मनाचा मोठेपणा व समजूतदारपणा दाखवून त्याचा पैसा न घेण्याचा हट्ट सोडून दिला होता. एवढंच नव्हे तर दोघेही आज सकाळी पूर्वीप्रमाणे एकत्र घोड्यावरून रपेट करून आले होते! ते दृश्य पाहून सारे जण, पण विशेषतः रघुराम अत्यंत आनंदी झाला होता. त्यानं व्यंकटेशाचे लाख लाख आभार मानले. धन्याच्या आनंदानं तो तृप्त झाला! सारं वातावरणच मोकळं आणि दडपणरहित झालं होतं. नव्या उत्साहानं भरलं होतं.

कमलेंद्रनं काही गोष्टी प्राधान्यानं करायच्या ठरवल्या होत्या. पहिली गोष्ट म्हणजे त्या परिसरातली शेती सुधारणं आणि दुसरी बाब म्हणजे शेतीला पूरक उद्योग सुरू करणं. राजवाड्याच्या कित्येक एकरांच्या परिसरातच त्याला पुष्कळ काही करून त्या भागातील लोकांना विकासाचं प्रात्यक्षिक दाखविता आलं असतं. त्याशिवाय जंगलांची जोपासना व उपयुक्तता, औषधी वनस्पतींचा शोध, लागवड, उपयोग, पाण्याचं नियोजन, फळझाडांची लागवड आणि त्यावरील प्रक्रिया, आरोग्याची निगा, स्वच्छता, रस्ते, साक्षरता, जमिनीच्या नोंदी, सरकारी कायदे आणि त्यांची अंमलबजावणी, जुन्या रूढी आणि परंपरांमध्ये नव्या परिस्थितीला अनुरूप सुधारणा अशा अनेक बाबी त्याला टप्प्याटप्प्यानं हातात घ्यायचा होत्या. पण ह्या सर्व बाबींमध्ये सुरुवातीपासून ते शेवटपर्यंत त्याला आत्मज्ञानाचा आशय विसरू द्यायचा नव्हता. त्याची खात्री होती की गरिबातला गरीब, अडाण्यातला अडाणी आणि असहायातला असहाय माणूसदेखील अमर्याद आत्मसामर्थ्याचा देदीप्यमान साक्षात्कार अनुभवू शकतो. यासाठी त्याला शाळा, कॉलेज, देवळं, मशिदी, चर्चेस सर्वांचं उत्स्फूर्त सहकार्य उपयुक्त ठरणार होतं आणि ते तसं मिळेल याची त्याला खात्री होती. हे सारं मनात ठेवूनच त्यानं शेती व ग्रामीण उद्योगाच्या क्षेत्रातील तज्ज्ञ अशा दोघा परिचितांना आज राजवाड्यावर निमंत्रित केलं होतं. त्यांना सारी कल्पना दिल्यानंतर राजवाड्याच्या परिसराची पाहणी करण्यासाठी ते तिघे बाहेर पडले होते.

फिरत फिरत ते रघुरामच्या खोलीपाशी यायला आणि तेवढ्यात हनुमंता बाहेर यायला एकच गाठ पडली. हनुमंतानं थोड्या कोरडेपणानंच हसून कमलेंद्रला नमस्कार केला. अगदी लहानपणच्या अगदीच अंधुक स्मृती वगळता हनुमंताला कमलेंद्रबद्दल जी माहिती मिळाली होती ती मुख्यतः

त्याच्या अम्मा-नायनाकडून. त्यांनी त्याचे खूपच गोडवे गायले होते. पण गावातल्या काहीजणांकडून उलटसुलट कुजबूजदेखील त्याला ऐकायला मिळाली होती. त्याच्या स्वतःच्या मनातदेखील आपल्या स्वयंपाकी "युवराज पुत्राबद्दल" एखादी निश्चित भावना नव्हती. किंबहुना परदेशातलं महागडं आणि विलासी जीवन जगून पुन्हा सोमनिलयमच्या कडेकपारीतलं जीवन जगायला आलेला हा माणूस कदाचित काहीतरी लफड्यात अडकल्यामुळे, व्यवसायात फटका बसल्यामुळे किंवा कदाचित लहरी किंवा विक्षिप्त असल्यामुळे परत आला असावा असंच त्याचं मत झालं होतं. पण प्रत्यक्ष अनुभव आल्याशिवाय तो ग्रह पक्का करणं बरोबर नाही असंही त्याला वाटत होतं. कारण महाराज सत्येंद्रांनी त्याला पाठिंबा दिल्यापासून, त्याला आशीर्वाद दिल्यापासून, त्या राजघराण्याबद्दलची त्याची कटुता थोडी कमी झाली होती. पुढे-मागे कष्टकरी-मुक्ती-मोर्चाच्या कार्यात त्यांच्याकडून मदत मिळू शकेल, अशीही आशा त्याला वाटू लागली होती...

हनुमंताच्या पारदर्शक चेहऱ्यावर त्याच्या मनातला संशय, शंका, कुशंका... सारं काही कमलेंद्रला स्पष्टपणे दिसत होतं. त्याला मनात हसू आलं. कमलेंद्रानं मग अगदी सहजपणे हनुमंताला जवळ बोलावलं आणि बरोबर येण्याबद्दल मोठ्या आपुलकीनं विनंती केली.

त्या पहिल्या वाक्यातच हनुमंता विरघळला. क्षणात त्याच्या मनातला दुरावा एकदम नाहीसा झाला. परकेपणा संपला. नकळत नायनांच्या आवडत्या कमलेंद्रगारूबद्दल त्यालाही ओढ वाढू लागली. पटकन घरात जाऊन तो पायात चप्पल घालून आला आणि त्या तिघांना आवश्यक तो बारीकसारीक तपशील सांगत त्यांच्याबरोबर निघाला. संपूर्ण परिसराची व्यवस्थित पाहणी करून झाल्यानंतर ते दोघे तज्ज्ञ फारच गडबडीत असल्यानं काहीतरी अल्पोपाहार करण्याबद्दल विनंती करणाऱ्या कमलेंद्रांची क्षमा मागून एक-दोन दिवसात काही उत्तम योजना सुचवण्याचं कबूल करून निघून गेले.

ते गेल्यानंतर तो हनुमंताला घेऊन त्या पडक्या बराकींकडे आला व एका झाडाच्या बुंध्याला टेकून उभा राहत त्यानं हनुमंताला स्वतःच्या मनातल्या योजना थोडक्यात सांगितल्या.

त्या योजना ऐकताना हनुमंताला सारखं जाणवत होतं त्याच्या दृष्टीनं अत्यंत महत्त्वाचा असलेला अन्यायाविरुद्ध संघर्ष, त्या योजनांमध्ये

पासंगालाही नव्हता! शिवाय कमलेंद्रगारू इतक्या लवकर एवढ्या मोकळेपणानं बोलत असले तरी पण त्यावर विश्वास किती ठेवायचा... त्यांच्या किती निकट जायचं... हे त्याला कळत नव्हतं. काहीही झालं तरी एकट्याबद्दल आत्मीयता किंवा आदर वाटणं वेगळं आणि एकाद्याबरोबर सारी गुपितं उघड करून आयुष्यभर काम करणं, चळवळ करणं वेगळं! पुन्हा त्याच्या मनात कमलेंद्रगारूबद्दल एक प्रकारची साशंकता निर्माण झाली. मनानं त्यानं निर्धार केला की काही झालं तरी हा केवळ राजा आहे म्हणून याच्या आहारी जायचं नाही. कष्टकरी मुक्ती मोर्चाची ध्येयधोरणं बदलायची नाहीत! त्याला असंही जाणवलं की महाराज सत्येंद्र जे विधायक कार्याबद्दल सांगत होते यापेक्षा त्याची मजल नाही. ह्याच्याकडे पैसे व जोम आहे एवढंच! मग मनातले विचार मनात ठेवून थोडं हसून त्यानं म्हटलं, "कमलेंद्रगारू तुमच्या योजना फार चांगल्या आहेत. पण आम्हा गरिबांकडून त्यांना काय मदत होणार? तुम्ही जरूर तुम्हाला योग्य वाटतं ते करा. आमच्या मनःपूर्वक शुभेच्छा तुमच्या पाठीशी कायम असतील."

कमलेंद्राच्या लगेच लक्षात आलं की हनुमंता परस्परांदरम्यान 'सुरक्षित अंतर' राखून बोलतोय. मग अगदी थंडपणानं आणि निर्विकारपणे त्यानं म्हटलं, "हनुमंता, तुला हे सारं मी आपलेपणानं सांगतोय ते तुझ्या शुभेच्छा मला मिळाव्यात म्हणून नव्हे. तुझ्या मदतीची तर मला अजिबात अपेक्षा नाही. सरतेशेवटी माझ्या योजनात तुला गुंतवून तुझ्याकडून काही फायदा उकळण्याइतपत मी दरिद्री नाही आणि तू महान नाहीस. कळलं?"

त्या अचानक धक्क्यानं हनुमंता चरकला. नकळत डोक्यात शिरलेला 'क्रांतिकारक' उद्धटपणा खाली आला. त्यानं थातुरमातुर स्पष्टीकरण द्यायला सुरुवात केली.

कमलेंद्रानं पुन्हा तशाच थंडपणानं म्हटलं, "माझ्या योजना सांगितल्यावर तुझ्याकडून अगदी साधी अपेक्षा आहे. 'पटतंय', 'पटत नाही' किंवा 'विचार करतो' यातलं एक उत्तर, प्रांजळपणा. तुझा कष्टकरी मुक्ती मोर्चा त्याचं कार्य, उद्देश आणि रेड्डीच्या हत्येमध्ये तुम्हाला गोवण्याचा झालेला प्रयत्न हे सारं मला माहीत आहे."

ते ऐकून हनुमंता उडालाच. त्याच्या मनात आलं की राजेमंडळी खरोखर पाताळयंत्री असतात! बारीकसारीक तपशील कसा गोळा करतात,

लक्षात ठेवतात आणि त्याचा उपयोग करून दुसऱ्यावर मात करतात! त्यानं मग मनातला संशय, कटुता न लपवता थोड्या मोकळेपणानं म्हटलं, "ठीक आहे तुम्ही एवढा आग्रहच धरलाय तर प्रांजळपणे सांगतो... तुमची योजना तुम्ही राबवा... आम्हाला त्याबद्दल सोयरसुतक काही नाही. आम्ही अन्यायाविरुद्धचा आमचा संघर्ष चालू ठेवू. त्यात आमचं जे होईल ते होऊ दे. पर्वा नाही!"

"दॅट्स बेटर!" एकदम खुलून कमलेंद्रानं पुढे म्हटलं, "हनुमंता... आता किती मोकळेपणानं बोललास!" पण एक लक्षात घे. तुमच्या छोट्याशा उत्साही संघटनेबद्दल मला आस्था आहे, त्याचं काय? अन्यायाविरुद्ध लढण्यात मलाही स्वारस्य आहे. त्याचं काय की तुम्ही क्रांतिकारक लोकांनी कुणीही आस्था, आत्मीयता दाखवली तर त्याला निरुत्साही करायचा, नाउमेद करायचा, तुम्हाला मदत करण्यापासून परावृत्त करण्याचा चंगच बांधलाय?"

हनुमंताच्या अल्प अनुभवविश्वाला असले प्रतिवाद नवीन होते. पण प्रामाणिकपणापोटी येणारा रांगडा धीटपणा त्याच्यापाशी होता. क्षणभर विचार करून त्यानं म्हटलं, "कमलेंद्रगारू मला तुमच्याबद्दल आदर आहे. पण तुमच्या असल्या युक्तिवादानं मी हार मानणार नाही. तुम्हीच सांगा, तुमची-आमची बरोबरी कशी होईल? तुमच्या-आमच्या तारा कशा जुळतील? कुठे तुम्ही आणि कुठे आम्ही? सर्वस्व पणाला लावून लढू पाहणाऱ्या आमच्या संघटनेशी तुमचं नातं कसं जुळेल? उलट तुम्ही मोठे लोक आमच्या संघटनेमध्ये आलात तर संघटनेचे तीनतेरा वाजतील. सर्व ध्येय-धोरणं उलटी-पालटी होतील. म्हणून म्हणतो की तुम्ही तुमचं काम करा आम्ही आमचं करतो. ह्यात तुम्हाला दूर लोटण्याचा प्रश्नच नाही!"

हनुमंताचं बोलणं कमलेंद्रला मनापासून आवडलं. एवढं प्रांजळपणानं बोलल्यावर मात्र त्यानं अगदी सहज सुरात प्रेमानं हनुमंताला स्वतःची पार्श्वभूमी थोडक्यात समजावून सांगितली. कोट्यवधी रुपयांचा व्यवसाय-नोकरी सोडून सोमनिलयमला परतण्याचं कारण सांगितलं. मग थोडं थांबून त्यानं म्हटलं, "हनुमंता तुझी भीती तर्कसंगत असली तरी माझ्या बाबतीत निराधार आहे! उलटपक्षी तुमच्या संघटनेला काही विकृत शक्ती कब्जात घेण्याचा प्रयत्न करीत आहेत... तसं न होता... तुमचं कार्य व्यापक आणि

स्थायी स्वरूपाचं व्हावं यासाठी प्रयत्न करणं हे मी माझं कर्तव्य समजतो. सर्वस्व सोडण्याबद्दल तू उल्लेख केलास म्हणून हे सर्व सांगावं लागलं. प्रत्यक्षात मी जे करतोय ते स्वार्थासाठीच करतोय! फक्त हा स्वार्थ इतरांना लुटणारा नाही... समृद्ध करणारा आहे, एवढं मात्र नक्की!''

कमलेंद्राच्या त्या सविस्तर स्पष्टीकरणानं, ते लक्षपूर्वक ऐकणाऱ्या हनुमंताला एकाच वेळी, स्वतःचे पूर्वग्रह ढासळून पडल्यानं वरमल्यासारखं झालं, कष्टकरी मुक्ती मोर्चासमोरच्या प्रचंड आव्हानाची आणि ध्येयाची जाणीव होऊन आपण खुजे असल्यासारखं वाटलं. त्याचबरोबर त्याच्या संघटनेला असलेल्या धोक्याच्या जाणिवेनं काहीशी भीतीही वाटली. पण खोलवर कुठेतरी कमलेंद्राच्या भारदस्त व्यक्तिमत्त्वाच्या आधारानं उभारीही आली. उत्साह वाटला. त्या मिश्र भावनांनी हललेला हनुमंता म्हणाला, ''कमलेंद्रगारू तुमची ही सारी पार्श्वभूमी मला माहीत नव्हती. पण मला वाटतं, तुम्ही मला समजून घेऊ शकाल!''

'' हनुमंता, मी जर तुझ्या जागी असतो तर कदाचित तुझ्यासारखाच वागलो असतो. एवढंच काय,ही पार्श्वभूमी जाणूनदेखील मी लगेच विश्वास ठेवलाच असता असं नाही. कारण भविष्यात कोण कसा वागेल हे कुठे सांगता येतं? असो. व्यक्ती म्हणून आपण सारे जण सामान्य आहोत, दोषपूर्ण आहोत पण ज्या स्वत्वाचं आकलन आणि आविष्कार आपल्याला करायचा आहे त्याची ताकद जगातल्या सर्वाधिक शक्तिवान व जुलमी शक्तींना भुईसपाट करू शकेल एवढी आहे. तुमचे उद्देश, तुमची स्वप्नं डावलण्यासाठी मुळीच नव्हे तर त्यांची अधिकाधिक पूर्ती यशस्वीपणे करण्यासाठी आपल्याला एकत्र यायचं आहे! कळलं? अगदी सर्वस्व पणाला लावून!''

शेवटच्या शब्दांवर जोर देऊन कमलेंद्र हसला तेव्हा हनुमंताला देखील हसू आलं. फक्त त्याला कमलेंद्रानं ज्या शक्तीचा उल्लेख केला त्याबद्दल काही बोध झाला नाही. त्याचप्रमाणे कष्टकरी मुक्ती मोर्चाची ध्येय, सद्यः पद्धतीनीं यशस्वी न होता, कमलेंद्रानं उल्लेखिलेल्या शक्तीमुळे अधिक प्रभावीपणे कशी साध्य होतील याचाही बोध झाला नाही. पण त्यानं तसं जेव्हा सांगितलं तेव्हा कमलेंद्रानं त्याला म्हटलं, ''हनुमंता, तुझी शंका रास्त आहे. मी एवढंच म्हणेन की प्रयत्न करून जर या शक्तीची अनुभूती आली नाही तर तुम्हा कुणालाही मी कोणताही आग्रह करणार नाही.''

हनुमंताच्या मनातली संशयाची जाळी अर्थातच अजून संपली नव्हती. कमलेंद्रांलाही घिसाडघाईत रस नव्हता. त्याला माहीत होतं की जे हजारो काथ्याकूटांनी शक्य होत नाही ते एका प्रत्यक्ष प्रमाणानं, प्रत्यक्ष प्रचीतीनं साध्य होतं! त्यानं अगदी सहजपणानं विषय बदलून हनुमंताशी कॉलेज, शिक्षण, अध्यापक, आवडते छंद वगैरेबद्दल गप्पा मारल्या.

उन्हं वर आली तशी दोघे परतायला निघाले. दारात उभ्या रघुराम-सीताबाईंच्या दृष्टीला ते दोघे पडले. रघुरामाच्या डोळ्यांपुढे बालपणीच्या छोट्या कमलेंद्रगारूची छबी उभी राहिली! त्याचे डोळे कौतुक आणि प्रेमानं भरले. ''किती भक्कम वडाच्या झाडाची सावली आहे हनुमंताला,'' तो सीताबाईच्या कानात पुटपुटला.

■

एकीकडे हनुमंता आणि कमलेंद्रामधली जवळीक वाढत चालली होती तर दुसरीकडे ''कष्टकरी मुक्ती मोर्चा'' चा सर्वेसर्वा बनलेला फ्रान्सिस चिडून गेला होता. त्यानं मोठ्या हुशारीनं ''कष्टकरी मुक्ती मोर्चा'' ला डावपेच अन् प्रसंगी हिंसेचंही महत्त्व पटवलं होतं. तर दुसरीकडे हनुमंता सुब्बय्या वगैरे बरेचजण कमलेंद्राच्या मागे लागले होते. सारी संघटनाच हातून निसटण्याची वेळ आली होती.

फ्रान्सिसच्या मते लोकशाही, निवडणुका, अहिंसा, असल्या बाबींना काही महत्त्व नव्हतं. त्याची खात्री होती की भांडवलदारांची सत्ता सर्व पातळ्यांवर भ्रष्टाचार करून कोणतीही सनदशीर चळवळ भ्रष्ट करू शकते. साऱ्या संस्था भ्रष्ट करू शकते. त्यामुळे त्याच्या दृष्टीनं सशस्त्र संघर्ष अत्यावश्यक होता. पण भांडवलदारी सत्ता प्रचंड असल्यामुळे प्रत्यक्ष संघर्ष अशक्य होता. त्यामुळे गुप्त संघटना आणि गनिमी कावा यांना पर्याय नव्हता. यात धोका होता. पण मर्दुमकी होती. त्रास होता. पण यशाची खात्री होती.

साहजिकच सोमनिलयम संस्थानचा वारस कमलेंद्र जेव्हा गावात येऊन कष्टकरी मुक्ती मोर्चाच्या तरुणावर प्रभाव पाडू लागला तेव्हा तो संतापला होता. अहिंसा, प्रेम, सत्य, आत्मा, पुनर्जन्म असल्या भाकडकथांमध्ये संघटना आता भरकटून जाणार हे त्याला स्पष्ट दिसू लागलं होतं.

फ्रान्सिस सोमनिलयममध्ये पोचला तेव्हा संध्याकाळ झाली होती. टॅक्सी कृष्णा लॉजपुढे थांबवून तो खाली उतरला.



कृष्णा लॉजच्या स्वागतकक्षात एक मोठा आरसा होता. सहज त्याचं स्वत:च्या छबीकडे लक्ष गेलं. आज प्रथमच त्याला स्वत:चं व्यक्तित्व गूढ वाटलं. त्याचं ते रूप त्यालाच थोडंसं खलनायकी वाटलं!

सरळ लांब नाक, खालचा ओठ थोडासा पुढे आलेला, अधून-मधून पिंगट झालेल्या दाढीमिशा आणि तीक्ष्ण नजर.

कृष्णा लॉजच्या पायऱ्या चढू लागला तेव्हा फ्रान्सिसच्या डोक्यात पूनमचाच विचार होता.

कुलूप काढून तो खोलीत आला. खोली तशी सर्वसामान्य असली तरी त्याला हव्या त्या साऱ्या सोयी तिथे होत्या. जे लागेल ते मिळू शकत

होतं. तो तिथल्या जुनाट कोचावर बसला. पाय टी-पॉयवर टाकून त्यानं सिगरेट पेटवली.

संध्याकाळ झाली होती. रुणुझुणू वाजणाऱ्या गुरांच्या गळ्यांतील घंटानादाच्या साथीनं सिनेसंगीत ऐकू येऊ लागलं. लाऊडस्पीकरवरून येणाऱ्या त्या संगीताचा अर्थ साधा होता. सत्यनारायण, सभा, लग्न वगैरेपैकी काहीतरी! हळूहळू अंधार पडू लागला. पण तो विचारात गढल्यामुळे उठला नाही. पुन्हा सिगरेट पेटवून धुराची वलयं काढत तसाच बसून राहिला. पूनम येऊन काय काय माहिती देते याबद्दल त्याच्या मनात उत्सुकता होती.

अचानक त्यानं काहीतरी मनाशी ठरवलं आणि झटक्यातच हातातली सिगरेट ॲशट्रेमध्ये चिरडली. त्याचवेळी दरवाजावरची बेल वाजली.

त्यानं ओळखलं की पूनमच आहे. उठून त्यानं दरवाजा उघडला. त्याचा अंदाज बरोबर होता. पूनमच होती. तिला आत घेऊन त्यानं दरवाजाला आतून कडी लावली.

आल्या आल्या त्याच्या बाजूला खुर्चीवर बसून तिनं रिपोर्ट द्यायला सुरुवात केली.

तिचं बोलणं लक्षपूर्वक ऐकणाऱ्या फ्रान्सिसच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून तिनं सहज ओळखलं की तिच्या रिपोर्टमुळे त्याला हनुमंताचा खूप राग आलाय.

मोठ्या धूर्तपणे फ्रान्सिसनं हनुमंता आणि सुब्बय्यासकट अनेकांचा विश्वास प्राप्त करून घेतला होता आणि त्याचवेळी त्या दोघांची वर्गमैत्रीण असलेल्या पूनमचा विश्वास प्राप्त करून त्या दोघांवर पाळत ठेवण्याचं काम तिच्याकडे सोपवलं होतं. हनुमंता आणि सुब्बय्या, समविचारी आणि सुस्वभावी मैत्रीण म्हणून तिच्याशी मोकळेपणानं बोलत. पण ते सारं ती आपल्या पाठीमागे गुपचूप जाऊन जसंच्या तसं फ्रान्सिसला सांगते हे त्यांना माहीत नव्हतं! किंबहुना तसं कुणी सांगितलं असतं तरीदेखील त्यांचा त्यावर विश्वास बसला नसता. त्याचप्रमाणे आणखी मौजेची बाब अशी की, फ्रान्सिस आणि हनुमंता किंवा फ्रान्सिस व सुब्बय्या यांचे संबंध कसे आहेत हे तिसऱ्या कुणालाच कळत नसे.

"इडियट्स!" तिचं बोलणं संपल्यावर एकदम फ्रान्सिस गुरगुरला.

त्याचा तो कडवटपणा तिला तेवढासा कळलाही नाही आणि रुचलाही

नाही. पण त्याची विद्वत्ता आणि त्याची बुद्धी यामुळे त्याचं सारं काही तिला मान्य होत असे.

"याचा अर्थ हनुमंता त्या स्वयंपाकी महाराजाच्या आहारी चाललाय!" फ्रान्सिस स्वत:शीच पुटपुटला. "ही अंतर्मनाची गुलामी आहे. मेंटल करप्शन आहे. क्रांतीची धार असल्या वृत्तीमुळेच बोथट होते. हनुमंताला कळायला हवं की ध्येयासमोर सगळ्या भाव-भावनांना मूठमाती द्यावी लागते. क्रांतिकाराला असल्या बुद्धिभ्रष्टतेपासून नेहमी सावध राहावं लागतं, कारण सज्जनपणाचाच हे बडे लोक बरोबर लाभ उठवतात आणि क्रांतीच्या मार्गात विघ्न उत्पन्न करतात. संघटनेत फाटाफूट होते..." त्यानं प्रत्येक शब्दावर जोर देत पूनमला म्हटलं.

आता पूनमच्या लक्षात आलं की फ्रान्सिस का चिडला. तिला त्याचं म्हणणं पटलं. हनुमंतानं कमलेंद्र नायडूचा नाद सोडून फ्रान्सिसशी एकनिष्ठ राहायला हवं असं मनापासून वाटू लागलं. कष्टकरी मुक्ती मोर्चा हनुमंतानं स्थापन केला तरी त्याचा एवढा गवगवा फ्रान्सिसमुळे झाला होता हे तिला चांगलंच माहिती होतं. अर्थात कुणालाही कळू न देता फ्रान्सिसनं रेड्डीची हत्या करवून कष्टकरी मुक्ती मोर्चाकडे त्या हत्येची जबाबदारी घेतली होती ह्याची तिला कल्पना नव्हती. तिलाच नव्हे तर कुणालाच त्याबद्दल माहिती नव्हती. पण फ्रान्सिसनं पटवून दिल्यामुळे रेड्डीच्या हत्येची जबाबदारी कष्टकरी मुक्ती मोर्चाकडे घ्यायला सारे तयार झाले होते आणि त्यामुळे कष्टकरी मुक्ती मोर्चाचा वचक निर्माण झाला हे इतरांप्रमाणे तिलाही माहीत असल्यानं फ्रान्सिसबद्दल इतरांसारखाच तिलाही खूप आदर होता.

"आता काय करायचं फ्रान्सिस?" तिनं भोळेपणानं विचारलं.

"ते तुला काय करायचंय?" त्यानं एकदम तिला फटकारलं. एवढ्या युक्ती-प्रयुक्तीनं हातात आलेली संघटना कमलेंद्र नायडूमुळे हातातून निसटत असल्यामुळे तो बेचैन झाला होता. चिडला होता. पण लगेच तिची उपयुक्तता ध्यानात येऊन तो एकदम गोडीनं म्हणाला," संघटनेची कामं संपूर्ण विश्वासानं, एकनिष्ठतेनं आणि समर्पण भावनेनं करावी लागतात पूनम! तुझं काम त्यांच्यावर लक्ष ठेवून मला रिपोर्ट करण्याचं. ते तू उत्तम प्रकारे करतेसच. तसंच चालू ठेव म्हणजे झालं!"

"ऑफ कोर्स. ते मी करीनच" भाबड्या उत्साहानं उत्तेजितं होऊन तिनं

म्हटलं.

"दॅट्स बेटर! संघटनेसाठी वाट्टेल ते करायची तयारी हवी. तुम्हा मुलींचं संघटनेत फार महत्त्व आहे!" फ्रान्सिसनं तिला आणखी चढवलं.

"माझ्यासारख्या आणखीही मुली आहेत? कोण कोण आहेत?"

"पूनम, तुझ्या-माझ्यासारखे आणखी कोण आहेत, किती आहेत, याबद्दल विचार करायचा नाही."

यावेळी मात्र पूनमला राहावलं नाही. तिनं थोड्या नाराजीनं विचारलं, "पण फ्रान्सिस एवढी गुप्तता कशासाठी?"

"पूनम, पुन्हा पुन्हा किती वेळा सांगू? झाकली मूठ सव्वा लाखाची ह्या तत्त्वानुसार संघटनेची ताकद ठरते आणि वाढते. एक लक्षात ठेव 'कष्टकरी मुक्ती मोर्चा' ही चार पोरांचं टोळकं नाही. मी आहे तिथे बुद्धी, धोरण, शक्ती सर्व काही असतं! क्रांतीसाठी लागणारं सारं काही संघटनेकडे आहे. पण त्याचा तपशील सर्वांना सांगणं संघटनेच्या सर्वनाशाला निमंत्रण देण्यासारखं आहे. संघटनेत कुणीही विश्वासघातकी निघू शकतो... त्याला संघटनेची सारी माहिती असली, तर संघटना संपायला कितीसा वेळ लागेल?"

पूनमला फ्रान्सिसचं म्हणणं पटलं. पण तिला असंही वाटलं की, असे कितीसे लोक विश्वासघातकी असतात? पण आपल्यापेक्षा फ्रान्सिसची समज अधिक आहे, अशी मनाची समजूत घालून ती गप्प राहिली.

फ्रान्सिसनं मग पुन्हा केव्हा भेटायचं हे सांगून तिला निरोप दिला.

■

फ्रान्सिसनं सांगितल्याप्रमाणे पूनमला आज हनुमंताला भेटून सारी बित्तंबातमी काढायची होती.आकर्षक पंजाबी ड्रेस घालून ती कॉलेजात आली होती. मुळातच सुंदर असल्यामुळे तिचं व्यक्तिमत्त्व आणखीनच खुलून दिसत होतं. कॉलेजात येताच ती कॅन्टीनकडे आली.

कॉलेज कॅन्टीनमध्ये आज फारशी गर्दी नव्हती. हनुमंता कोपऱ्यातल्या एका खुर्चीवर बसला. त्याचं लक्ष पलीकडच्या टेबलाभोवती बसलेल्या मुलींच्या घोळक्याकडे गेलं. त्यातल्या तिघी-चौघी त्याच्याकडेच बघत होत्या. त्याला उगीच संकोचल्यासारखं झालं.

तेवढ्यात काही कारणानं त्या जोरानं खिदळल्या.

ते पाहून हनुमंताला आणखीनच शरमल्यासारखं झालं. आपल्या फाटक्या कॉलरकडे पाहून त्या हसताहेत की आणखी कशाला? असा प्रश्न पडून त्याला खचल्यासारखं झालं. कुणी समोरासमोर बोललं असतं तर त्यानं तात्काळ प्रत्युत्तर दिलं असतं, पण असल्या टवाळीचा सामना कसा करावा हे त्याला समजेना.

वास्तविक त्या मुली नेहमीच टिंगलटवाळी करीत. इतर विद्यार्थी-विद्यार्थिनीच नव्हे तर प्राध्यापक मंडळीदेखील त्यांच्या कचाट्यातून सुटत नसत! पण ते सारेजण त्याबद्दल फारसा गांभीर्यानं विचार करीत नसत. उलट पुष्कळदा मस्करीमध्येच जुगलबंदी व्हायची! सर्वजण मिळून मजा लुटायचे!

पण हनुमंताला आजकाल हसता येत नसे. तो हसणं विसरला होता. त्याला चेष्टा करता येत नसे. विनोद करता येत नसे. तो ते सारं कुठेतरी हरवून बसला होता. कुणी थट्टा-मस्करी केली तर ती समजून त्यावर हजरजबाबीपणानं चपखल उत्तर देण्याचा खिलाडूपणा त्याच्या मनातून हद्दपार झाला होता. काहीही घडलं, कुणीही कसही वागलं किंवा कुणीही काहीही बोललं तरी हल्ली त्याला लगेच क्रांतीचा संदर्भ आठवायचा! जे घडतंय त्याच्यामागील वर्गीय संदर्भ आठवायचा. लगेच मनात उलट-सुलट प्रमेयांची मांडणी होऊन काही अनुमानं निघायची.

आज थोडा विचार करताच त्याला स्पष्टपणे वाटलं की त्या मुली भांडवलदारी संस्कृतीच्या भागीदार आहेत! त्या शोषणानं भरलेल्या संस्कृतीच्या मूर्ख पाईक आहेत. स्थितीवादी आहेत. त्यांची मनं शोषणकर्त्यांच्या संस्कृतीनं भ्रष्ट केलेली आहेत. त्याचप्रमाणे त्या मुली मध्यमवर्गीय असल्यामुळे त्यांना क्रांतिकारक विचारांचं वावडं आहे. त्या विचारांनी त्याच्यातला क्रांतिकारक जागा झाला आणि वळवळणाऱ्या किड्यांकडे बघावं तशा नजरेनें त्या मुलींकडे दृष्टिक्षेप टाकून तो चहा-पाणी वगैरेनीं माखलेलं टेबलावरच पेपरचं पान चाळत वेटरची वाट बघत बसला.

तेवढ्यात त्याच्या टेबलापाशी पूनम आली. पूनम सुंदर होती तशीच सहृदय आणि लाघवी होती, त्यामुळे हनुमंताला ती आवडायची. मुख्य म्हणजे इतरांप्रमाणे ती बुर्झ्वा म्हणजेच भांडवलदारी विचारांची नव्हती. तिचा दृष्टिकोन क्रांतिकारक होता.

"काय हनुमंता, चहा पिणार का?"

" हो, पण मी मागवलाय अगोदरच..." तो थोडा चाचरत म्हणाला. खिशात जादा पैसे नसल्यानं तिच्यासाठी चहा मागवणंही शक्य नव्हतं, अन् चहा घेणार असल्यानं, नाही म्हणणंही शक्य नव्हतं... त्याला स्त्री-दाक्षिण्य दाखवता येणार नव्हतं.

पण त्याची अडचण अचूक हेरूनच की काय तिनं म्हटलं, "मागवला आहेस ना? मग बरंच आहे. मला अर्धाच कप घ्यायचा आहे....तुला?"

"हो... हो चालेल... मलाही अर्धा कपच पुरे,"

दोघांचा चहा चालला असताना पूनमनं त्याच्याकडून बऱ्याच गोष्टी काढून घेतल्या. विशेषत: कमलेंद्रबद्दलची माहिती, कमलेंद्रचे विचार, त्याचा हेतू वगैरे. मग अभ्यास, मित्र वगैरे इतर बाबींवर गप्पा मारल्या. मग सहज स्वरात म्हटलं, "खर सांगू हनुमंता, तुझ्या ह्या रॉयल स्वयंपाकी गुरुपेक्षा तूच जास्त हुशार आहेस. कष्टकरी मुक्ती मोर्चाला तुझ्या नेतृत्वाचा अधिक फायदा होईल..."

हनुमंता तिच्या स्तुतीनं खूश झाला. पण त्याला माहीत होतं की, कष्टकरी मुक्ती मोर्चाचं नेतृत्व फ्रान्सिसकडे बहाल केलंय आपण. तो स्वत: किंवा कमलेंद्रगारू यापैकी कुणीही नेतृत्व देण्याचा प्रश्नच नव्हता. पण संघटनेबद्दल त्याला जास्त बोलायचं नव्हतं. त्यानं थोडं हसत म्हटलं, माहीत आहे ना, आपला नेता फ्रान्सिस आहे? बाकी काही भासलं तरी!"

पूनमला ते ऐकून आश्चर्य वाटलं. मनातं आलं, हा फारच बेरकी आहे! फ्रान्सिसकडे नेतृत्व पण जास्तीत जास्त प्रशंसा मात्र कमलेंद्रची. की आपण पाळत ठेवतो हे माहीत झाल्यामुळे हा आपल्याशी खोटं बोलतोय?

"पण पूनम तू पण एकदा भेटायला ये ना कमलेंद्रगारूंना... सहज म्हणून... ही इज इंटरेस्टिंग पर्सन...तुलाही आवडतील ते..."

"ह्यॅं: ! आता आवडून उपयोग काय?"

"म्हणजे?"

"अरे आपल्याला आता एकच ध्येय... एकच स्वप्नं... संघटना आणि क्रांती... बाकी असेना कुणी चांगला कितीही?"नकळत ती फ्रान्सिसची बाजू मांडत होती. हनुमंत गंभीर झाला. पूनमला कमलेंद्रगारूचा मोठेपणा कळावा. असं त्याला वाटत होतं. पण तिचा दृष्टिकोन अगदी साचेबंद दिसत होता. मग त्यानं म्हटलं, "चांगल्या माणसांना भेटल्यानं क्रांतीचा हेतू नाहीसा होतो

का?''

''ही इज अ फ्युडल लॉर्ड! ''तिच्या स्वरात उघड कटुता होती.

तो अस्वस्थ झाला. नकळत पूनमनं तिच्या या बोलण्यानं फ्रान्सिसच्या हेतूचा पराभव केला होता. कारण त्या बोलण्यामुळे हनुमंतानं अधिकच ठामपणे ठरवलं की कमलेंद्रगारूंना लगेच भेटायचं आणि भेटत राहायचं... कारण चांगलं ते बाजूला पडलं, चांगलं तेच डावललं, तर मग संघटना आणि क्रांतीला आशय तो काय राहिला? दोघांतला संवाद अशा तऱ्हेने संपल्यावर हनुमंता आणि पूनम दोघंहीं उठली.

पूनम लेक्चरला गेली. हनुमंता घरी निघाला. त्याच्या डोक्यांत फ्रान्सिस आणि कमलेंद्रगारू यांचेच विचार चालले होते. विचार म्हणण्यापेक्षा विचारांच्या कोलाहलातच होता तो. हनुमंताची मनस्थिती आजकाल द्विधा झाली होती. फ्रान्सिस आणि कमलेंद्रगारू यांच्या दरम्यान त्याच्या मनाची रस्सीखेच होत होती! तो घरी पोचला तेव्हा त्याची अम्मा सीताबाई गोवऱ्या थापीत होती! घोड्यांचं काम आटपून आलेला रघुराम तुळशीच्या मुळातच वाढलेले तण काढून टाकत होता. आज हनुमंता एवढ्या लवकर परतलेला पाहून त्यांना आश्चर्य वाटलं.

''काय रे? बरं वाटत नाही? लवकर कसा परतलास? की ...?''

''नाही ग अम्मा .... आज खूपच कंटाळा आला. माझी तयारीपण झालीय पुढच्या लेक्चर्सची म्हणून आलो परत...''

''ते तुझं तुलाच कळतं. आम्हाला नाही. तूच काय ते समजून - उमजून कर म्हणजे झालं!'' रघुरामनं मान वर न करता म्हटलं.

''हो, हो, काळजी करू नका... वह्या आत ठेवून बाहेर आलेला हनुमंता पुढे म्हणाला, ''मी कमलेंद्रगारूंकडे चाललोय....''

''बरं आहे... जा'' सीताबाई म्हणाली.

''होय! त्यांच्याकडून चार चांगल्या गोष्टी शिकायला मिळतील.'' रघूरामनं पुन्हा मान वर न करता म्हटलं.

हनुमंता मनातल्या मनात हसला.

पण त्याच्या मनातले विचार जाणून रघुरामनं म्हटलं, ''देव आणि राजा यांच्यावर श्रध्दा ठेवायची हे बापजाद्यांकडून शिकलो आम्ही. त्यांना का? आणि कसं? हे विचारायची सोय नव्हती. फक्त जी रीत आहे ती पाळायची.

बस्स! दैवी संकटात देवाकडे आणि बाकी अडचणीत राजाकडे धाव घ्यायची एवढं आम्हाला कळतं... राजा म्हणजे पृथ्वीवरचा देव!''

हनुमंताने ते ऐकून न ऐकल्यासारखं केलं. त्याला ते पटत नव्हतंच, पण उगीच वितंडवाद घालण्यात रसही नव्हता. पण तरीही आपल्या अडाणी नायनाला आपल्या मनातले विचार कसे काय कळतात याचं त्याला कुतूहल आणि कौतुक मात्र वाटलं!

■

हनुमंता राजवाड्यात आला तर समोरच कमलेंद्रगारू मधूबरोबर रिंगनं खेळत असलेले दिसले. ''डॅडी तुमचं पोट कसं हलतंय पहा''... ही... ही.... ही... करून हसत मधू म्हणाली.

त्यांचा खेळ बघत बाजूला उभ्या असलेल्या राणीअक्कांना - कामिनीदेवींनाही हसू आवरेना. त्यांच्या रंगात बेरंग नको म्हणून हनुमंता थोडा वेळ आडोशाला थांबला. पण तेवढ्यात त्यांचा खेळ आटोपला. सर्वजण बागेतल्या खुर्च्यांवर बसले तसा हनुमंता पुढे झाला.

त्यावेळी हनुमंताला आलेला पाहून कमलेंद्रला आश्चर्य वाटलं. ''काय रे कॉलेज नाही का?''

हनुमंता एकदम ओशाळला. पण मग त्याने घडलेली हकीकत सांगितली. कमलेंद्र उठून आत गेला. कपडे बदलून येऊन त्यानं, हनुमंताला, गावात फेरफटका मारून येण्याची कल्पना सांगितली. हनुमंताला तेच हवं होतं. त्याच्या मनातली अस्वस्थता घालवण्यासाठी त्याला कमलेंद्रगारूंचा सहवास हवा होता. प्रन्सिस आणि कमलेंद्रगारू या दोघांबद्दल त्याच्या मनात तुलना चालू होती. एका बाजूला त्याच्या सळसळत्या रक्ताला आव्हान देणारे आणि आवाहन करणारे त्याच्या स्वभावाशी जुळणारे फ्रान्सिसचे ज्वालाग्राही विचार होते, तर दुसरीकडे त्याच्या कल्पनाशक्तीला आणि अंतरंगाना विस्मयचकित करणारं कमलेंद्रगारूंचे त्या दिवशीचं हितगुज होतं. एका बाजूला संघटनेची शास्त्रशुध्द आणि विलक्षण बेरकीपणे सूत्र हाताळणारा फ्रान्सिस होता तर दुसरीकडे मन प्रगल्भ करणारी कमलेंद्रगारूंची काव्यात्म प्रतिभा होती. फ्रान्सिसचं म्हणणं अगदी तर्कशुध्द वाटत होतं आणि त्यातली वास्तवता पटत होती तर दुसरीकडे कमलेंद्रगारूंची विशाल आणि विशुध्द दृष्टी होती. ती हलकं करणारी, काळजाला हात घालणारी, हृदयाला समाधान

देणारी होती खरी पण बुध्दीला साशंक करणारी होती. कमलेंद्रगारूंचं सारंच त्याला एकीकडे उत्कट आणि उदात्त वाटत होतं पण त्याचबरोबर दुसऱ्या बाजूला वास्तवापासून दूर जाणारं वाटत होतं. पण या घडीला कमलेंद्रगारूंबरोबर राहावं-बोलावं असं त्याला वाटत होतं.

गावात इतक्या वर्षांनी परतलेल्या कमलेंद्रगारूंना पायी हिंडताना पाहून पुष्कळांच्या नजरा पुन्हा पुन्हा त्यांच्याकडे वळत होत्या. कमलेंद्रही परिचितांना ओळख देत, हनुमंताकडून गेल्या काही वर्षातली राजकीय सामाजिक पार्श्वभूमी समजावून घेत अन् त्याचवेळी बारीकसारीक बाबींचं निरीक्षण करीत चालला होता. बोलता बोलता कमलेंद्रनं पुन्हा एकदा हनुमंताला माणिकप्रभू, रमण महर्षी, विवेकानंद, गांधी वगैरेंचे संदर्भ देत आत्मज्ञान ही कशी मूलभूत प्रक्रिया आहे आणि जगात येऊ घातलेलं स्थित्यंतर हे या व्यापक प्रक्रियेचाच एक भाग व आविष्कार कसा असेल याचं स्पष्टीकरण दिलं.

''पण अमेरिका हा भांडवलशाही देश असल्यामुळेच तिथे एवढ्या समस्या आहेत हे खरं नाही का? मार्क्सनं भांडवलशीहीमध्ये येणाऱ्या अरिष्टाबद्दल लिहून ठेवलंय...'' हनुमंतानं त्याचा मुद्दा मांडला.

कमलेंद्रनं म्हटलं, ''हनुमंता, अमेरिकेत जशी अरिष्ट आहेत... त्याहून भिन्न स्वरूपाची अरिष्ट मार्क्सवाद मानणाऱ्या व राबवणाऱ्या देशातही आहेत. त्यांची संगती का लावीत नाही? एक लक्षात घे. व्यवस्था भांडवलशाहीची असो की समाजवादाची, क्षुद्र वैयक्तिक स्वार्थाचं उन्नयन आणि भौतिक साधनसंपत्तीची विपुलता बरोबरच प्रत्यक्षात येणार. खरोखरच उदात्त, नि:स्वार्थ आणि शहाणं नेतृत्व मिळाल्याशिवाय अन्यायाविरुध्दची आंदोलनं यशस्वी होणार नाहीत. डावी विचारसरणी कुंठित होण्याचं कारण त्यांनी मार्क्सची स्वप्नं प्रत्यक्षात आणण्याकरता अत्यावश्यक अशी आत्मज्ञानाची चैतन्यदायी अमर तत्त्वं आत्मसात केली नाहीत.''

''पण कमलेंद्रगारू तुम्ही हे अध्यात्म का मांडता मला कळत नाही. प्रश्न शोषितांनी त्यांचे हक्क मिळवायचा आहे, त्यांचं स्वातंत्र्य मिळवायचा आहे. एकेक माणसाला नि:स्वार्थी करायला गेलो तर आयुष्य संपेल पण न्याय मिळणार नाही!'' हनुमंता ठासून म्हणाला.

कमलेंद्रला हनुमंताची भावना, त्याचा आवेश, सारं कळत होतं.

त्याला तात्काळ जाणवलं की प्रत्यक्ष प्रचीतीशिवाय आत्मज्ञानाचं महत्त्व सर्वसामान्यांना पटणं अशक्य आहे. त्याक्षणी त्याला जाणवलं की एकेकाळी देशातल्या कोट्यवधी लोकांच्या जीवनात सत्य व निर्भयता आविष्कृत करणाऱ्या गांधींचं महात्मापण किती महान होतं! त्याला स्वत:ला गांधींचे अनेक मुद्दे पटत नसत. परंतु वैयक्तिक आणि समेष्टीच्या जीवनात सत्य, निर्भयता, आत्मज्ञान इत्यादींचा आविष्कार करण्याचा अतिप्रचंड प्रयत्न त्यांनी केला यात त्यांची महानता होती. त्याच्या स्वत:समोर किती प्रचंड आव्हान आहे या जाणिवेनं कमलेंद्र एकाच वेळी विस्मयचकित झाला आणि उत्साहानं उत्तेजितही झाला. कुणी साथ देवो न देवो, आपण हा प्रचंड वारसा अधिकाधिक अचूकतेनं पुढे न्यायचाच हे त्यानं पक्कं ठरवून टाकलं. त्याचवेळी त्याच्या मनात काही कल्पना येऊन त्यानं हनुमंताला त्याच्या अभ्यासाबद्दल विचारलं.

हनुमंतानंही आडपडदा न ठेवता शोषणकर्त्यांच्या अभ्यासक्रमाबद्दलची नापसंती आणि भ्रमनिरास व्यक्त केला अन् नेमकी ही संधी घेऊन कमलेंद्रानं रोखठोकपणे म्हटलं, ''कोणता अभ्यासक्रम जगातील श्रमिकांचं कल्याण करील याचा कणभर तरी विचार करता का तुम्ही? तुमच्या अभ्यासक्रमातल्या त्रुटी दाखविण्यासाठी थोडातरी अभ्यास का करीत नाही तुम्ही? स्वत:ला क्रांतीचे पाईक म्हणवता! हिंमत असेल तर पर्यायी अभ्यासक्रम तयार करा. पण नाही. जबाबदारी सोडून फक्त दंडुकेशाही करायची आहे तुम्हाला! तुमच्यामुळे, तुमच्यासारख्यांमुळे मार्क्सवादाच्या उदात्त संकल्पना पराभूत होतील, धुळीला मिळतील तेव्हातरी तुमचे डोळे उघडतील की नाही कुणास ठाऊक! करा तुम्हाला काय करायचं ते! मी मला जे करता येईल ते करीन...''

हनुमंता त्यावर क्षणभर निरुत्तर झाला. पण त्यानंही हेका न सोडता म्हटलं, ''तळागाळातल्या सर्वांची परिस्थिती सुधारणं हे आमचं काम आहे. त्यांना नि:स्वार्थी व उदात्त बनवणं... आमच्या अजेंडावर नाही!''

कमलेंद्र गप्प राहिला. त्या विरोधानं, त्या मतभेदानं त्याला उलट आणखी बळ चढलं! कारण अशा प्रामाणिक विरोधाची परिणती अखेर खऱ्या एकमतात होते हे त्याला माहीत होतं. हनुमंतासारखी मुलंच नव्हे तर वयानं वृध्द झालेल्या बऱ्याच महापंडितांना देखील आत्मज्ञान हे भारूड वाटतं हे त्याला माहीत होतं. आत्मज्ञान, योग, मंत्र, देवता, ऋषी सांख्यशास्त्र अशा

शेकडो बाबींच्या भोवती गैरसमजांची कोळिष्टकं तयार झालेली होती. विशाल दृष्टी आणि शहाणपणाऐवजी संकुचितपणा व पढतपांडित्य यात जगातली नेतेमंडळी आणि विचारवंतदेखील भरकटत होते. पण हे बदलेल याची त्याला आतून खात्री वाटत चालली होती. त्यानं हनुमंता म्हणण्यावर प्रत्युत्तर दिलं नाही. हसतमुखानं त्यांचा निरोप घेऊन तो राजवाड्यावर परतला व त्यानं डॉ. गायत्रीला पत्र लिहायला घेतलं.

■

के.के.च पत्र पाहून डॉ. गायत्रीला आश्चर्य वाटलं तसा आनंदही झाला. त्या लिफाफ्यात एक पत्र होतं आणि शिवाय काही फोटोही होते. तिनं प्रथम फोटो पाहिले. के.के. सोमानिलयमला पोचला त्यावेळी झालेल्या त्याच्या स्वागताचा एक फोटो होता. दुसरे दोन फोटो सोमनिलयमच्या परिसराचे होते. एकामध्ये आदिवासींची वस्ती होती तर दुसरीमध्ये दुष्काळामुळे गुरंढोरांसह गाव सोडून चाललेले शेतकरी होते.



फोटो पाहून नकळत तिच्या मनात जगण्यासाठी गाव सोडणारे शेतकरी आणि स्वाभिमानपूर्ण, सुरक्षित आणि सुस्थित सर्व्हायव्हलसाठी स्वदेश सोडून विदेशात रमणारे आपण, यात तुलना झाली. तो विचार आणि ते फोटो बाजूला ठेवून निरुत्साहीपणे तिनं पत्र वाचायला घेतलं:

डॉ. गायत्री व शंभू, आम्ही सर्व मजेत आहोत.

तुमच्याकडेही सर्व खुशाल असावं ही शुभेच्छा!

इथे येऊन थोडेसेच दिवस झाले. पण मनात अनेक योजना साकारताहेत. खूप खूप उत्साह आणि आनंद आहे. खूप काही करण्यासारखं आहे! खरोखरच जीवनाचा प्रवाह विलक्षण आहे! इकडच्या परिस्थितीला विटून तुम्ही तिकडे राहिला आहात, तर इथल्या परिस्थितीत मला आत्यंतिक समाधान वाटतंय. कालाय तस्मै नम:! सोबत इथले फोटो पाठवले आहेत. इकडची आठवण म्हणून.

तुम्ही भारतात याल तेव्हा सवड काढून मुद्दाम इकडे या. सवडीप्रमाणे संपर्क ठेवा.

सुनील आणि शीला, दोघांनाही त्यांच्या अभ्यासक्रमासाठी तसेच तुम्हा उभयताना मन:पूर्वक शुभेच्छा -

के. के. नायडू.

तिनं पत्र वाचून झाल्यावर बाजूला ठेवलं. खरंच, टाइम्स डू चेंज ॲण्ड सिच्युएशन्स टू! सॅनफ्रॅन्सिस्कोला विमानतळावर के.के.नं काढलेले उद्‍गार तिला आठवले.

बाजूलाच 'इंडिया नाऊ' चा ताजा अंक होता. तो उचलून त्यातील बातम्यांच्या शीर्षकांवरून नजर फिरवीत असताना आतल्या पानावरील फोटो पाहून ती स्तिमितच झाली!

भारतापासून दूरवर, पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूला राहत असताना भारत आणि अमेरिकेतील भारतीय यांची माहिती 'इंडिया नाऊ' मध्ये मिळायची. पण त्यात आज असं काही दिसेल हे तिच्या ध्यानीमनीही नव्हतं! त्यातल्या कामगार वृत्तामध्ये एकीकडे व्यवस्थापनाशी यशस्वीपणे तडजोड करणाऱ्या मराठेचा फोटो छापला होता तर दुसरीकडे सोमनिलयममधील आदिवासींच्या आंदोलनाची बातमी होती! तिच्या डोळ्यांपुढे मराठेची खोली, त्याचं कुटुंब,

त्याचा आशाळभूत चेहरा आठवला. तोच मराठे आंतरराष्ट्रीय ख्यातीचा पुढारी बनला होता. त्याचा आणि सोमनिलयमचा फोटो पाहून तिला जाणवलं की, संप, उपोषणं, घेराव, निदर्शनं इत्यादींपासून भारताला काही केल्या मुक्ती मिळतच नव्हती. त्यांतच आता दहशत, दंगे, हत्या यांचं उधाण आलं होतं! पेपर वाचणं म्हणजे स्वत:चा मूड खराब करणं आहे! जाऊ दे.

तिनं मग 'इंडिया नाऊ' मधील संगीत, नृत्य, पूजा, खरेदी, विक्री, वधू-वर वगैरेंच्या जाहिराती वाचायला सुरुवात केली!

पण सोमनिलयमचा विषय तिच्या मनातून जाईना. कष्टकरी मुक्ती मोर्चा, तिथे घडलेली हत्या आणि आता त्याबद्दलची ही बातमी... के.के. तिथे जाऊन काय करीत असेल? त्याचं तिथे काही नवीन कार्य सुरू असेल का? त्याला कितपत यश येईल? त्याच्या जिवाला धोका असेल का? त्याचं राहणीमान बदललं असेल का? आदिवासींच्या जीवनात खरोखर काही स्थित्यंतर घडू शकेल का? एक ना दोन अनेक प्रश्न तिच्या डोक्यात भुंग्याप्रमाणे घोंघावले.

मोठ्या प्रयासानं तिनं ते दूर सारले. या क्षणी तिच्या डोक्यावर कामांचं ओझं होतं. कामांचा तो ढीग तिला एकटीला उपसावा लागणार होता. सुनील आणि शीला दोघांची परीक्षा जवळ आली होती. त्यांना मदत करायची होती. दोघांना प्रोत्साहन द्यायला हवं होतं. बागेतलं कुरण वाढलेलं होतं. ते कापायचं, मॉ करायचं होतं. बॉबीला, तिच्या कुत्र्याला डॉक्टरकडे नेऊन लस टोचून आणायची होती. रात्री शंभूचा मित्र जेवाला येणार म्हणून ड्रिंक्स आणि तंदुरी - चिकनची व्यवस्था करायची होती. अमेरिकेन वातावरणात असूनही तिला शंभूकडून काडीचीही मदत होत नसे. संसाराबद्दल त्याला असलेली अनास्था, अलीकडे तिला फारच झोंबू लागली होती.

डॉ. गायत्रीनं पटकन् वॉश घेतला. फ्रेश वाटलं तसं एक - एक काम हातावेगळं करायला सुरुवात केली. कामं उरकताना तिच्या मनांत आलं, इथे इतक्या सुखसोयी आहेत पण दमून-भागून आल्यानंतर विचारपूस करायला मायेचं माणूस नाही! गरमागरम चहा करून द्यायला नोकरचाकरदेखील नाही! सनी 'पब्लिक स्पीकिंग' च्या तर शीला जिम्नॅस्टिकच्या क्लासेससाठी गेली होती. दोघांनाही करिअर्स डेव्हलप करायच्या होत्या ... मोठ्ठ व्हायचं होतं ... अर्थातच ते घरात असले तरी स्वत:च्याच व्यापात असत. शिवाय तिचा

आवडता दूध - वेलची घालून उकळलेला चहा तर त्यांना बनवताच येत नसे. त्या दोघांना तसा चहा आवडतही नसे. ती दोघं आईस टी घेत, नाही तर कोका कोला किंवा फ्रूट ज्यूस.

डॉ. गायत्रीला माटुंग्याच्या चाळीतले दिवस आठवले. तिच्या आईला किती कौतुक होतं तिचं! घरातली पहिलीवहिली आणि एकमेव डॉक्टर म्हणून! कश्शा-कश्शाला हात लावू देत नसे तिची आई! घरी आल्यानंतर गायत्रीला कधी घोसाळ्याची गरमागरम भजी, कधी उपमा, तर कधी खमंग धिरडं तयार खायला मिळे. वर वेलची घातलेला उकळता चहा.

अमेरिकेला येण्यापूर्वीची ती स्मृतिचित्रं तिच्या डोळ्यांसमोर जशीच्या तशी उभी राहिली. आणि मग तो प्रसंग आठवला.

गायत्री खूप दमून घरी परतली होती. प्रथमच अमेरिकेला निघाली असल्याने तयारी करताना नाकी नऊ येत होते. डोक्यावर खूप दडपण होतं. खूप भूक लागल्यानं ती मिळेल ते लवकर एकदा खाण्यासाठी तरातरा स्वयंपाकघरात आली. सगळी भांडी डबे उघडून पाहिले पण काहीच मिळालं नाही. ती एकदम चिडली. मनात आलं आधीच एवढी कटकट असताना घरी आलं तर साधं खायला मिळू नये? गोविंदा काही तरी चाळे करत होता. कधी नव्हे तो तिला गोविंदाचाही राग आला. तणतणत ती तशीच बाथरूमला जाऊन आली. जोरानं आईच्या अंगावर खेकसली, "काहीतरी खायला केलं असतंस तर काय बिघडलं असतं? माझी एवढी तारांबळ होतेय त्याचं सोयरसुतक नाही तुम्हाला?"

आईच्या डोळ्यात टचकन् पाणी आलं. उठून तिनं लगबगीनं चहा आणि भजी केली. भजी खाऊन आणि चहा घेऊन ती उठणार एवढ्यात पाणी द्यायला आलेली आई चक्कर येऊन मटकन खाली बसली, अन् बघता बघता तशीच कलंडली. ते पाहताच गायत्रीच्या मनांत धस्स झालं. तिचा चढलेला पारा झटकन् खाली आला.

उठून पाहिलं, तर आईला १०४° डिग्री ताप होता. थोड्या वेळानं आई शुध्दीवर आली. तिच्या सांगण्यावरून गोविंदाला थर्मामीटर लावून पाहिला तर त्यालाही १०२° डिग्री ताप होता! दिवसभर बिचारी आई राबत होती त्या तसल्या तापात... आज ते आठवलं अन् गायत्रीला हुंदका आला. जाणवलं, आपण इथे आलो खरे पण इथे फक्त शरीर जगतं. सुखसोयी भोगतं.

मन मात्र रोज मरतं. उपाशी रहातं. आपण भिकारी झालो. असहाय भिकारी. ज्याला कुणी भिक्षाही देत नाही असे भिकारी! तिच्या डोळ्यांतलं पाणी खळेना.

ती तशीच उठून बेसीनपाशी गेली. पुन्हा एकदा तिनं संपूर्ण चेहरा स्वच्छ धुतला आणि मग अचानक मनात काय आलं कुणास ठाऊक, सरळ एका ग्लासात रेड वाइन भरली आणि घटाघटा पिऊन ग्लास संपवला. लाल रंगाचं ते जळजळीत पेय घशातून उतरताना कुणीतरी आपली छाती आतून जाळतोय असंच तिला क्षणभर वाटलं. पण तिला तसंच काहीतरी हवं होतं. स्वत:वर सूड उगवायचा होता. स्वत:च्या हळव्या मनाला ठेचून टाकायचं होतं. कारण तिचं ते भाबडं मनच सारखं सारखं छळून तिचं जिणंच कठीण करीत होतं!

तिनं पुन्हा ग्लास भरला आणि पहिल्याप्रमाणे रिता केला. "सब कुछ जाने दो जहन्नमेम... सबकुछ..." ती स्वत:शीच बडबडली. हुंदके विरून गेले... अश्रू जणू बाष्पीभूत झाले... त्यातून हर्षवायू तयार झाला... आता तिला डोकं एकदम हलकं झाल्याचं जाणवलं. आतून हास्याच्या उकळ्या फुटताहेत असं वाटलं. ती मोठ्यानं हसली. पुन्हा पुन्हा हसतच राहावं, पोट धरधरून हसावं, गडाबडा लोळावं, स्वत:च अंग घुसळावं असं तिला वाटलं. बाजूच्या मोठ्या आरशात लक्ष जाताच तिनं अचकट-विचकट हावभाव केले. आणि स्वत:वर खूश होऊन परत येऊन एक शिवी हासडत पुन्हा एक ग्लास भरला. घटाघट तोही ग्लास रिचवून ती सोफ्यावर बसली. आता तिच्या कानातून, डोळ्यातून धुंद करणारी एक विलक्षण संवेदना सळसळत गेली. सारं काही हलकं हलकं होतंय, तरंगतंय असं वाटू लागलं. थोड्याच वेळात तिची बुब्बुळं फिरू लागली. डोकं गरगरू लागलं. दृष्टी ठरेना तेव्हा तिला जाणवलं की आपला तोल जातोय, आपलं भान हरपतंय. पण तिच्या मनात आलं, सारं काही असंच चालू दे. बेताल-बेभान, बेपर्वा. तिच्या मनात आलं, आपण सर्वांचं सर्व करतो... पण सर्वजण स्वार्थी आहेत. शंभू तर इतका बेजबाबदार ... पण पुन्हा तिचं मन पोरांसाठी कळवळलं... पोरांना तरी मदत करायला हवी होती. नकळत डोळ्यांसमोर आई, वडील, गोविंदा, सुलभा, के.के., डॉ.टेलर, ट्रेसी असे एकामागून एक आले. येत राहिले. त्यांच्यात आपण कमी पडतोय असं वाटलं. अपराधीपणाची भावना येताच पुन्हा

असहाय होऊन ती उठली. तडक तिनं जाऊन आणखी एक ग्लास भरून संपवला.

मग धडपडत, झोकांड्या खात, दरवाजाला आपटत ती तशीच आवेगानं जाऊन बेडवर पडली. स्वत:शीच पुन्हा बडबडली, ''पोरांनो तुम्हीही व्हा आता स्वतंत्र. मला आता पुरे झालं. मला आराम करायचाय... गेट आउट ऑफ माय लाइफ... जगा स्वत:च्या पायावर ... चालते व्हा:''

तिचे शब्द अस्पष्ट होत गेले आणि त्याऐवजी आता तिच्या घोरण्याचा आवाज वाढू लागला. अस्ताव्यस्तपणे पडलेलं तिचं अस्तित्व खरोखरच बेभान झालं.

ती तशी पडली असताना लॅच उघडून आलेला शंभू तिला उठवायचा प्रयत्न करीत होता. ''गायत्री, ए गायत्री, उठो ना! ऐसी कैसी सो गयी?''

गायत्रीनं डोळे उघडण्याचा प्रयत्न केला. पण डोळ्यांवर जबरदस्त झापड होती. ''काय रे ... का छळतोस असा?'' दंडाला धरून गदागदा हलवणाऱ्या शंभूवर ती रागानं एकदम खेकसली.

शंभू चकितच झाला. गायत्री आज पहिल्यांदाच अशी ओरडली होती. त्याच क्षणी त्याला दारूचा वास आला. ही तर प्यायलेली दिसतेय. एकदम त्याच्या मस्तकात सणक गेली. ''गायत्री! यू आर ड्रिंक. तुमने शराब पी है।'' आता त्याच्या आवाजात जरब होती.

''डोंट शाऊट! मी गुलाम नाहीय तुझी!'' ती पुन्हा ओरडली.

त्या प्रकारानं शंभू एकदम नरमला. त्याला हा सारा अनपेक्षित धक्काच होता, ''गायत्री कम ऑन... डेव्हिड आलाय खाली... कुछ एटिकेट्स...''

''गो टू हेल!''

''गायत्री गेट अप!'' आता मात्र शंभूला राहावेना. ती उठत नाही असं बघून त्याचाही स्वत:वरचा ताबा सुटला. एकदम तिच्या बकोटीला पकडून त्यानं तिला पलंगावरून खेचली. पण स्वत:चा तोल सांभाळता न आल्यानं झोपेत असलेली गायत्री एकदम खालीच पडली.

''यू स्काऊंड्रल! आय वुइल कील यू!'' ती बेफामपणे किंचाळली.

तिचा तो चंडिकावतार बघून प्रथमच शंभू हादरून गेला. पण तसं न दाखवता तो तसाच खाली आला. सिगारेट ओढत बसलेल्या डेव्हिडची माफी मागून त्यानं गायत्रीला बरं नसल्याची थाप मारली आणि तशा हबकल्या

अवस्थेतच गुपचूप रेस्टॉरंटचा रस्ता धरला.

पण रेस्टॉरंटमध्ये बसला तरी त्या धक्क्यातून तो सावरला नव्हता. धक्का, तिरस्कार, राग, भीती, धास्ती अशा विविध भावनात तो जखडला होता.

घरी परतला तेव्हाही शंभू अस्वस्थच होता. पण गायत्रीबरोबर भांडण करणं शक्यच नव्हतं.

गुपचूप कपडे बदलून तो बेडरूममध्ये गेला. बेडवर गायत्री अस्ताव्यस्त झोपली होती. पुन्हा त्याच्या मस्तकात तिडीक गेली. पण त्याचवेळी गाऊन वर सरकल्यामुळे गायत्रीची उघडी पडलेली मांडी त्याच्या नजरेला पडली. मग नकळत त्याची दृष्टी तिच्या वक्षस्थळाकडे सरकली. मघा झालेल्या झटापटीला बहुधा वरचा हूक तुटल्यामुळे तिची ब्रा वर सरकून झिरझिरीत गाऊनमधून तिचे उरोज स्पष्ट दिसत होते.

त्या नशिल्या सौंदर्यानं मदहोश झालेल्या शंभूचा राग पार नाहीसा झाला. एकदम तो मृदू झाला. मनात आलं कशाला आपण एवढा त्रास देतो हिला? सहज मिळेल त्यात समाधान ठेवलं, गोडी राखली तर घरचं आणि बाहेरचं अशी दोन्ही सुखं नाही का भोगता येणार? उगीच आक्रस्ताळेपणा केला तर सारंच मुसळ केरात जायचं. डायव्होर्स घेऊन गेली तर... सगळ्या सोयी आणि सुखं दूर जायची!

त्यानं सेंटचा फवारा मारला आणि बेडवर पडून अठ्ठावीस नंबरचा चॅनेल ऑन केला. प्ले बॉय चॅनेलवरची ती उत्तानता डोळे भरभरून साठवत तो थोडा वेळ तसाच पडून राहिला.

काही वेळानं कानशीलं गरम झाली तसं त्याचं मन वळवळू लागलं. टी.व्ही. बंद करून रिमोट कंट्रोल बाजूला टाकून आणि बेडलॅम्प ऑफ करून त्यानं दारूच्या गुंगीत पडलेल्या गायत्रीच्या मादक देहावर झडप घातली. रात्र सरण्यापूर्वी त्याला जास्तीत जास्त सुख ओरबाडून घ्यायचं होतं. गायत्री दारू प्यायली हे चांगलंच झालं असं त्याला वाटलं.

■

गायत्रीच्या घरात पहाटे ते वासनानाट्य चालू होतं तेव्हा चार्लस्टनमध्ये सकाळचे सहा वाजले होते. पण डॉ. टेलर त्यावेळी उठून डिपार्टमेंटला जाण्याची तयारी करीत होते. एवढ्यात फोन वाजला. एवढ्या सकाळी

कुणाचा फोन आलाय म्हणून असं मनात म्हणत डॉ. टेलर उठले आणि त्यांनी फोन घेतला.

"हॅलो, कुड आय स्पीक टु डॉ. टेलर?"

"स्पीकिंग!"

"गुड मॉर्निंग डॉ. टेलर, धिस इज ट्रेसी."

"हॅलो ट्रेसी, कशी आहेस? एवढ्या सकाळी फोन केलास, काही महत्त्वाचं काम होतं?"

"ओ येस. डॉ. टेलर तुम्ही सॅलीला ओळखता ना?"

"सॅली? नाही बुवा!"

"माहीत नाही? आमच्याच ग्रुपमधली आहे."

"बरं बरं, पण तिचं काय काम आहे ते लवकर सांग बरं... मलाही जायचं आहे. प्लीज!" सकाळचा वेळ त्यांना अत्यंत महत्त्वाचा वाटे. त्यामुळे सकाळच्या वेळी फोनवर गप्पा मारायला त्यांना अजिबात आवडत नसे.

"डॉ. टेलर, सॅलीला रोपर हॉस्पिटलमध्ये ॲडमिट केलंय."

"कशासाठी?"

"ॲडिक्शन, ड्रग ॲडिक्शन!"

"ओ! दॅट्स् व्हेरी बॅड!" ते कळवले. अठरा वीस वर्षांची मुलगी मृत्यूच्या सापळ्यात अडकली होती. त्यांना समजेना की ते तिच्यासाठी काय करणार!

"डॉ. टेलर, तुम्हाला जमलं तर तिला भेटून काही मदत कराल का?"

डॉ. टेलर सुन्न झाल्याने क्षणभर काहीच बोलले नाहीत.

"डॉ. टेलर, काही अडचण आहे का?" ते बोलले नाही म्हणून ट्रेसीनं पुन्हा विचारलं.

तिचा आवाज ऐकून एकदम भानावर येत ते म्हणाले, "नो नो ट्रेसी. आय शॅल डू एव्हरी थिंग पॉसिबल. पण कुणीही फारसं काही करू शकेल असे वाटत नाही. पण मला संध्याकाळी फोन कर म्हणजे काय काय झालं ते मी तुला सांगेन."

ते फोन ठेवणार एवढ्यात ट्रेसीनं त्यांचे आभार मानले. त्यावर "वेलकम" म्हणून त्यांनी फोन ठेवला. फोन ठेवताच त्यांना आठवलं की त्यांनी ट्रेसीलाही त्यांच्या अण्वस्त्रविरोधी कार्यक्रमाची माहिती छोटी पुस्तिका

आणि आमंत्रण पाठवलं होतं पण त्याबद्दल ते बोलायला विसरले होते. त्यांनी घाई केल्यामुळे की काय तीही बोलली नव्हती. खरं म्हणजे ट्रेसीसारख्या मुलीला आपण सुरुवातीपासूनच अण्वस्त्रप्रसार-विरोधी धडपडीत सामावून घ्यायला हवं होतं असं त्यांना या घडीला प्रकर्षानं जाणवलं. कारण तिच्यासारख्या तरुण मुलींची त्यात खूप मदत होऊ शकत होती.

डॉ. टेलरनी नेहमीप्रमाणे स्वत:ची आवरावर झाल्यावर स्वत:ची सायकल बाहेर काढून तिच्यावर जंप मारली. डिपार्टमेंटला जाण्यापूर्वीच सॅलीला भेटून तिच्यावर उपचार करणाऱ्या सौदी अरेबियाच्या डॉ. हुसेनना तिच्याविषयी सांगायचं त्यांनी ठरवलं.

रोपर हॉस्पिटलमध्ये डॉ. टेलर पोचले तेव्हा सकाळचे आठ वाजले. झटपट त्यांनी सतरा नंबरच्या वॉर्डमधील बारा नंबरची खाट नर्सला विचारून शोधून काढली. डॉ.टेलरना रोपर हॉस्पिटलमध्ये बहुतेक जण ओळखत. कारण तिथल्या अनेक डॉक्टरांना त्यांनी मार्गदर्शन केलं होतं, त्यांच्यासाठी व्याख्यानं दिली होती आणि काहींबरोबर संयुक्तपणे संशोधनदेखील केलं होतं. तिथल्या नर्सेस, फिजिओथिरॅपिस्ट्स्, ऑक्युपेशनल थिरॅपिस्ट्स्, बायोइलेक्ट्रिकल इंजिनीअर्स वगैरेंसाठीदेखील त्यांनी पुष्कळ व्याख्यानं दिली होती. याशिवाय पुष्कळदा ह्या हॉस्पिटलची मंडळी समोरच असलेल्या मेडिकल युनिव्हर्सिटीच्या कॅन्टीनमध्ये जेवायला येत तेव्हाही पुष्कळांच्या भेटीगाठी होत.

ते सॅलीच्या खाटपाशी आले तेव्हा लगेच संबंधित नर्सही त्यांच्यापाठोपाठ तिथे आली. ओळखीचे स्मित करीत तिनं विचारलं, ''हॅलो, डॉ. टेलर, गुड मॉर्निंग, मे आय हेल्प यू प्लीज?'' जरा बाजूला होऊन त्यांनी लगेच त्या नर्सकडून सारी माहिती विचारून घेतली. दुर्दैवानं त्यांचा अंदाज खरा ठरला होता. क्रॅक्ड कोकेनचा बळी बनलेली सॅली वाचणं जवळजवळ अशक्य झालं होतं. फार उशीर झाला होता.

कॉटशेजारचा टॉम जेव्हा त्यांच्यापाशी आला तेव्हा त्याला धीर दिला आणि डॉ. हुसेनना देण्यासाठी एक छोटी चिठ्ठीही लिहून दिली.

मग डॉ.टेलरनी पुढे होऊन गाढ झोपलेल्या सॅलीकडे पाहिलं. झोपेचं इंजेक्शन देऊन तिला झोपवलंय हे त्यांच्या लागलीच लक्षात आलं. पांघरुणाच्या आत असूनदेखील ती फारच अशक्त झालीय हे तिच्या चेहऱ्यावरून आणि हातांच्या काड्यांवरून ओळखता येत होतं. टॉमकडून

डॉ.टेलरना कळलं की गेल्या काही महिन्यातच सॅली ड्रग्जच्या विळख्यात सापडली होती. अन् कुणाला कळण्यापूर्वीच जवळपास वर्षाच्या गोजिरवाण्या मुलीला आणि तिच्यावर जिवापाड प्रेम करणाऱ्या टॉमला सोडून चालली होती. बोलता बोलता टॉमचा बांध फुटला. तो ओक्साबोक्सी रडू लागला!

डॉ.टेलरना काय बोलावं समजेना. पत्नीला अशा तऱ्हेने मृत्यूच्या जबड्यात जाताना असहायपणे पाहावं लागणाऱ्या टॉमचं दु:ख काही प्रमाणात तरी ते समजू शकत होते. पण त्यांच्याही हातात काहीच नव्हतं. सॅली जाणार हे जवळपास निश्चित होतं.

तेवढ्यात सॅलीची हालचाल झाली. बघता बघता ती मोठ्यानं ओरडू लागली, झटके देऊ लागली, तिच्या तोंडातून फेस येऊ लागला... धावतच दोन नर्सेस तेथे आल्या.

डॉ. टेलर जड अंत:करणानं तिथून निघाले. जाता जाता त्यांच्या मनात काही विचारचक्रं सुरू झाली.

■

सॅलीला भेटून आल्यानंतर त्यांना वाटलं होतं की सॅली जगणार नाही. परंतु आश्चर्य असं की सॅली त्या नरकातून परत आली होती. मृत्यूनं जवळ जवळ झडप घातली असताना ती वाचली कशी ह्याचं साऱ्यांनाच सुखद आश्चर्य वाटलं होतं. कालच ती घरी परतली होती. आज वातावरणात विलक्षण उष्मा असला तरी बहुतेक झाडं फळाफुलांनी उंडारली होती. डॉ.टेलरनी लॉनवर मॉवर फिरवला व ते आत आले. घड्याळाकडे लक्ष जाताच त्यांना जाणवलं की बरोबर दोन महिन्यांपूर्वी अगदी याच दिवशी ते सॅलीला हॉस्पिटलमध्ये भेटून आले होते. डॉ.टेलर शांतपणे किचनमध्ये गेले. फ्रीजमधून त्यांनी टर्कीच्या दोन स्लाइसेस काढल्या. लेस्लीला हाक मारून तिला आणि स्वत:करता एक अशी दोन सँडविचेस बनवली आणि पाइनॲपल ज्यूस ग्लासमध्ये ओतून सँडविच खात बसले.

घाईत असलेल्या लेस्लीनं तिचं सँडविच उभ्या उभ्याच संपवलं आणि त्यांचा निरोप घेऊन ती बाहेरदेखील पडली.

डॉ.टेलरनी पत्रव्यवहाराची फाईल काढली. आज सुट्टी असल्यानं त्यांना नीट विचार करून काही योजना ठरवायला वेळ होता.

त्यांनी काही दिवसांपूर्वी आलेलं के.के.चं पत्र काढून सावकाश वाचून

संपवलं.

अण्वस्त्र, दहशतवाद, दंगली, स्मगलिंग, वंशद्वेष, अंमली पदार्थांचा व्यापार, वाढती गुन्हेगारी याबाबत के.के.नं केलेल्या विश्लेषणाचा ते बारकाईनं विचार करत होते. संपूर्ण जगात, सर्व धर्मांच्या अनुयायात, सर्व विचारप्रणालींच्या समर्थकांत आत्मज्ञानाचा विसर पडल्यामुळे संकुचितपणा, कोतेपणा, असुरक्षितता, क्षुद्र स्वार्थ यांची बेसुमार वाढ झाली आणि परिणामतः मूल्यसंभ्रम निर्माण झाला अन् या मूल्यसंभ्रमातून केवळ बेकायदा गुन्हेच वाढले असं नव्हे तर कायदेदेखील अदूरदर्शी आणि घातक बनले, असं मत के.के.नं व्यक्त केलं होतं. त्याच्या मते सर्व पातळ्यांवरील आत्मज्ञानाची हेळसांड मूल्यसंभ्रमाला जन्म देते आणि मूल्यसंभ्रम पराकोटीच्या जहरी विकृतींना जन्म देतो, जोपासतो व पोसतो. डॉ.टेलरना त्याचं म्हणणं मूलगामी वाटत होतं. परंतु त्याच्या विचारांचा, त्या विकृती उखडून टाकण्यासाठी कसा वापर करता येईल हे त्यांना नेमकं कळत नव्हतं. दुसरी गोष्ट अशी की के.के.च्या म्हणण्यानुसार, जोपर्यंत आर्थिक, शैक्षणिक, औद्योगिक, आरोग्यविषयक अशी विविध क्षेत्रांतील धोरणं आखणारे, योजना बनवणारे आणि त्या अमलात आणणारे बुध्दिवंत खऱ्या अर्थाने निःस्वार्थी, निर्भय आणि विशाल हृदयी बनत नाहीत तोपर्यंत ह्या समस्यांवर कुठाराघात करता येणार नाही हेही त्यांना पटत होतं. परंतु बुध्दिवंतांची दृष्टी विशाल करण्यासाठी करायचं काय, ते समजत नव्हतं.

बराच वेळ विचार केल्यानंतर अचानक त्यांना आठवलं की के.के. सेल्फ रीअलायझेशनबद्दल पुन्हा पुन्हा बोलत असताना एकदा सहज बोलून गेला होता की नामस्मरण, योग, ध्यानधारणा, कर्मयोग,भक्तियोग, आत्मानात्म विचार, तीर्थयात्रा, दानधर्म, सेवा, उपास, संयम, सत्य भाषण ही सारी आत्मज्ञानाची साधनं आहेत. त्या साधनामागील हेतू व तत्त्व लक्षात घेणं आवश्यक आहे. त्यांना प्रकर्षानं जाणवलं की ख्रिस्त, बुध्द, गांधी, विवेकानंद यांचे विचार या एकाच मूलभूत प्रचीतीतून उत्पन्न झालेले आहेत. अचानक अमेरिकेतील शाकाहार, योग, हरेकृष्ण संप्रदाय इत्यादींबद्दल त्यांची दृष्टी बदलली. धर्मातील वैविध्यामधील ही मनोहारी लय सापडताच ते एकदम उत्तेजित झाले. त्यांना नवी उमेद आली. पुन्हा एकदा गांधींचे विविध क्षेत्रांसंबधीचे विचार त्यांच्या मनात घोळू लागले. त्या साध्यासुध्या कृश

वृध्दाच्या, अतिशय साध्या आणि म्हणूनच निरुपद्रवी व गरीब गोगलगायी-सारख्या भासणाऱ्या विचारातील शक्ती आणि तेज त्यांना जाणवली. ते प्रफुल्लित झाले.

डॉ. टेलरनी महात्मा गांधींबद्दल बरीच माहिती मिळवली होती. त्यामुळे त्यांना जाणवलं की के.के. ज्या सेल्फ रीअलायझेशनबद्दल बोलायचा तेच खरं व्यक्तीचं अंतिम ध्येय व स्वातंत्र्य आहे, असं गांधींचंही मत होतं आणि त्यांनी केलेल्या साऱ्या आंदोलनांना आणि मांडलेल्या विचार व धोरणांना हेच अधिष्ठान देण्याचा त्यांचा प्रयत्न होता!

डॉ.टेलरना जाणवलं की त्यांच्या वैज्ञानिक संशोधनामध्ये उत्कट आनंद आणि बौध्दिक आव्हान असे. तर अण्वस्त्र, अंमली पदार्थ इत्यादी विकृतींच्या विरोधात जी अखंड आणि व्यापक मोहीम आखावी लागणार होती तिच्यात संपूर्ण संकुचित अस्तित्वाचा होम करण्याची अंतर्बाह्य उजळून टाकणाऱ्या महातपस्येची गरज होती! झटकन उठून त्यांनी ट्रेसीचा नंबर प्रेस केला. आपल्या भावना तिच्यापाशी उघड कराव्यात, असं त्यांना मनापासून वाटलं होतं!

ट्रेसीचा फोन लागताच त्यांनी बोलायला सुरुवात केली.

''हॅलो ट्रेसी''

''स्पीकिंग...''

''लिसन. ऐक आज संध्याकाळी आपण माझ्या घरी भेटणार आहोत, कळलं? विदाऊट फेल,.....''

''बट डॉक्टर...''

''काय झालं?''

''आज पर्चेसिंगला जायचंय''

''ओ नो. दॅट कॅन वेट. आज आपण भेटायचंय.'' डॉ. जवळजवळ ओरडलेच!

ट्रेसी एकदम चमकली. क्षणभर तिला कळेचना की डॉ. टेलर एवढे ओरडतायत का? त्यांना चिडायला काय झालंय? की म्हातारचळ लागलंय? मॅनर्सदेखील नाहीत? पण ट्रेसीला त्याचवेळी जाणवलं की डॉ. टेलर अधिकार गाजवल्यासारखे ओरडत नव्हते! त्यांच्या आवाजात चीड नव्हती. कळकळ होती, तळमळ होती. क्षणभर स्वत:शी विचार करून तिनं म्हटलं,

"ओ. के. डॉक् ! संध्याकाळी सहाला येते मी!"

"थँक्स ट्रेसी, दॅट्स धी स्पिरीट."

"ओ.के." म्हणून ट्रेसीनं फोन ठेवून दिला आणि ती तिच्या कामाला लागली.

■

ट्रेसी डॉ. टेलरच्या घरी पोचली तेव्हा ठीक सहा वाजले होते. तिनं बेल वाजवताक्षणीच डॉ. टेलरनी दार उघडलं.

ती आल्या-आल्याच त्यांनी प्रथम तिला बसवून तिची गैरसोय केल्याबद्दल आणि फोनवर जरा जास्तच एक्साइट झाल्याबद्दल तिची माफी मागितली आणि तिला बोलवण्यामागील हेतू समजावून सांगितला.

मग के.के. बरोबर झालेल्या पत्रव्यवहाराची फाईल तिच्याकडे देत ते म्हणाले, "ही पत्रं पर्सनल असली तरी तशी पर्सनल नाहीत. उलट तू वाचायलाच हवी अशी आहेत ती!"

तिनं उत्सुकतेनं ती सारी पत्रं एकामागून एक वाचून काढली तेव्हा तिला एकाच वेळी आश्चर्यही वाटलं आणि खूप उत्साहदेखील!

के.के.नं त्या पत्रातून, रासायनिक अस्त्रं, अण्वस्त्र यांच्याबरोबरच अंमली पदार्थांच्या विरोधात कार्य कसं करता येईल याबद्दल काही व्यावहारिक सूचना केल्या होत्या. सत्प्रवृत्त शिक्षक, विद्यार्थी, डॉक्टर, वैज्ञानिक, उद्योजक, व्यापारी, शेतकरी, पोलिस, खाजगी डिटेक्टिव्ह, वकील आणि काही सिनेटर्सदेखील या कार्यात कसे उत्स्फूर्तपणे उतरतील याचा त्यानं ऊहापोह केला होता. सॅलीच्या बाबतीत घडलेल्या घटनेनं तिला निश्चितच धक्का बसला होता. पण के.के. नं सुचवलेल्याप्रमाणे या क्षेत्रात जर प्रत्यक्ष काम केलं तर ड्रग्जच्या बळींना खऱ्या अर्थानं श्रध्दांजली वाहता येणार होती. त्यातूनच मनाची रुखरुख आणि हळहळ कमी होऊ शकेल असं तिला मनापासून वाटलं. के.के. नं मोठ्या खुबीनं दाखवून दिलं होतं की व्यक्ती-व्यक्तीमधील निर्व्याज प्रेमाची जागा जेव्हा नंगा स्वार्थ घेतो तेव्हा अशा अनिष्ट बाबींना ऊत येतो. त्यामुळे जर निर्व्याज प्रेमाकडे नेणारी ईश्वरसाक्षात्काराची साधना आणि तज्जन्य उदात्ततेच्या सार्वत्रिक आविष्कारातून अंमली पदार्थ विरोधातही सर्व पातळ्यांवर मोर्चेबंदी करता येईल. तिच्या मनात नवी उमेद निर्माण झाली. तिचं तिलाच जाणवलं की डॉ. टेलरना म्हातारचळ लागलेलं

नाही, उलट नवचैतन्य लाभलंय! उलट आपल्यालाच आता आळस झटकून, अंग मोडून कामाला लागायला हवं. के.के. नं दिलेली चैतन्यदायी जीवनदृष्टी धोरणं, कायदे, शिक्षण, गुन्हा अन्वेषण, कायद्याची अंमलबजावणी, आरोग्य, व्यवस्था, उपचार, कौटुंबिक स्वास्थ्य, अशा सर्व स्तरांवर यशस्वी करता येईल. अशी तिला मनोमन उमेद वाटली. किंबहुना असं चैतन्य सर्व क्षेत्रात फुंकल्याशिवाय ड्रग्जची समस्या आटोक्यात येणार नाही असंही तिला वाटलं.

फाईल बाजूला ठेवून ती डॉ. टेलरना निर्धारानं म्हणाली, "डॉक्टर वुई शॅल वर्क... हे काम पर्वतप्राय आहे. अन् म्हणूनच सर्वतोपरी झटून ते पूर्ण करण्यात खरी मजा आहे. थँक्स डॉक्टर!"

"थँक यू ट्रेसी... थँक यूं!" डॉ. टेलरना त्या प्रतिसादानं उचंबळून आले.

"डॉ. टेलर, सॅलीसारख्या कितीजणी अंमली पदार्थांना बळी पडल्या असतील! खरोखर त्या सर्वांसाठी खरीखुरी श्रध्दांजली वाहण्याची ही सुवर्णसंधी आहे. त्याचप्रमाणे लाखोंना या धोक्यापासून वाचवण्याचीही ही संधी आहे. के.के. आणि तुमच्यामुळे मला ही संधी मिळतेय. अशा लाखोंचे आप्तस्वकीय ह्या कामात उतरतील तर किती चांगलं होईल!'

"ते होईल ट्रेसी! ह्या कार्यात कितीही अडचणी आल्या तरी भवितव्य उज्ज्वल आहे यात शंका नाही!" डॉ.टेलर उत्साहानं म्हणाले. तिला बोलावून आपल्या भावना, गोंधळ, उत्साह सारं काही अगदी के.के.ची पत्रंदेखील तिच्याशी शेअर करण्यात आपण अजिबात चूक केली नाही या विचारानं त्यांना अत्यंत समाधान वाटलं! बघता बघता रात्रीचा एक वाजला होता पण ट्रेसी निर्भय होती. तिला घरी सोडण्याच्या देकाराला नम्र नकार देऊन ती आपल गाडीत बसली.

■

डॉ.टेलर आणि ट्रेसी त्यांच्या अत्यंत आधुनिक अपार्टमेंटमध्ये सर्वसमावेशक प्रयत्नांनी तिथल्या समस्यांविरुध्द मोर्चेबंदी करीत होते. त्यावेळी सोमनिलयमच्या जंगलात सकाळ झाली होती. पण अजून सूर्यप्रकाशाचं आगमन फक्त उंचच्या उंच वृक्षांच्या शेंड्यावर झालं होतं. दऱ्याखोऱ्यातून आणि घळीतून अजून अंधारच होता. पण हळूहळू सोनेरी



उन्ह डोंगराच्या कोनाकोपऱ्यातून उतरत आणि पसरत गेली! सोमनिलयमच्या जंगलातल्या डोंगरातल्या त्या खोल घळीत हनुमंता पोचला तेव्हा क्षणभर त्याच्याही अंगावर अनामिक भीतीनं काटा उठला! अजगराप्रमाणे लोंबणारी, चित्र-विचित्र रूपे धारण केलेली झाडावेलींची अन् पाळामुळांची निबिड वनराई, जमिनीवर साचलेला पाचोळा, प्राण्यांची हाडं, कवट्या, सापांच्या काती, पिसे, दगडधोंडे वगैरेंमुळे खरोखरच भेसूर झाली होती. उंचच उंच जाणाऱ्या झाडांच्या शाखांविस्तारांनी आकाश झाकलं होतं आणि त्यामुळे ती घळ नित्याच्या जीवनाबाहेरील, साऱ्या संवेदना ठप्प करणारं स्थळ बनली होती. हनुमंता श्वास रोखून त्या उतरंडीवरून खाली उतरला. त्या घळीतून वाहणारा तो खळाळता प्रवाहदेखील सर्वसामान्यांचा थरकाप उडवणारा होता.

''हनुमंतानं इकडे तिकडे पाहिलं आणि लहानूला हाक मारली.

झऱ्याकाठी खेकडे पकडत बसलेल्या लहानूनं एकदम उठून त्याला 'ओ' दिली. मग हनुमंताकडे आश्चर्यानं बघत त्यानं विचारलं, ''इथे कसा आलास एवढ्या अडचणीत?''

हनुमंतानं हसून म्हटलं, ''कंटाळा आला. तुला भेटावं वाटलं. म्हणून आलो.''

''बरं बरं, आपण आता मजा करू. हे चार खेकडे भाजून खाऊ इथंच चालेल?''

हनुमंताला कसंसच वाटलं. मिर्ची, मसाला सोडाच पण मीठ न लावता खेकडा भाजून खायची कल्पना त्याला विलक्षण वाटली. पण लहानूचं मन मोडायला नको म्हणून त्यानं होकार दिला. लहानूला ते ऐकून खूप बरं वाटलं. मग उत्साहानं लहानूनं पकडलेले खेकडे घेऊन एक चांगलीशी जागा बघितली. सुका पाचोळा जमा केला. मग एकेक खेकडा वेलींनी काठ्यांना बांधला आणि दगडांनी आग पेटवून खेकडे भाजायला सुरुवात केली. भाजता भाजता त्यानं विचारलं, ''आज कंटाळा का आला हनुमंता?''

''लहानू! कसं सांगू तुला? माझ्या मनात किती खळबळ चाललीय मलाच माहीत!''

''पण सांग तरी तेवढंच मन मोकळं होईल.''

''लहानू हा पेपर बघ... म्हणजे लक्षात येईल.''

''काय आहे पेपरमध्ये? तूच सांग ना!''

''मुंबईचे कामगार कष्टकरी मुक्ती मोर्चाचा निषेध करताहेत.''

''मग करू देत. आपलं काय बिघडलं? तूच नाही का म्हणत लाचार जगण्यापेक्षा लढून मेलेलं बरं! मग ते काही का म्हणेनात, आपल्यावरच्या अन्यायाविरुध्द आपण लढू!''

हनुमंताला ते ऐकून एकाच वेळी गंमत वाटली आणि त्याचा निर्बुध्दपणा पाहून आणखीनच खचायला झालं. त्यानं कसंबसं लहानूला समजवण्यासाठी म्हटलं, ''लहानू आपल्यावर होणारा अन्याय फक्त इथल्या जमीनदारांकडून होतोय असं आपल्याला वाटतं. इथल्या पोलिसांकडून होतोय असं वाटतं, पण प्रत्यक्षात संपूर्ण देशाची राजवट, सारे जमीनदार व सारी जनता विरुध्द स्थानिक आदिवासी असाच संघर्ष घडतो!''

''मग काय झालं? लढायचं म्हणजे लढायचं!''

"अरे काय तरी काय बडबडतोयस? लढायचं ते काय मरण्यासाठी? न्याय मिळवण्यासाठी जिंकायला हवं. त्यासाठी देशभरातल्या लोकांचा, कमीत कमी कामगारांचा तरी पाठिंबा मिळवायला हवा. पण ह्या कामगारांचा असला पवित्रा पाहून मी उद्विग्न झालोय! शिवाय मनात असंही येतंय की रेड्डीच्या हत्येची नाहक जबाबदारी घेऊन आपण शत्रू तेवढे वाढवले. फायदा काहीच नाही!"

"हनुमंता बाकीचं सारं तू बघ. मला फक्त काय करायचं ते सांग..."

"लहानू, मी तोच विचार करतोय"

"हनुमंता... लहानू..."

त्यांच्या नावानं हाक ऐकून ते एकदम दचकले. चपापून मागे पाहतात तो थोड्या दूरवर कमलेंद्रगारू उभे होते! दोघांनाही आश्चर्यचा धक्काच बसला!

"हनुमंता, लहानू... या जंगलातल्या बारीकसारीक साऱ्या वाटा माझ्या पायाखालच्या आहेत, पायाखालच्या! बालपणी मी जेव्हा इथे फिरायचो तेव्हा बरोबरचे सवंगडी भीतीनं गारठून जायचे! घरच्या मंडळींना पण खूप धास्ती वाटायची. पण का कुणास ठाऊक मला खूप आवडतो हा परिसर! कदाचित माझे पूर्वज इथेच लढले, इथेच जिंकले, इथेच हरले, इथेच सारा इतिहास घडला म्हणून असेल..."

"पण तुम्हाला इथल्या श्वापदांची भीती नाही वाटत?" हनुमंतानं आर्श्चयाच्या भरात विचारलं.

"भीती? हनुमंता, मला भीती वाटे. पण कधी कधी. व्यवसाय, बायको, मुलं, आई-वडील यांच्यात गढलेला असताना त्यांच्या विरहाची भीती वाटे. जंगलात फिरताना कुठून एखादं श्वापद झडप घालील अन् आपल्या सर्वस्वाचा क्षणात अंत होईल अशी भीती वाटे! पण अलीकडे जाणवू लागलंय स्वत: तयार केलेल्या विचारविश्वाच्या, भावविश्वाच्या पलीकडे खरे 'आपण' कायम असतोच! खरं तर जिथे तिथे आपण असतोच. स्थळ-काळातीत आणि गुणरूपातीत अस्तित्वाची जाणीव झाल्यापासून मला भीती वाटेनाशी झालीय. अजूनही कधीमधी भीती वाटते. पण ती श्वापदांची नाही. उलट स्वत्वापासून, सत्यापासून दूर धावू पाहणाऱ्या स्वत:च्या वृत्तीची भीती वाटते."

"कमलेंद्रगारू, तुम्ही नेहमीच काहीतरी वेगळंच सांगता. तुमच्या

मनाची तुम्हालाच कशाला हवी भीती. तुमच्या मनाला वाटेल ते तुम्ही केलंत तर बिघडलं कुठे?'' हनुमंतानं कमलेंद्रगारूचं न पटून म्हटलं.

हनुमंताच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून कमलेंद्र म्हणाला, ''इथे फिरताना मला खूप आनंद वाटतो, खूप शांत वाटतं, स्वस्थ वाटतं! म्हणून आज पाय नेतील तिकडे जायचं ठरवून भटकत होतो! तुम्ही दिसलात म्हणून हाक मारली. काय चाललंय एवढ्या एकांतात? खेकड्यांची मेजवानी चाललीय वाटतं?''

लहानू हसला. भाजलेल्या खरपूस खेकड्यांचा वास आल्यानं त्याच्या तोंडाला पाणी सुटलं होतं. त्यानं खेकडा पुढे करून कमलेंद्रला म्हटलं, ''कमलेंद्रगारू खाणार का जंगलचा मेवा?''

त्यावर हसून कमलेंद्रनं म्हटलं, ''लहानू तुम्ही तर भाजून खाता, कच्चा खेकडा खाताना पाहिलायस का? कच्चे झिंगे खातात... मी पण पाहिलेत कच्चे ऑईस्टर्स्र खाऊन!''

लहानू खदाखदा हसला. त्याला वाटलं तो विनोद आहे. कमलेंद्रानं त्याला जपानी आणि चिनी लोकांच्या स्वयंपाकाबद्दल सांगितलं तेव्हा त्याला जाणवलं की शहरी लोक आपणाहून फार वेगळे नसतात! त्याला मौज वाटली.

कमलेंद्रानं व्यवस्थित साफ करून खेकडा खायला अन् विशेष म्हणजे रुची घेऊन खायला सुरुवात केली तेव्हा हनुमंता आणि लहानू दोघांनाही अचंबा वाटला. हनुमंतानं कसाबसा एक लहानसा तुकडा खात कमलेंद्राकडे पेपर देत म्हटलं, ''कमलेंद्रगारू कष्टकरी मुक्ती मोर्चाला एवढ्या विरोध कसा करतात सारेजण? न्यायाला कुणीच कसा वाली नाही?'' त्याच्या बोलण्यात अस्वस्थता होती.

''हनुमंता पेपर वाचलाय मी. दोन-तीन गोष्टी लक्षात घ्यायला हव्यात. आदिवासींना न्याय मिळू नये, असं फक्त त्यांना लुटणाऱ्यांना वाटतं. कामगार संघटना व डाव्या पक्षांना खेड्यातील, जंगलातील परिस्थितीविषयी खरी माहितीदेखील बऱ्याचदा मिळत नाही. दहशतवादाच्या विरोधात असतात ते. आदिवासींच्या विरोधात नाही. फक्त आदिवासींचं हित साधण्यासाठी त्यांच्यापाशी पैसा व मनुष्यबळ नाही एवढंच!''

त्याच्या बोलण्यानं लहानू वैतागला. ''एवढंच कसं म्हणता कमलेंद्रगारू? हे काय कमी झालं?''

''नाही. मी तुम्हाला फक्त वस्तुस्थिती सांगतोय. सरकारदरबारी, मोठमोठ्या उद्योगात आणि विविध योजना आखणारे व राबवणारे बहुसंख्य सत्ताधारी संकुचित स्वार्थासाठी लाखोंच्या हिताचा बळी देतात. त्याचप्रमाणे बहुसंख्य कामगार, कारकून, शेतकरी, छोटे व्यावसायिक स्वत:चा संसार इतरांचं फारसं नुकसान करता कसाबसा सांभाळतात. साहजिकच आदिवासींवरील अन्यायाकडे लक्ष द्यायला शक्ती आणि सवड कुणाला आहे ? ते स्वत:च पिचलेले असतात. हतबल असतात. आणि एक विचारू? असा का विचार करीत नाही, की इतरांच्या हिताकडे आदिवासी स्वत: किती लक्ष देतात?''

''पण जे स्वत:च एवढे नाडलेले आहेत त्यांना असं कसं विचारता तुम्ही?'' हनुमंताच्या शब्दात उघड नाराजी होती.

''हनुमंता दुसऱ्या कुणी कुणाला जाब विचारणं निरर्थक आणि चूक आहे. जाब आपणच आपल्याला विचारायचा असतो. तुम्हाला क्रांतीची गरज असेल तर तुम्हाला हा प्रश्न स्वत:ला विचारावाच लागेल. पूर्णपणे नाडला गेलेला असो अगर सर्वतोपरी इतरांना नाडणारा असो... व्यापक दृष्टी ही कुणा एकाची जबाबदारी नाही. पण क्रांतीची गरज ... न्यायाची गरज ज्यांना तीव्रपणे जाणवते, त्या अन्यायात होरपळणाऱ्यांच्यावर साहजिकच व्यापक दृष्टी अंगीकारून न्यायासाठी लढण्याची अधिकाधिक जबाबदारी पडते. उलट तेच जर न्यायाच्या लढाईत, शक्तीसाठी इतरांच्या तोंडाकडे पाहू लागले तर ते किती विसंगत आहे! खरं की नाही?''

लहानूला ते कळलं नाहीच पण हनुमंताही 'आ' वासून प्रश्नार्थक नजरेनं त्याच्याकडे पाहत राहिला.

''हनुमंता,'' कमलेंद्रानं शांतपणे म्हटलं, ''मागेदेखील तुला मी म्हटलं होतं की स्वत्वाची व सत्याची जाणीव प्रचंड सामर्थ्यवान असते. सर्वश्रेष्ठ असते. काळावर सत्ता चालवणारी असते. उदात्ततम असते. ती जाणीव दुर्लक्षून तुम्ही कुणा मुर्खाच्या सल्ल्यानं स्वत:च्या पायावर धोंडा घालून घेता आहात. त्यामुळे तुमच्या पदरी बदनामी, विरोध आणि अपयश येतंय आणि येणार!''

त्याच्या बोलण्यानं हनुमंता आणि लहानू दोघे अस्वस्थ झाले. बेचैन

झाले.

"पण ह्या सगळ्यातून मार्ग कसा काढायचा?"

"अन्यायाचा मुकाबला म्हणजे निव्वळ मुडदे पाडणं नव्हे. शतकानुशतके अन्याय सहन करणाऱ्यांनी किमान ह्या घडीला तरी त्यांच्यावर अन्यायात होरपळण्याची ही परिस्थिती का ओढवली याचा विचार करायला हवा!" कमलेंद्रच्या आवाजात निर्धार आणि जोर होता.

"अन्याय करणाऱ्यांचा अमानुषपणा हेच त्याचं उत्तर आहे." अचानक हनुमंताचा आवाज त्याला नकळत चढला.

"नाही हनुमंता! हे अर्धसत्य आहे. दुबळेपणानं, अगतिकतेनं, दुसऱ्यांच्या मदतीनं स्वत:चे दोष न बघता स्वत:ला चुचकारत क्रांतीची स्वप्नं पाहणारे तुमच्यासकट सारेजण करंटेच आहेत व अशानं तुम्ही कधीच यशस्वी होणार नाही. हिंस्रपणानं जर दहशत पसरविण्याचा प्रयत्न केलात तर अल्पावधीत तुम्हाला चिरडून टाकलं जाईल... म्हणून म्हणतो हनुमंता, अजून लक्षात घे!" कमलेंद्रच्या शब्दात विलक्षण तळमळ होती.

"कमलेंद्रगारू! पण करायचं काय ते सांगा ना! तुम्ही जे जे सांगता ते सारं बरोबर की चूक माहीत नाही. पण ते प्रत्यक्षात कसं आणायचं? त्यानं लोकांची परिस्थिती कशी सुधारेल याचा काहीच बोध होत नाही..." कमलेंद्रची तळमळ जाणवलेला पण अस्वस्थ झालेला हनुमंता कळवळून म्हणाला.

कमलेंद्रला जाणवलं की खरोखरच जोपर्यंत प्रचीतीला नेमक्या शब्दांची आणि शब्दाला नेमक्या कृतीची वाट मिळत नाही तोपर्यंत आत्मज्ञानाची अमृतधारा उदात्त माणुसकीची बाग फुलवू शकणार नाही. एकीकडे परिस्थितीनं गांजलेले आणि दुसरीकडे परिस्थितीमुळे मदोन्मत्त व बेभान झालेले असे लोक निखळ आनंदाला पारखेच राहणार. पण त्यालाही या क्षणी कळत नव्हतं की लक्षावधी प्रकारच्या विभिन्न परिस्थितीत जगणाऱ्यांसाठी आत्मज्ञानाची वाट मोकळे करणारे, कोणत्याही परिस्थितीत प्रभावीपणे आचरणात आणता येतील असे कोणते कार्यक्रम आहेत. ऊर्ध्वगामी क्रांतीची साधनं कोणती? त्याला डॉ. टेलरच्या बरोबर झालेली चर्चा आठवली. दुसऱ्या क्षणी त्याला जाणवलं की आत्मज्ञानाच्या आशयघन तत्त्वज्ञानाला अधिक व्यवहार्य आणि अधिक अचूक बनवण्याचं जबरदस्त

आव्हान त्याच्यापुढे उभं होतं! एकदम आत प्रकाश पडावा तसा त्याला साक्षात्कार झाला. हनुमंताच्या प्रश्नाचं उत्तर मिळालं. उत्तेजित झालेला कमलेंद्र म्हणाला, ''ऐक हनुमंता! ऐक लहानू! आपण काय करायचं ते ऐका. हा सारा परिसर उजाड होतोय, दुष्काळी होतोय, आपली काळी आई मृत्युपंथावर आहे. तिच्या बचावासाठी लढायचं आपण. इथला शेतकरी, इथला आदिवासी, इथला प्रत्येक माणूस एवढचं नव्हे तर शहरातल्या बहुतेकाना पोसणारी आपली आई चुकीच्या धोरणांचा, स्वार्थांध सत्ताधाऱ्यांच्या रानटीपणाचा, बळी ठरतेय. आज आपण सर्व शक्तीनिशी हे रोखण्याच्या लढ्यात उतरायचंय. केवळ आपलं नव्हे तर सर्वांच हित लक्षात घेऊन!''

''पण यात आमचा फायदा काय?'' लहानूनं शंका विचारली.

''फायदा? अरे फायद्यासाठीच तर लोक राक्षस बनतात. नरपशू बनतात. सामूहिक स्वार्थाच्या अधिष्ठानानंही पुढे चळवळी भ्रष्ट होतात. आपला हेतू, आपलं अधिष्ठान आहे सर्वांच्या कल्याणाचं. अगदी सर्वांच्या प्रगल्भतेचं आणि सामर्थ्याचं!''

कमलेंद्रगारूंचं म्हणणं हनुमंताच्या लक्षात आलं. त्याला ते पटलं. पण त्यानं वाचलेल्या मार्क्सवादाच्या पुस्तकातील श्रमिकांची एकजूट आणि त्यांचा लढा राजकीय आणि आर्थिक सत्तेशी निगडित होता. कमलेंद्रगारूंच्या लढ्याच्या कल्पनेत तसं काहीच दिसत नव्हतं. लहानूला ते सारं आता नीट कळेनासं झालं होतं. फक्त काळ्या आईचा बचाव करण्याचं कमलेंद्रगारूंचं आवाहन त्याला बरोबर वाटलं. अगत्याचं वाटलं. हनुमंतानं म्हटलं, ''कमलेंद्रगारू, पण अशानं सत्ता कशी मिळवता येईल? अन् जोपर्यंत सत्ता नाही, तोपर्यंत अन्याय दूर होण्याची आशाच नाही!''

हनुमंताच्या बोलण्याचा कमलेंद्रला आता राग येऊ लागला. किंबहुना कोणत्याही कार्यात किती विघ्न येतात या विचारानं तो स्वत:वरच चिडला. त्याला एकीकडे सारी परिस्थितीच घृणास्पद वाटत होती तर दुसरीकडे शॉर्ट कट्स् काढून सवंग लोकप्रियता आणि सत्ता मिळवणाऱ्या किंवा निरर्थक लढ्यात लोकांना गुंतवणाऱ्या नेतृत्वाबद्दल भयंकर चीड येत होती. पण कमलेंद्रानं प्रयासानं स्वत:च्या मनावर संयम ठेवला. नंतर प्रत्येक शब्दावर जोर देत त्यानं म्हटलं, ''सध्या ज्यांच्याकडे सत्ता आहे तशी सत्ता मिळून

काही फायदा नसतो. कारण अशा लोकांकडे सदसद्विवेक जागृत ठेवून कारभार करण्याची सत्ता नसते फक्त हीन स्वार्थ साधण्याची सत्ता असते! त्याचप्रमाणे सदसद्विवेकपूर्ण, कल्याणकारी अशी प्रभावी सत्ता केवळ हत्यासत्र आणि दहशतवाद यांनीही मिळणार नाही, कारण त्या कृतींच्या मुळाशी अज्ञानजन्य वैराचं विष असत! शिवाय दहशतवाद निपटून काढण्याची शक्ती सध्याच्या सत्ताधाऱ्यात आहे. आज सत्ता हवी आहे ती सदसद्विवेक जागृत ठेवून कारभार करण्याची सत्ता! अशी सत्ता प्राप्त होईल. गाव, देश, जग अशा सर्व पातळ्यांवरील प्राप्त होईल. अत्यंत साधेपणानं जगलेल्या गांधीजींनी सर्व धर्म आणि विचारसरणीतील अत्युच्च एकात्मता आचरणात आणण्याचा युगप्रवर्तक प्रयत्न केला होता. त्यांच्या विचारांचा आणि चळवळींचा विकासच व्यक्ती, गाव, प्रांत, देश आणि जग या सर्व पातळीवर सर्वकष कल्याण प्रत्यक्षात आणू शकेल.''

''पण कमलेंद्रगारू, जगातले बहुउद्देशीय उद्योग, प्रचंड शस्त्रास्त्र साठे, अतिविकसित तंत्रज्ञान यांच्या पार्श्वभूमीवर जग पाहून आलेल्या तुमची गांधींवर, त्यांच्या मार्गावर भिस्त कशी?'' हनुमंतानं उठून ओंजळीनं पाणी पिऊनं विचारलं.'

बाजूला गप्प बसलेल्या लहानूकडे पाहत कमलेंद्र म्हणाला, ''हनुमंता, विवेकशून्य विज्ञान व तंत्रज्ञान म्हणजे विश्वाचा नाश जवळ आणणारा भस्मासुर आहे! माझी भिस्त माणसाचा विवेक व आंतरिक सामर्थ्य जागृत करण्यावर आहे. विवेक जागृत होताच शिक्षण, राजकारण, अर्थकारण व विज्ञानाची आत्मघातकी दिशा निश्चित बदलेल. माझी खात्री आहे की कोणताही वैचारिक तपशील, रूढी व धोरणांची जंत्री न लादणारी धर्म, अर्थ, काम, मोक्षाची तत्त्वच प्रगल्भ आणि संपन्न जग अस्तित्वात आणतील.'' बोलता बोलता कमलेंद्रचे डोळे विलक्षण तेजानं चमकू लागले, जणू काही त्याच्या डोळ्यांना भविष्यकाळ स्पष्टपणे दिसत होता! मध्येच काहीतरी आठवल्याप्रमाणे कमलेंद्रानं एकदम म्हटलं, ''जगामध्ये ह्या मार्गाला पर्याय नाही. सशस्त्र उठाव करून मिळवलेल्या समाजवादी देशातल्या सत्तांचं काय झालय पाहा. ज्याप्रमाणे भांडवलशाही जीवन रोगट बनवतेय त्याच्याप्रमाणे यांत्रिक समाजवादही! त्यामुळे सशस्त्र लढा हे मानवकल्याणाच्या मार्गातील उपयुक्त साधन ठरत नाही. ती एक घातक शॉर्टकट बनते, हे इतिहास सांगतो,

वर्तमानही सांगतो!'' बोलता बोलता कमलेंद्र उठला. त्याला यापेक्षा अधिक बोलण्यात स्वारस्य नव्हतं.

तो उठला हे पाहून हनुमंताही उठला. त्याच्या मागोमाग लहानू उठला. हनुमंतानं म्हटलं, ''कमलेंद्रगारू मला बरंचसं कळलंय. दुष्काळविरोधी आंदोलनाची सुरुवात या क्षणापासूनच सुरू करतो.''

ते ऐकताच कमलेंद्र हर्षभरित झाला. म्हणाला, ''हनुमंता....... नव्या युगाच्या अवतरणाला आता मात्र वेळ नाही लावायचा! स्वधर्म आणि धर्म-अर्थ-काम-मोक्षाची संजीवनी आपण जगभर पसरवू... ही संजीवनी सर्वदूर पसरवू!''

कमलेंद्र आणि हनुमंताला असं उत्साही झालेलं पाहून लहानूच्याही अंगी सिंहाचं बळ संचारलं!

■

स्वस्थ मनानं आणि दृढपणे कमलेंद्रानं कामाला सुरुवात केली. विचार शब्दबध्द करता करता भेटणाऱ्यांपाशी ते हळूहळू मांडायला सुरुवात केली.

अहंकार, हितसंबंध, संकुचित वृत्ती, स्वार्थ, रूढी, अंधविश्वास यांचे अडथळे मध्ये होतेच. पण हे सारे अडथळे पार करीत करीत अनेक जण त्याच्या निकट येऊ लागले.

कुणीही मोठ्ठा त्याग करावा असं अप्रत्यक्षपणे देखील सुचवीत नसल्यानं मनातली धास्ती नष्ट होऊ लागली होती.

रूढी, संकेत, परंपरा, यांच्या मुळाशी जाऊन त्यांचा मथितार्थ जाणून घेण्याच्या वृत्तीमुळे कर्मठ माणसांनाही त्याच्याबद्दल आत्मीयता वाटू लागली. वाया गेलेले म्हणून शिक्कामोर्तब झालेले तरुण त्याच्या सहिष्णू आणि मृदू वागण्यानं त्याच्यापाशी मोकळेपणानं बोलू लागले. स्वत:च्या अडचणी मांडू लागले. कमलेंद्र हळूहळू लोकांच्या आकर्षणाचं केंद्र बनत चालला.

अर्थात विद्वत्तेचा अनाठायी गर्व असणारे, केवळ क्षुद्र राजकीय स्वार्थातच बुडालेले, आर्थिक स्वार्थात अंध झालेले, अती कर्मठ धर्मांध, अनेक प्रकारचे संशयात्मे आणि छिद्रान्वेषी लोक त्याला पाण्यात बघत. हे हितशत्रू वगळता इतर लोक त्याच्याभोवती गोळा व्हायला आणखीही एक कारण होतं! आत्मज्ञानाधिष्ठित संस्कृतीचा प्रत्यक्ष आविष्कार त्यांच्या मार्गदर्शनाखाली

सुरू झाला होता. शिक्षण, प्रयोग, विज्ञान धर्म, व्यापार, कारागिरी, क्रीडा अशा साऱ्या क्षेत्रात आत्मज्ञानाधिष्ठित संस्कृती बहरत होती. विशेष म्हणजे आता, राजवाड्याचा संपूर्ण परिसर जीवनावश्यक अशा फुलझाडांच्या आणि फळझाडांच्या लागवडीखाली आला होता. नित्योपयोगी फळं, भाज्या, कडधान्य इत्यादींप्रमाणेच त्यानं आदिवासी जडीबुटीवाले आणि वैद्य यांच्या सहकार्यानं आयुर्वेदिक औषधी वनस्पतींची लागवडदेखील केली होती.

कमलेंद्राच्या मनातल्या अटकळीनुसार त्याचं राजवाड्याच्या परिसरातलं प्रत्यक्ष काम अनेकांना अपूर्व वाटलं आणि ते मार्गदर्शनासाठी त्याच्याकडे येऊ लागले होते. त्या सर्वांना कमलेंद्र स्वतःचा दृष्टिकोन आणि विचार सांगू लागला, तसा त्यांच्या मनातदेखील उत्साह संचारत गेला.

पण कमलेंद्रच्या मनात, त्यानं हनुमंताला सांगितल्याप्रमाणे त्या संपूर्ण परिसरातील जमीन लागवडीसाठी आणणं, दुष्काळ प्रतिबंधक योजना राबवणं, पाण्याचं नियोजन करणं हे प्राधान्यानं करायचं असल्याने तो बाकी साऱ्या बाबींबरोबरच या महत्त्वाच्या मुद्याविषयी लोकांशी जास्त बोलायचा.

कालांतरानं हे लोण आजूबाजूच्या गावात पसरलं. विविध क्षेत्रातल्या सभा-संमेलनातून लोक मार्गदर्शनासाठी कमलेंद्रला बोलावू लागले.

शिक्षक, वकील, डॉक्टर, शेतकरी, जमीनदार, शेतमजूर, राजकारणी, सरकारी नोकर, बहुतेक क्षेत्रातले लोक त्याच्याकडे आकृष्ट होऊ लागले. स्वार्थ व परमार्थ दोन्ही साधण्याची युक्ती कमलेंद्रगारूकडे आहे... असं जो तो भेटणाऱ्यापाशी बोलू लागला. गावागावातून वाहू लागलेली चैतन्याची गंगा नवी उमेद, नवा आत्मविश्वास यांनी लोकांचं जीवन टवटवीत करू लागली. निर्भयता, सहिष्णूता, करुणा, परखडपणा, शिस्त, कर्तव्यपालन, प्रामाणिकपणा याचबरोबर निरलस अभ्यास, विचार, चिंतन, सर्जनशीलता, उत्पादन यांची बीजं पेरली जाऊ लागली. आत्मज्ञानाचं सोपं आणि सर्वांना सहजसाध्य असं साधन नामस्मरण सर्वमान्य होऊ लागलं.

या दरम्यान वर्तमानपत्र, प्रिटिंग प्रेस आणि अत्याधुनिक ग्रंथालय स्थापन झालं. दृष्टिकोन प्रगल्भ करणारं, विचार विकसित करणारं, मनाचं सामर्थ्य वाढवणारं, अंतःकरण विशाल करणारं, वागणूक निर्दोष करणारं, शरीर बळकट करणारं, उत्पादकता व सर्जनशीलता जोपासणारं शिक्षण देण्यासाठी व सर्व क्षेत्रात पोचण्यासाठी या साऱ्या बाबी आवश्यक होत्या.

पण त्याचबरोबर शासनकर्त्यांच्या सदसद्विवेकाला आवाहन करण्यासाठीही हे सारं आवश्यक होतं.

शासनाच्या सदसद्विवेकाला आवाहन करण्याचाच एक भाग म्हणून आजचा मोर्चा आयोजित केला होता. कष्टकरी मुक्ती मोर्चाचे कार्यकर्ते, गावकरी, आदिवासी असा सर्वांचा हा मोर्चा निघाला.

कमलेंद्र मोर्चात झपाझप चालत होता. त्याच्या बरोबरच्यांना आश्चर्य वाटत होतं की एवढा सुखवस्तू माणूस... पण ह्याच्या चेहऱ्यावर एवढ्या त्रासामध्येही त्रासिकपणाचा, तक्रारीचा सूक्ष्मसा भावदेखील कसा नाही?

डोक्यावरच्या रणरणत्या उन्हाची किंवा पायाखालच्या रखरखत्या मातीची कमलेंद्रला तमा नव्हती. शारीरिक त्रासांची नव्हती, तशीच निंदास्तुतीचीही पर्वा नव्हती. डोंगरपठारावरच्या त्या पायवाटेच्या जवळपास वस्तीही नव्हती. सगळा उघडा-बोडका माळ निर्मनुष्य होता. दुष्काळामुळे कैक ठिकाणी भेगा पडलेली जमीन विद्रूप आणि भकासवाणी वाटत होती. सारी सृष्टी करपवून टाकणारं निसर्गाचं ते रुद्रभीषण दाहक तांडव माणसाची देखील कसोटी पाहणारं होतं. पावलोपावली अंगांगाची काहिली होत होती. घशाला कोरड पडत होती.

कमलेंद्राच्या मनांत आलं, कुठे हिरव्यागार मळ्यातून ट्रॅक्टर घेऊन फिरणारे, यांत्रिक नांगरणी करणारे बलदंड अमेरिकन शेतकरी आणि कुठे अन्नान्नदशा होऊन दाही दिशा फिरणाऱ्या अस्थिपंजर भारतीय शेतकऱ्यांना असहायपणे बघणारी पोळून निघणारी ही धरणीमाता! उन्हापेक्षाही दाहक वास्तव!

कमलेंद्रानं सहज चेहऱ्यावरून हात फिरवला. पोळलेल्या भागी सौम्य वेदना जाणवली आणि किंचित चेहऱ्यावरही उमटली.

हनुमंताच्या ते लक्षात येताच त्याला वाईट वाटलं. न राहवून त्यानं म्हटलं, "कमलेंद्रगारू! कशाला तुमचं सुखासीन जीवन सोडून या खाईत उडी घेतलीत? आमची गोष्ट वेगळी. एक तर हा लढा हा जीवनसंघर्ष न चुकणारा आहे. आणि शिवाय त्यात येणारे भोग भोगण्याची ताकदही आम्हाला आहे!"

प्रसन्नपणे हसून कमलेंद्र उत्तरला, "हनुमंता, ही तर कुठे सुरुवात आहे.

शिवाय पुन्हा लक्षात घे, हा कुणा एका वर्गाचा किंवा गटाचा सामूहिक स्वार्थासाठी केलेला संघर्ष नाही. हा यज्ञ आहे सर्वांच्या कल्याणाचा. तो करताना वाट्याला आलेले भोग आत्मप्रत्ययाची तृप्ती देतात!''

दुष्काळाच्या कारणांबद्दल बोलत बोलत ते इतर आदिवासी जमलेल्या ठिकाणी आले. सर्व अडी-अडचणींवर मात करून तिथे जमलेल्या आदिवासींना पाहून कुणाचंही मन हेलावून गेलं असतं. लहानूनं त्यांना जेव्हा सारं समजावून दिलं तेव्हा खरोखरच आदिवासी इतरांच्या अडचणींबद्दल केवळ विचारच करू शकतात असं नव्हे, तर ठामपणे त्यांच्या पाठीशी कसे उभे राहू शकतात त्याचं ते प्रात्यक्षिक होतं. स्वत:च्या पोटाला चिमटा घेऊन दुसऱ्यांना खाऊ घालणाऱ्या महान संस्कृतीचा महान आविष्कार त्या अशिक्षित आणि शहरी संस्कृतीचा गंध नसलेल्या ''असंस्कृत'' आदिवासींनी केला होता!

कमलेंद्रच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. त्याचे डोळे विलक्षण तेजाने चमकू लागले. माणुसकीच्या महासूर्याचा तो प्रत्यय घेताच त्यांच्या डोळ्यांतून ते तेज ओसंडू लागलं. उद्याची पहाट डोळ्यांत उमटली.

कमलेंद्रानं पाहिलं, आदिवासींमध्ये काहीजण अनवाणी होते! एवढंच नव्हे काही स्त्रिया त्यांच्या अंगावर पिणाऱ्या बछड्यांना घेऊन आल्या होत्या. ते सारे आले होते कमलेंद्राच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन, काळ्या आईचा बचाव करण्यासाठी, दुष्काळग्रस्तांना साथ देण्यासाठी... कमलेंद्रला ते पाहून अक्षरश: भडभडून आलं!

त्यांना पाहून आनंदलेल्या आदिवासींना उद्देशून कमलेंद्रानं सर्वप्रथम त्या सर्वांचं अभिनंदन केलं. आणि त्यांचा गौरव केला. त्यांच्या निस्वार्थीपणाची, धैर्याची आणि सहनशक्तीची प्रशंसा करून त्यानं त्या सर्वांना म्हटलं, ''आज इतिहास घडतो आहे. तुमच्या ह्या शक्तीचं सर्वजण प्रत्यंतर लवकरच तुम्हाला आल्याशिवाय राहणार नाही. अडचणी येतील, जुलूमही होईल परंतु काळ्या आईची ही सेवा समृध्दी आणल्याशिवाय रहाणार नाही, सर्वांच्या कल्याणाचं महाद्वार उघडल्याशिवाय राहणार नाही.''

त्याचा जयजयकार होत असताना अजिबात वेळ न दवडता त्यानं गावाकडे निघण्याची सूचना केली.

सारेजण दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांच्या जमावापाशी आले. दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांनी त्यांचं उत्स्फूर्त स्वागत केलं. ते सर्व मिळून सहा-सातशे जण दुष्काळग्रस्त साह्य समितीच्या कार्यालयासमोर आले.

दुष्काळी भागातील रोजगार हमी, ट्यूब वेल्स, पाझर तलाव इत्यादी अनेक योजनांमध्ये प्रचंड भ्रष्टाचार होता आणि नियोजनशून्यता होती. मोर्चा घेऊन ह्या भ्रष्टाचाराच्या विषयी निषेध नोंदवणं आणि तिथल्या अधिकाऱ्यांना निवेदन देणं एवढाच कार्यक्रम कमलेंद्रानं आखून दिला होता.

परंतु तिथे मोर्चा पोचून स्थिरस्थावर होतो एवढ्यात पोलिसांच्या गाडीचे कर्णे वाजू लागले. काही समजायच्या आतच वेगानं तिथे पोचलेल्या निळ्या व्हॅन्समधून हेल्मेट घातलेल्या पोलिसांनी धडाधड उड्या टाकल्या आणि हातातील जाडजूड दंडुक्यानी अक्षरश: दिसेल त्याला ते वाट्टेल तसे बडवत सुटले.

कमलेंद्र त्या प्रकारानं अवाक् झाला. त्याचवेळी त्याच्यासमोरच एका तरुण बाईला एक पोलिस गुरांसारखं फोडून काढू लागला. त्याच्या मारानं ती उताणी पडली आणि स्तनपान करणारं तिचं अर्भक तिच्या छातीवर पडलं. कमलेंद्रानं ते पाहताच क्षणार्धात त्या बाईच्या दिशेने झेप घेतली. तत्क्षणीच डोक्यात तडाखा बसल्यानं त्याच्या डोळ्यांसमोर काजवे चमकले. वेदनेने कळवळतानाच अंधारी आला. पण त्याही स्थितीत आता त्या अर्भकावरच फटका बसतोय हे जाणवताच तो जिवाच्या आकांतानं ढालीप्रमाणे त्या अर्भकावर पडला. कमलेंद्र पडताच तो फटका त्याच्या पाठीत बसला. आणि नंतर त्याच्या पाठीत फटक्यावर फटके बसतच राहिले.

■

इकडे फ्रान्सिसला जेव्हा घडली हकीकत कळली तेव्हा त्याला आसुरी आनंद झाला. त्यानंच या मोर्चामध्ये हिंसाचाराची शक्यता वर्तवून पोलिसांना भडकावलं होतं. कमलेंद्रचं नेतृत्व पहिल्याच प्रयत्नात चिरडून काढण्याची त्याची ही युक्ती होती.

पण कुणालाही आपला संशय येऊ नये म्हणून तो जखमींना दाखल केलं होतं त्या रुग्णालयात गेला. तिथे त्याला कळलं की कमलेंद्राचं नेतृत्व मोडून पडण्याऐवजी डोकं फुटलंय आणि पाठ मोडलीय. पण सगळ्यांची

हृदयं त्यानं संपूर्णपणे आणि कायमसाठी काबीज केलीयत. पण वरपांगी यातलं काहीच न दाखवता कमलेंद्रची चौकशी करून तो परत गेला. कारण कमलेंद्रला भेटायला मनाई होती.

कमलेंद्रला शुध्द आली तेव्हा क्षणभर त्याला काहीच कळेना. त्यानं मान उचलण्याचा प्रयत्न केला तेंव्हा त्याला मरणप्राय वेदना झाल्या. काही काळ डोळे मिटून को तसाच पडून राहिला. काही क्षणांनी कामिनीचा काळजीनं भरलेला आवाज त्याच्या कानी आला.

"कमलेंद्र, कमलेंद्र......"

हळूहळू त्यानं पुन्हा डोळे उघडले. कामिनीच्या डोळ्यात तीव्र चिंता होती... त्यानं बोलण्याचा प्रयत्न केला तशी त्याच्या कपाळावर हळुवारपणे हात फिरवीत तिनं त्याला स्वस्थ राहयला विनवलं. पण त्याचवेळी त्याच्या घशाला कोरड पडलेली लक्षात येताच तिनं चमच्यानं त्याला पाणी भरवलं.

आवंढा गिळून कमलेंद्रानं विचारलं, "ते बाळ कसं आहे? त्याची आई कशी आहे? बाकीचे कसे आहेत?"

"सुदैवानं सारे ठीक आहेत. कुणी दगावलं नाही..." त्याही स्थितीत त्याला हनुमंताचा आवाज ओळखू आला. ... पण पुन्हा ग्लानी आली.

तेवढ्यात बाजूला फोनची घंटा वाजली. कामिनीनं फोन घेतला. तातांचा फोन होता. तिनं मोठ्या धीरानं त्यांना सारं ठीक असल्याचं सांगून त्याची समजूत घातली आणि फोन ठेवून दिला.

कमलेंद्रला शुध्द आल्यानं प्रथमच कामिनीच्या मनावरचं दडपण थोडं कमी झालं होतं. आज दुपारी दोन वाजता झाला प्रकार कळविणारा हनुमंताचा फोन आल्यापासून तो आता रात्रीपर्यंत तिची सारखी धावपळ चालली होती आणि कमलेंद्रच्या काळजीनं जिवाची घालमेल होत होती. दिवसभर पोलिस, वकील, डॉक्टर, नर्सेस, जखमी आदिवासी सर्वत्र तिला जातीनं लक्ष द्यावं लागत होतं. पण दिवसेंदिवस वैयक्तिकदृष्ट्या अधिकाधिक उदात्त होत चाललेल्या अन् आत्ता बेशुध्द असलेल्या कमलेंद्रच्या अंतर्मनाला आपण हे केल्यानंच समाधान वाटेल याची तिला खात्री होती. पण सर्वांना आधार दिल्यानंतर या घडीला मात्र मनावरचं ओझं कमी होताच तिच्या मनाचा बांध फुटला.

तिला हुंदका फुटला तसा हनुमंता एकदम हलून गेला. त्याला काय

करावं सुचेना. काय बोलावं कळेना...

■

पोलिसांच्या त्या प्राणघातक लाठीमारातून कमलेंद्र बचावलाच, पण फ्रान्सिसला जे जाणवलं त्यापेक्षा कितीतरी पटींनी कमलेंद्रच्या उदात्ततेची रसभरित गुणवर्णनं सर्वदूर पसरली. काही दिवसानंतर त्याला डिसचार्ज मिळाला. आता तो थोडा हिंडू-फिरू लागला होता. जखम झालेल्या जागी केस कापल्यामुळे तयार झालेला डोक्यावरील हिरवट पट्टा आता केस वाढू लागल्यानं काळसर झाला होता. टाक्यांच्या जागी तयार झालेले लाल ठिपके काळे पडले होते. आरश्यात पाहिलं तेव्हा डोक्यावरील जखमेचा पुढचा भाग तेवढा दिसत होता. पोलिसांच्या लाठीमारानं रक्त साकळलेलंही त्याला दिसलं. रेलून कॉटवर बसताना त्याला पाठीत कळ आली. नकळत तो कण्हला.

महाराज सत्येंद्र त्याच वेळी आत आले. प्रथम त्याला पाहिला तेव्हा त्याच्या बाबूची ती स्थिती पाहून त्यांना स्वत:लाच जखमा झाल्यासारखं वाटलं होतं. त्यावेळी मनात आलं होतं की आज ते राजे असते आणि फौजफाटा असता तर कुणाची छाती झाली नसती असं करण्याची. केवळ स्वार्थांध सत्तेपोटी नि:शस्त्र व्यक्तीवर असा हल्ला करणाऱ्याला तोफेच्या तोंडी नाहीतर हत्तीच्या पायाखाली दिला असता त्यांनी! पण आज ते नामधारी महाराज होते. असहाय होते. साहजिकच तेव्हा ते कमालीचे खिन्न झाले होते. आज त्यांना पाहून कमलेंद्र हसला तेव्हा त्याच्याकडे पाहून त्याची तब्येत सुधारताना पाहून त्यांना थोडं बरं वाटलं. तरीही त्यांनी त्याची चौकशी केली. कारण तो हसला तरी त्याच्या चेहऱ्यावरची वेदना त्यांच्या नजरेतून सुटली नाही. "ताता, सारं काही त्यांनी त्यावेळी ठरवून केलं. पण नरपशुसारखं हे वागणं अनपेक्षित होतं. वाईट वाटतंय ते मी नेतृत्वात कमी पडलो त्याचं! मला अंदाज आला नाही याचं. माझ्यापायी इतक्या लोकांना मार खावा लागला याचं!"

"पण कमलेंद्र आपल्या सध्याच्या हतबल परिस्थितीत याहून आणखी वेगळं काय घडणार? या मार्गानं असंच नाही का घडणार?"

"नाही! सत्याच्या मार्गात असे क्षुल्लक प्रसंग आले म्हणून खचून जायचं कारण नाही. पुढच्या वेळी अधिक विचारांती विवेकपूर्ण पावलं

उचलायची एवढंच!''

कामिनीचा आवाज ऐकून महाराज चमकले. कमलेंद्र जखमी झाला त्या क्षणापासून सारी सूत्रं हाती घेतलेल्या कामिनीचा तो दृढनिर्धार पाहून त्यांचा स्वत:च्या कानांवर विश्वास बसेना. तिनंच साऱ्या जखमींच्या उपचारांपासून ते कायदेशीर पावलं उचलण्यापर्यंत सारी जबाबदारी पेलली होती हे खरं. पण स्वत:च्या पतीची अशी दशा असताना एकादी स्त्री सत्यावर एवढा प्रबळ विश्वास दाखवते, लढण्यासाठी सिध्द राहू शकते याची त्यांना एरवी कल्पनाही करता आली नसती.

''कामिनी, कमलेंद्राचं हे असलं धाडस म्हणजे नरभक्षक वाघाच्या शिकारीला नि:शस्त्र जाण्यासारखं आहे. हे धर्मयुध्ददेखील नव्हे. यात अविचार आहे! अविवेकच आहे! म्हणून धोका आहे!''

''नाही ताता, एका झटापटीत नामोहरम होऊन हार मानण्याचं कारण नाही. खंत आहे ती साथीदारांच्या जखमांची आणि स्वत:च्या बेसावधपणाची... पण व्यक्ती आणि समेष्टीच्या मुक्तीची ही प्रक्रिया कुणीही थांबवू शकत नाही!'' कमलेंद्रानं त्याही स्थितीत त्यांना म्हटलं.

महाराज संत्येंद्रांना त्या दोघांचं विलक्षण कौतुक वाटलं. एक वेळ कमलेंद्राचं ते समजू शकत होते. पण कमलेंद्रावरच्या त्या हल्ल्यापासून कामिनीच्या अंगात जणू साक्षात् दुर्गा संचारली होती! त्याचा नवा राजधर्म जणू काही त्यानं तिच्याकडून आत्मसात केला असं वाटावं एवढी ती त्यात समरसून गेली होती! त्यांना जाणवलं, मन्वंतरांचा काळ जवळ आलाय! कमलेंद्राच्या या ध्येयाला आकाशाचे पंख होते. सृष्टीतल्या साऱ्या सुष्ट प्रवृत्तींचं पाठबळ त्याला मिळेल असं त्यांना मनोमन वाटून गेलं.

■

मानवी मन किती एकात्म असतं! घडणाऱ्या घटनांचे पडसाद हजारो मैल सर्वदूर उमटतातच. पण मनांची खळबळदेखील सर्वदूर पसरते. सुखदु:खांची आवर्तनंही सर्वदूर जातात! सोमनिलयमसारख्या छोट्या गावातील प्रकारांचे पडसाद अमेरिकेतही उमटले होते. त्याचा परिणाम म्हणूनच की काय ट्रेसीनं हनुमंताला पत्र लिहिलं होतं. पोस्टमन ते घेऊन आला तेव्हा रघुराम जेवत होता. चुलीजवळ बसून सीताबाई त्याला वाढत होती.

बाहेरून हनुमंताच्या नावानं आलेली हाक ऐकून ती बाहेर आली. बाहेर पोस्टमन उभा होता. त्यानं दिलेला लिफाफा घेऊन ती आत आली. तेवढ्यात बाहेरून आलेला हनुमंता तिच्यामागोमाग आत आला. अम्माच्या हातातला लिफाफा घेऊन त्यानं उत्सुकतेनं उघडला. आतलं पत्र वाचून त्यानं बाजूला ठेवलं आणि अम्मा - नायनांच्या प्रश्नार्थक मुद्रेकडे पाहून म्हटलं, ''ट्रेसी नावाची अमेरिकन मुलगी सोमनिलयमला येणार आहे थोडे दिवस राहयला आणि इथल्या जीवनाचा अभ्यास करायला. कमलेंद्रगारूंची परिचित आहे आणि म्हणून तिला माझी मदत हवीय.''

''अरे बापरे! एकटीच्या एकटी मुलगी येऊन इथे राहणार? आणि अभ्यास कसला?''

''होय, नायना! यालाच स्वातंत्र्य म्हणतात! स्वातंत्र्य! नायना, इथल्या घडामोडी जगाच्या कोनाकोपऱ्यातल्या लोकांपर्यंत पोचल्यात. आहात कुठे तुम्ही?''

''म्हणजे?''

''तिथल्या पेपरमध्ये आमची नावं आलीयत! साहजिकच लोकांना कुतूहल आहे इथल्या परिस्थितीबाबत. धारिष्ट्य असलेले ट्रेसीसारखे लोक प्रत्यक्ष परिस्थिती पाहतात, तिचा अभ्यास करत असतात. कुणी त्यावर माहितीपट काढतात तर कुणी पुस्तकं लिहितात. कुणी तिथेच ठाण मांडून राहतात. ट्रेसी काय करते माहीत नाही ... पण असं आहे सारं ह्या परकीयांचं! निधड्या छातीचे लोक तिथे!''

मग हनुमंतानं जेवण केलं आणि थोडा वेळ लवंडला. त्याच्या मनात ट्रेसीचे विचार होते. कमलेंद्रगारूंना त्रास नको म्हणून तिनं त्याला पत्र पाठवलं होतं. त्याच्या मनात तिच्याबद्दल नकळत जिज्ञासा उत्पन्न झाली. साता समुद्रापलीकडून ह्या ग्रामीण भागात येणाऱ्या ट्रेसीचे ह्या मातीशी काय बरं ऋणानुबंध असतील?

पण तिच्याबद्दल विचार करीत बसायला वेळ नव्हता.

अम्मा - नायनाना सांगून तो बाहेर पडला, तो त्याच्या परिचितांना गोळा करून लक्ष्मीनारायणाच्या देवळात आला. कमलेंद्रगारू अगोदरच तिथे आलेले होते. देवळांची विश्वस्त मंडळीही होती.

सर्वजण जमल्यावर कमलेंद्रगारूंनी स्वत:ची योजना मांडली. त्यांनी

म्हटलं, ''प्रार्थनास्थळं, देवालयं, दर्गे, मशिदी, चर्च सर्व ठिकाणं ही धर्मातील सर्वोच्च सत्य अनुभवण्याची स्थानं आहेत. व्यायाम, शिक्षण, उद्योग, संशोधन, चिंतन, ध्यान, साधना, योग अशा विविध कार्यक्रमांद्वारे त्यांना जीवनाशी निगडित करून धर्मातील पुण्याई जीवनात आणायला हवी. ह्यासाठी देवस्थान कमिट्या स्थापन करायच्या आणि योजनाबध्द प्रयत्न करावे अशी कल्पना आहे.''

उलटसुलट पुष्कळ चर्चा झाल्यानंतर अशा कमिट्यांची गरज मान्य होऊन पुष्कळांनी ह्या कामासाठी स्वेच्छेनं नावं दिली.

कमलेंद्रच्या डोळ्यांपुढे पडक्या देवस्थानांच्या परिवर्तनाचं चित्र उभं राहिलं. सभा संपते म्हणेपर्यंत रात्र झाली. मंडळी आपापल्या घरी परतल्यावर कमलेंद्र व हनुमंत दोघे परत निघाले. हनुमंतानं हळूच कमलेंद्रगारूना ट्रेसीच्या पत्राबद्दल सांगितलं.

ट्रेसीचं पत्र हनुमंताला आल्याचं ऐकून कमलेंद्रला प्रथम आश्चर्य वाटलं. पण मग ट्रेसीच्या समजूतदारपणाचं आणि मोकळेपणाचं कौतुक वाटलं.

''ट्रेसी नवी शक्ती घेऊन येईल का?...'' कमलेंद्रला तरी तसं वाटलं. अखेर, जग खरोखरच छोटं आहे आहे आणि 'वसुधैव कुटुंबकम्' हे निर्विवाद सत्य आहे! त्याचं मन प्रसन्न झालं.

देवस्थानांप्रमाणेच प्रत्येक संस्थेला उत्पादकतेचं परिमाण कलेचं परिमाण, आणि विशालतेचं परिमाण देण्याविषयी त्याच्या मनांत जुळवाजुळव सुरू झाली. विशेषत: शिक्षण व प्रशासनाच्या लाखो कार्यालयांसांठी असा प्रयत्न अत्यावश्यक असल्याचं त्याच्या ध्यानात आलं होतं.

■

अमेरिकेत दुपार होत होती. चार्लस्टन उन्हाच्या चटक्यांनी भाजलं जात होतं! पण थोड्याच वेळात एकदम पाऊस कोसळू लागला. घाईघाईनं ट्रेसीनं गाडी पार्क केली. घरी परतल्यावर मोठ्या अधीरतेनं मेलबॉक्समधून काढलेलं, आकाशी निळ्या रंगाचं, भारतातून आलेलं हनुमंताचं एअरमेल फोडलं. त्यानं तिला होईल ती सारी मदत करण्याचं आणि त्याच्या स्वत:च्या घरी उतरण्याचं आमंत्रण दिलं होतं. पण त्याचबरोबर घरच्या परिस्थितीची कल्पना दिली होती.

ट्रेसी हनुमंताच्या लिखाणातल्या त्या रांगड्या, मर्दानी आपुलकीनं हरखून गेली. का कुणास ठाऊक तिला एक अनामिक हुरहूर वाटू लागली. त्या आनंदातच तिनं फ्रिजमधून कोक काढला.

तेवढ्यात फोन वाजला. पलीकडे डॉ. गायत्री होती.

"ट्रेसी, भयंकर एकटेपणा वाटू लागलाय..."

"डॉ. गायत्री, तुझा आवाज असा का येतोय आजाऱ्यासारखा?"

"आय ॲम फ्रस्ट्रेटेड..."

"डॉ. गायत्री, तू के.के.प्रमाणे परत का नाही जात? इथलं लाइफ एकदम रुक्ष, यांत्रिक आणि अमानुष स्पर्धेचं आहेच मुळी!"

"ट्रेसी साऱ्या वाटा बंद आहेत....."

"असं कसं डॉ. गायत्री? तुझ्या अडचणी मला एक्झॅटली कळायच्या नाही हे खरं. पण तूच विचार कर. योग्य वेळी अचूक निर्णयाचं धाडस दाखवलं नाही तर आपल्या पदरी वैफल्य नाही का येणार?"

"माझ्या बाबतीत सारं तत्त्वज्ञान व्यर्थ आहे!"

"मी काही मदत करू शकते का?" ट्रेसीनं आत्मीयतेनं विचारलं.

डॉ.गायत्रीला त्या उमदेपणाच्या पार्श्वभूमीवर स्वत:चा दुबळेपणा आणखीच झोंबून विमनस्कता आली. ती खिन्न होऊन गप्पच राहिली.

डॉ.गायत्रीचं बोलणं बंद झाल्यामुळे ती खरोखरच दु:खी असल्याचं ट्रेसीला जाणवलं. मग कदाचित इंडियाविषयी ऐकून तिला बरं वाटेल, या कल्पनेनं तिनं म्हटलं, "डॉ.गायत्री मी इंडियाला चाललेय. सोमनिलयमला जाणार... तिथे थोडे दिवस राहणार..."

"सोमनिलयमला काय माती अनुभव घेणार?" गायत्रीच्या त्या वाक्यानं, त्यातल्या तुच्छ भावनेनं ट्रेसीला धक्काच बसला.

"दिल्ली, आग्रा, अमृतसर, अजिंठा, वेरुळ, मदुराई इत्यादी ठिकाणं सोडून सोमनिलयमला काय म्हणून चाललीस? शी:!"

गायत्रीनं बोलणं पूर्ण केलं तरी ट्रेसी काहीच बोलली नाही. पण तिला वाईट मात्र वाटलं. स्वत: वैफल्यग्रस्त होऊनदेखील गायत्रीला के.के.चं कार्य, त्यातला आशय हे कळत कसं नव्हतं?

ती सुन्न झाली. ट्रेसीला खरं तर कळत नव्हतं की डॉ. गायत्री हे सारं हेव्यापोटी बोलत होती! अंतर्मनातून डॉ.गायत्रीलाही के.के. च्या कामात

सहभागी व्हायला खूप आवडलं असतं!

"आय वॉंट दॅट एक्स्पिरिअन्स, डॉ. गायत्री!" ट्रेसीनं तुटक उत्तर दिलं.

गायत्री क्षणभर बोलायची बंद झाली. आता तिला खरोखरच असहाय वाटू लागलं होतं. आणखीच असहाय...

डॉ.गायत्रीचा आवाज बंद झाला तसा, "ओ.के. टेक केअर" म्हणून ट्रेसीनंही फोन ठेवला आणि थोड्या वेळानं पुन्हा ती इंडियाच्या विचारांनी उत्तेजित झाली. तिच्या डोळ्यांपुढे अनेक कल्पनाचित्र तयार होऊन नाचू लागली. त्यातलं एक हनुमंताचंही होतं! ■

ट्रेसीबरोबर झालेल्या फोनवरील संभाषणानं गायत्री गेले काही दिवस अस्वस्थच होती. इथल्या जीवनाचा तिला वीट येत चालला होता. सारखं काम किंवा चैन यापलीकडे भावनेची भूक भागवणारं काही सापडत नव्हतं. पण ट्रेसीप्रमाणे ती मुक्तही नव्हती... मनात आलं उगीच आपण आपलं वैफल्य ट्रेसीवर लादलं. तिचा काही दोष नसताना वाट्टेल ते बोललो. तेवढ्यात आठवण झाल्यानं तिनं बाहेर येऊन लेटरबॉक्समधून पत्रं आणली. मुख्य म्हणजे आईचं पत्र होतं.

घाईघाईनं पत्र वाचलं तशी ती थोडी शांत झाली. सर्वजण ठीक होते. मराठेनं नाही तरी सुलभानं अडीअडचणीत मदत केल्याचं आईनं आवर्जून लिहिलं होतं. पण विशेष म्हणजे ज्या मराठेचा 'इंडिया नाऊ'मध्ये फोटो आला होता. त्याच मराठेची तोंडाला काळं फासून तडजोडीत पैसे खाल्ल्याबद्दल, धिंड काढल्याची बातमीही दिली होती!

नकळत गायत्रीला सूड उगवल्याचा आनंद झाला! मनात आलं, नियतीबरोबर न्याय देते! पण त्याचवेळी मनाला प्रश्न पडला की, आपलं जीवन का इतकं असहाय आणि विदीर्ण झालंय? आपल्याला का एवढा मनस्ताप होतोय? आपण कोणतं पाप केलंय?

त्या प्रश्नानं पुन्हा एकदा ती डिस्टर्ब झाली. नियतीवरचा विश्वास डळमळीत झाला. स्वत:विषयीही साशंकता वाटू लागली. प्रश्नांची आवर्तनं सुरू झाली. त्यांनी डोकं भणभणताच तिनं वाइनचा ग्लास भरला आणि घटाघट पिऊन टाकला. वाइनचा तोडगा सापडल्यापासून अल्पस्वल्प शीण

वाटताच ती वाइन प्यायला लागली होती.

पण आज वाइनही तिची साथ दिली नाही. नकळत पुन्हा मराठेचा विचार आला. वाटलं, मराठेची तरी काय चूक आहे? संस्कार, गरिबी, अडचणी... सारी परिस्थितीच प्रतिकूल बनली की भले भले लोकदेखील नाही का तडजोड करीत परिस्थितीशी? त्याचवेळी तिच्या मनात सुलभाचा विचार आला. सुलभानं मात्र तडजोड नव्हती केली. परिस्थिती बदलण्यासाठी लढत होती बिचारी. क्षणभर तिच्या मनात असाही विचार चमकून गेला, की कदाचित सुलभाच्या धडपडीमुळेही मराठेची लबाडी उघड झाली असेल...

गायत्रीला जाणवलं की, काही केल्या हे विचार आपला पिच्छा सोडीत नाहीयत.

पुन्हा उठून तिनं आणखी ग्लास भरून रिकामा केला... मग पुन्हा आणखी. आता तिला बरं वाटलं. तिनं एक गझल लावली आणि शांतपणे सोफ्यात पडून राहिली.

तेवढ्यात बेल वाजली.

दार उघडताच शीला आत आली. शीलाकडे पाहताच गायत्रीला जाणवलं, तिचा रागरंग एकदम आगळावेगळा झाला होता! सारा नूर खुललेला होता!

"मम्मी आज माझं पहिलं डेटिंग आहे!"

ते ऐकताच गायत्रीला सारा उलगडा झाला. त्या उलगड्यानं थोबाडीत बसावं तशी धुंदी उतरली. ती एकदम सुन्न झाली. कानावर विश्वास बसेना. गायत्री स्वतः वयात आली तेव्हा सहावी पास होऊन सातवीत गेली होती. पहिली आली म्हणून आई - बाबांनी हिंदमाताला 'संपूर्ण रामायण' दाखवला होता... वयात येण्याशी संपूर्ण रामायण निगडित होता... पण शीलाच्या वयात येण्याशी हे नवं 'रामायण' निगडित होतं! तिच्या मनात आलं... खरंच आपली मुलगीच का ही? किती प्रचंड निब्बर? किती प्रौढ?

"काय झालं मम्मी? एकदम गप्प झालीस..."

"काही नाही ग..." म्हणून तिनं स्वतःची आठवण सांगितली...

ते ऐकताच शीला फिदीफिदी हसू लागली. "हाऊ सिली..." तिला हसू आवरेना...

त्या उद्‌गारांनी गायत्रीचा उरलासुरला संयम संपला... झटक्यात तिनं

पुन्हा ग्लास भरून तोंडाला लावला! "हाऊ सिली... हाऊ सिली..." ती स्वत:शीच पुटपुटत स्वत:शीच हसली... तिच्या मनात आलं मराठेचं तोंड काळं झालं... लोक हसले असतील... पण आपल्या मुलीनं आपल्या अस्तित्वालाच डांबर फासलंय! वाटलं, प्रत्येक तडजोडीचा असा विचित्र शेवट असतो! अमेरिकेला येणं ही देखील एक तडजोडच अन् ह्या तडजोडीतली लबाडी सर्वमान्य असल्यानं आपल्या तोंडाचं डांबरही सर्वमान्य! पण मराठेच्या दु:खात चारजण सहभागी असतात पुढे तो दु:ख विसरू शकतो. आपल्याला मात्र ह्या असल्या काळजीसह जन्मभर एकट्यानं होरपळण्याशिवाय गत्यंतर नाही. त्याची पर्वा कुणालाही नाही, मुलांना तर नाहीच नाही. त्या इथे मुलं कशी स्वतंत्र! स्वैर! प्रथमपासूनच हाताबाहेर गेलेली ... बेबंद ... बेपर्वा.

शीला स्वत:च्याच तंद्रीत वरच्या खोलीत गेली. तशी तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहून गायत्री स्वत:शी पुटपुटली, "निर्जीव सुखसोयी आणि नीरस सुरक्षिततेची किंमत ही अशी चुकती झाली! दोरी तुटलेल्या पतंगाप्रमाणे ही वर वर भरकटतच चाललीय आणि आपण खोल गर्तेत चाललोय." तिला जाणवलं की शीलाला काही सांगणं - समजावणं म्हणजे वेडेपणा ठरला असता...

ती तशीच विमनस्क बसली असताना थोड्या वेळानं शीला खाली आली. तिची ती भडक लिपस्टिक, तो मोठ्ठ्या गळ्याचा ब्लाऊज, तोकड्या स्कर्टमधून हाय हिल्सपर्यंत जाणारे अनावृत कोवळे सुंदर पाय सारं काही गायत्रीला खोलवर खुपलं... असह्य झालं. क्षणात ह्या साऱ्याची प्रतिक्रिया म्हणून की काय तिनं शीलाला वाइन ऑफर केली...

"ऑल द बेस्ट शीला! चीअर्स फॉर युअर फर्स्ट डेट!"

ग्लासेस एकमेकावर भिडताना तिच्या मनात सल उठला! किती वेगळ्या प्रकारे मुलीला सासरी पाठवतोय आपण... अनधिकृत सासरी... अनधिकृत हनीमून... अन् किती वेळा असंच पाठवायचं...

शीलानं ग्लास संपवला. सहज तिचं लक्ष मम्मीच्या डोळ्यांकडे गेलं. मम्मीच्या डोळ्यांत पाणी होतं. डोळ्यांच्या कडा ओलावल्या होत्या.

"मम्मी... काय झालं मम्मी?"

त्याचवेळी दरवाजाची बेल वाजली. शीलानं दार उघडलं तसा पंधरा

सोळा वर्षांचा घारा गोरा तरुण मुलगा आत आला.

"मम्मी... धीस इज डेव्हिड... डेव्हिड, माय मम्मी..."

थोडा वळ औपचारिक बोलणं झालं, तोलूनमापून बेतलेले शब्द आणि हास्य याचा वापर झाला.

दोघं निघून गेली. गायत्रीनं उठून ग्लास रिकामा केला. तिच्या डोळ्यांपुढे मराठेचा काळं फासलेला चेहरा आणि शीलाचे लालभडक ओठ आलटूनापालटून येतच राहिले.

■

तिकडे अमेरिकेत गायत्री दारूत बुडाली होती तर इकडे मुंबईत मराठे आपल्या आरामखुर्चीत पहुडला होता! आरामखुर्चीत पडल्या पडल्या मराठे दै. नवयुगमधल्या मथळ्यांवरून नजर फिरवीत होता. तिसऱ्या पानावर डावीकडे खालच्या कोपऱ्यात एक मथळा होता, "मराठे यांची उचलबांगडी!" पण त्या मथळ्यातल्या कुचेष्टेनं तो फारसा दु:खी झाला नाही. त्याला माहीत होतं की राजकारणात हे चालायचंच.

वेळ आणि संधी मिळताच जो तो दुसऱ्यावर कुरघोडी करायला टपलेला असतो हे त्याला माहीत होतं.

शांतपणे त्यानं साप्ताहिक राशिभविष्याचं पान उघडलं.

पेपर वाचता वाचता त्याच्या मनांत आलं तरुणपणी आपण पार्टीत आलो. क्रांतीची स्वप्नं फुलवण्यासाठी धडपडलो. शिक्षण, व्यवसाय, नोकरी सारं काही सोडून पार्टीसाठी खपलो. पण फायदा काय झाला? क्रांतीच्या बाता फुसक्या ठरल्या.आपण दळभद्री कंगाल राहिलो आणि ध्येयवादानं झपाटलेले मूर्ख ठरलो. सुलभा, राऊत, परेरा वगैरे मंडळी आज तरुण आहेत, उत्साही आहेत पण उद्या त्यांचं काय होईल? माझ्या तोंडाला काळं फासलं म्हणून आणि जॉइंट सेक्रेटरीशिपवरून काढलं म्हणून आज त्यांना ध्येयवादाचा विजय झाल्यासारखा वाटतोय. पण त्यांना माहीत नाही की ज्या पार्टीत ती वेड्या ध्येयवादानं काम करताहेत त्या पार्टीच्या भिंती पार्टीतल्या माणसांना खातात! जिवंत राहतात फक्त नरमांस यशस्वीपणे ओरबाडणाऱ्या भिंती! पार्टीच्या उच्चपदस्थांनी त्याच्या बरोबरच्या तरुणांवर कसा अनेकदा अन्याय केला आणि त्यांना कसं खच्ची केलं याच्या आठवणीनं तो शहारला. त्याच्या बरोबरच्या बऱ्याच जणांनी पार्टी सोडली होती व धंदा सुरू केला

होता. काहीजण मरतमढे होऊन कंगालपणे पार्टीच्या आसऱ्याला अजून तग धरून होते. काहीजणांनी आत्महत्या केली होती आणि काहीजण त्याच्याप्रमाणे चार पैसे जोडून लबाडीनं का होईना पण श्रीमंतीत नाहीच पण थोड्याफार सुखात राहत होते. आपल्या पार्टीचं मनुष्यभक्षक रूप ह्या पोरांना सांगावं काय? त्या विचित्र विचारानं तो स्वत:शीच हसला! ज्यांच्या प्रामाणिक धडपडीनं त्याच्या तोंडाला डांबर फासलं गेलं आणि त्याची धिंड काढली गेली त्या पोरांचीच त्याला काळजी वाटू लागली. त्यांच्याच भल्याची त्याला ओढ लागली. त्या पोरांना लगेच भेटायचं आणि आपलं मन मोकळं करायचं त्यानं ठरवलं.

त्या आवेगासरशी उठून त्यानं कपडे केले आणि सुलभा चित्रेच्या घरचा रस्ता धरला. आपल्याला रसातळाला पोचवणाऱ्याचा चंग बांधलेल्याबद्दल आपल्याला एवढी आस्था वाटतेय याचं त्याला तिच्या घरी पोचेपर्यंत राहून राहून आश्चर्य वाटत होतं...

तो सुलभाच्या घरी पोचला तेव्हा सुलभानं त्याचं स्वागत केलं खरं, पण तिला स्वत:च्या चेहऱ्यावरील आश्चर्य मात्र लपवता आलं नाही.

थोडावेळ शिष्टसंमत बोलणं झालं. तेव्हा मराठेनं पार्टीविषयीचे त्याचे अनुभव तिला भडाभड सांगून टाकले.

सुलभा ते सारं ऐकून एकीकडे चकित झाली तर ते कृष्ण सत्य ऐकून सुन्नही झाली. शेवटी न राहवून तिने विचारलं, ''पण मराठे, पार्टी एवढी वाईट आहे ... अगदी पहिल्यापासून... एवढे महान नेते, त्यांचा त्याग... तुरुंगवास... सारं खोटं आहे?''

''मिस् चित्रे, पार्टीची सुरुवात ध्येय सारं उत्तमच होतं. पण आज जे जगात चाललंय तेच पार्टीत. सज्जनपणा, माणुसकी, प्रेम, ध्येयवाद सारे सडले... संपले... हरले आहेत. मुजोर आणि शिरजोर आहेत ते उलट्या काळजाचे, बंद डोक्याचे, झापडं बांधलेले उन्मत्त आणि स्वार्थी लोक. एकीकडे खुळे झिजताहेत आणि दुसरीकडे हे मलिदा खाताहेत...

''मराठे, तुम्ही प्रथमच मन मोकळं करताहात. तुमची आस्था, तुमची भावना कळते मला. पण मराठे तुम्ही पार्टी का सोडली नाही?''

''चित्रे, ही अशी जागा आहे की जिथे येऊन माणूस स्वतंत्रपणे जगायला नालायक होतो. लुळापांगळा होतो. मी काहीही व्यवसायदेखील

करू शकत नाही...''

"ठीक आहे ... पण मग संघर्ष का करीत नाही?''

"अहो चित्रे, आमची तेवढी कुवत असती तर ना! आम्ही संघर्षात हरलो... हतबल झालो. खच्ची झालो. शेवटी मी ठरवलं की आता इतक्या खोलवर रुतलोय की सुटका नाही... मग त्यातल्या त्यात होईल ती कमाई करायची... बस्स! पण चित्रे उद्या सकाळी तुमचं काय होईल तुमच्या प्रमाणिकपणापायी याचा विचार करा...''

सुलभाच्या समोर भविष्यकाळचं चित्र उभं राहिलं तशी ती थरारून गेली...

परवाच कमलेंद्र नायडूकडून आलेल्या पत्राची तिला आठवण झाली. आतापर्यंत तिला मदत करणाऱ्या कमलेंद्र नायडूनं त्या पत्रात स्वत:च्या क्षेत्रातली कर्तव्यं पार पाडताना त्या कर्तव्याला आत्मज्ञानाचं चैतन्यदायी परिमाण देण्याचा प्रयत्न करीत आनंदानं जगण्याची कल्पना मांडली होती. मराठेनं जे सांगितलं त्या पार्श्वभूमीवर तिच्या हळूहळू लक्षात यायला लागलं की नायडूच्या म्हणण्याप्रमाणे नव्या नव्या संस्था, संघटना, गट, संप्रदाय बांधून नव्हे अन् असलेल्या संघटना मोडूनही नव्हे तर आत्मप्रचीतीची साधना करत करत एकात्मतेची पूर्ती शक्य होणार होती. क्षणभर तिच्या डोळ्यांसमोर आत्मज्ञानाच्या ह्या कल्पनेचं, त्यासाठी असलेल्या विविध साधनांचा आणि आत्मज्ञानाचा आशय पार्टीच्या प्रत्येक धोरणात प्रतिबिंबित करण्याबद्दलच्या सूचनेचं कसं स्वागत होईल याचं कल्पनाचित्र तरळलं. ती स्वत:शीच हसली.

गोंधळून मराठेनं विचारलं, काय झालं?''

"काही नाही...'' म्हणून तिनं त्याला नायडूच्या पत्रातले आणि स्वत:च्या मनात आलेले विचार बोलून दाखवले.

त्यावर मराठे क्षणभर अंतर्मुख झाला. मग एकदम म्हणाला, "सुलभा, तू सर्वप्रथम तुझ्या आवडीचा, तुला झेपेल तो नोकरी-व्यवसाय सुरू कर. आणि हे करताना तुझी मतं, कल्पना, धोरणविषयक सल्ला हे सारं तुला जमेल त्याप्रमाणे पार्टीशी किंवा अन्यत्र व्यक्त कर. माझ्याप्रमाणे कुजायचं नसेल, विफल होऊन मरायचं नसेल आणि निव्वळ चार दीडक्यांच्या भ्रमात भ्रष्ट व्हायचं नसेल तर कमलेंद्र नायडूनं सुचवलाय तोच पर्याय स्वीकारायला हवा.''

प्रथमच त्यानं तिचा एकेरी उल्लेख केला. पण त्यात आज प्रथमच उत्कटता होती! त्यानं पुढे म्हटलं, ''सुलभा, आज मलाही नवा जन्म झाल्यासारखं वाटतंय. माझ्या मनात दुसरी युनियनही जॉइन करायचा आणि पार्टी सोडायचाही विचार होता. पण सुलभा त्या नायडूनं माझीही समस्या सोडवलीय... मी देखील आता एकादी अर्धवेळ नोकरी करीन. माझ्या साऱ्या अनुभवावर आधारित नायडूच्या विचारांचं महत्त्व विशद करणारं, तरुण ध्येयवाद्यांना मार्गदर्शक ठरेल असं एखादं पुस्तक लिहीन. सुलभा ... बरं झालं मी आलो. माझ्या मनातल्या तुमच्या विषयीच्या प्रामाणिक आस्थेची चांगली फळं, अन् तीही लगेच मिळाली मला! सद्भावनेची किती महत्त्वपूर्ण परिणती ही! खरंच सुलभा मला किती मोकळं वाटतंय... किती हलकं वाटतंय... पार्टीत राहून मी स्वतंत्र राहीन, मुक्त राहीन, कृतकृत्य होईन... पार्टी सोडून भरकटणार नाही... आणि पार्टीत कुजणारही नाही. खरंच नायडूच्या मताप्रमाणे नामस्मरण, पूजा, जप, भजन, योग अशा मार्गांनी प्रत्येकानं आत्मप्रचीतीसाठी प्रयत्न करणं अवश्य आहे... मग तो कुणीही असो! ते केलं तरच मला पार्टीच्या हितासाठी आणि लोकहितासाठी सत्य बोलायचं सामर्थ्य येईल आणि लोककल्याणाची धोरणं आखण्याविषयीची दृष्टी प्राप्त होईल...

सुलभा विस्मयचकित होऊन ते रूपांतर पाहत होती. तिच्या डोळ्यांदेखत काही क्षणात एक महापरिवर्तन घडलं होतं. मराठेचा नवजन्म झाला होता तिच्या साथीनं, तिच्या साक्षीनं!

■

मुंबईमध्ये मराठेचा पुनर्जन्म झाला तेव्हा सोमनिलयमचं वातावरण वेगळं होतं. महाराज सत्येंद्रांच्या आजारानं सगळेजण चिंतित झाले होते.

महाराज सत्येंद्रांच्या आजाराचा आज पाचवा दिवस. ''बाबू'' त्यांनी क्षीण आवाजात हाक मारली. तो येऊन शेजारी बसला तसे ते म्हणाले, ''बाबू... मी तृप्त आहे... विश्वकल्याणाची मुहूर्तमेढ आज प्रत्यक्ष ईश्वरच रोवतोय. हृदयाहृदयावर ईश्वरी सत्तेचा थेट अंमल सुरू करणाऱ्या युगाची सुरुवात केलीय त्यानं तुझ्या हस्ते! हा वंश धन्य झाला!

''सारी ईश्वरी लीला... हा काळ मन्वंतराचा आहे... याची प्रचीती ईश्वरानंच दिली, आणि त्याच्या सार्वत्रिक आविष्करणाचे उपाय सुचवले...

तोच ते यशस्वी करील... हे त्याचंच कार्य आहे. ... आम्ही खरोखरच कठपुतळ्या आहोत. त्यानंच अनंत अनुभवातूत फिरवून जाणिवा अचूक बनवल्या... आणि त्यानंच त्या शब्दबध्द केल्या. तोच त्यांना विश्वकल्याणाचं फळ देईल कारण हा त्याचाच संकेत आहे!'' कमलेंद्र म्हणाला,

''बाबू ... आता एकच खंत वाटतेय, ती तुला इतका काळ दुरावलो त्याची. तुझी अवहेलना केल्याची.''

''ताता तुम्ही खरंच वाईट वाटून घेऊ नका. आपण सारेजण आपापल्या मर्यादित सदसद्विवेकबुध्दीच्या प्रवाहात वाहत होतो. किंबहुना त्यांच्या शृंखलांनी जखडलो होतो! दुरावा काही वैयक्तिक किंवा संकुचित भावनातून नव्हता तयार झाला!

''हे देखील तुझ्या मनाचं मोठेपण!'' महाराजांचा आवाज अचानक कातर झाला.

''ताता... ताता... आम्हा सर्वांना आशीर्वाद हवा तुमचा... तुमच्या अंत:करणाला माझ्यामुळे अखेर समाधान मिळालं याचा मला खूप आनंद वाटतोय...''

महाराजांच्या त्या आजारातून ते वाचतील असं कुणालाच वाटलं नव्हतं पण मन्वंतराच्या वेळी असेच चमत्कार घडतात. नव्या युगाची नांदी होताना त्यांनी साक्षीदार असावं, त्या आनंदात सहभागी असावं अशी नियतीची इच्छा होती. उणीपुरी पंधरा वर्षं त्यांनी अपेक्षाभंगाच्या आणि दुराव्याच्या वेदनेत घालवली होती. आता नियतीनं अखंड आनंदाचं त्यांना दीर्घकाळ वरदान द्यायचं ठरवलं होतं. ते पूर्णपणे बरे झाले तेव्हा सोमनिलयमच्या राजवंशाचा जणू कायाकल्प झाला!

कमलेंद्रबरोबरच तेही आता वेगवेगळ्या विचारविनिमयात सहभागी होऊ लागले. हास्यविनोद रंगू लागले. राजवाडा आनंदभुवन झाला!

■

त्या सकाळी राजवाड्यात थोडा भरभरच आलेल्या हनुमंतानं आल्या आल्या कमलेंद्रला आज ट्रेसी येणार असल्याची बातमी दिली तसा त्याला आनंद झाला... पण हनुमंताच्या चेहऱ्यावरचे भाव निरखत त्यानं म्हटलं चळवळीत काम करणारे पुष्कळदा ध्येयामागे एवढे वेडे होतात... अन्यायाविरुध्द पेटून उठतात की, वैयक्तिक सुखाची लकेर त्यांना त्रासदायक

वाटते... तुझ्या बाबतीत तसंच झालेलं दिसतंय...

"कमलेंद्रगारू ... अगदी बरोबर ओळखलंत..."

"म्हणूनच हनुमंता मी नेहमी सांगतो 'आत्मनो मोक्षार्थ जगतहिताय च' महावाक्याचा मथितार्थ कधीही नजरेआड होऊ देता कामा नये. आजकाल चळवळी करणारे अगदी सज्जन आणि विद्वान लोकदेखील अविद्याजन्य अविवेकाच्या भोवऱ्यात सापडले आहेत. आंतरिक संघर्ष, कटुता, आसक्ती अशा एकापेक्षा एक तीक्ष्ण काट्याकुट्यांनी अंतरंगात रक्तबंबाळ झाले आहे.

"पण कमलेंद्रगारू माझं उलट आहे..."

"हनुमंता, तेच म्हणतोय. कुणाच्या डोक्यावर स्वार्थांधतेचा पगडा तर कुणाच्या डोक्यावर निस्वार्थी त्यागाचा... पण ह्या दोन्ही अविवेकी आणि अज्ञानजन्य आहेत. त्यामुळेच आपली कुतरओढ होते. मग आपण चळवळीत असोत की चळवळीबाहेर! आणि प्रापंचिक वा अविवाहित! अस्तित्वाला संकुचित, क्षुद्र व दुःखी बनवणारं शेवटचं महत्त्वाचं बंधन म्हणजे स्वतःच्या ध्येयाचं, विचारांचं!... यामुळेच तुझी ओढाताण चाललीय... काही काळजी करू नकोस. वैयक्तिक जीवनात उत्कट आनंद भोगणं हे कुणाच्याही कल्याणाच्या आड तर येत नाहीच पण आत आनंद आणि बाहेरही आनंद हीच अवस्था उद्याचं मन्वंतर घडवून आणू शकते. मुनमुराद आणि रसरसून जगणं, अभ्यास, विचार, कर्तव्य याप्रमाणेच उत्कट प्रेम, शृंगार आणि करमणूक हे सारे जीवनाचे मनोरम पैलू आहेत. धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ! सारं हवं ! स्वतःच्या कल्पनांचं ओझं वाहून वाहून थकून गेलास तर जीवनातलं हे सौंदर्य हरवशील. तसं करू नको. उदात्त ध्येयाच्या मार्गात तारुण्यसुलभ प्रेम व शृंगार कधीच अडसर बनत नाहीत.

हनुमंता त्या समजावण्यानं सुखावून गेला. केव्हा एकदा ट्रेसी येऊन पोचते ह्या विचारांनी स्वतःच्या नकळत उतावीळ झाला!

■

इकडे भारतात सोमनिलयमला अमेरिकेतून ट्रेसी येणार होती... तर तिकडे अमेरिकेमध्ये त्याचवेळी, आपला भारतीय वैज्ञानिक डॉ.सतीश स्वतःची करिअर करीत होता!

डॉ.सतीश डिपार्टमेंटमध्ये चालला होता त्यावेळी त्याच्या डोक्यात फ्रँकलीनच्या फोनसंदर्भात विचार घोळत होते. ट्रेसी सोमनिलयमला चालली

होती आणि स्वत: फ्रँकलीनदेखील आहारासंदर्भात अधिक अभ्यास करण्यासाठी भारतात चालला होता. भारताच्या वेगवेगळ्या भागातील स्वयंपाकाच्या पध्दतीमधील वैशिष्ट्य व त्यामागील आरोग्य शास्त्रीय कारणमीमांसा त्याला अभ्यासायची होती. फ्रँकलीन गेल्यामुळे अधूनमधून जी खास जेवण्याची संधी मिळायची तीही नाहीशी होणार होती आणि ट्रेसीचा मधूनमधून मिळणारा सहवास नाहीसा होणार होता.

"हाय डॉ. सतीश... गुड मॉर्निंग"

त्याचं लक्ष नाहीसं पाहून डॉ. टेलरनी म्हटलं.

"हाय गुड मॉर्निंग"

"विचारात गढून गेलायस ?"

"हो... पण विशेष महत्त्वाचं नाही... कसे आहात... कसे चाललेयत नवीन छंद?"

डॉ. टेलर एकदम चमकले. "छंद? यू कॉल देम हॉबीज..."

डॉ. सतीश गोंधळला.

नाराजीनंच ते म्हणाले, "एनी वे सर्व मजेत आहे, जोरात चाललंय. पण तुझ्यासारख्यांनी आस्था दाखवली तर आणखी वाढेल हे सारं काम."

"तुमचं काय किंवा के.के. चं काय... यू हॅव अचीव्हड एव्हरीथिंग... तुम्ही तुम्ही कमावलय सगळं... माझी सुरुवात आहे."

"दॅटस ओ.के. बट वुई हॅव आल्सो वर्क्ड हार्ड... अजूनही काम करतोच... दॅटस् नो बॅरिअर..." करिअरची सुरुवात हा काही अडसर नव्हे.

"डॉ. टेलर, बॅरिअर नाही कसा? मला अण्वस्त्राविरोधात इंटरेस्ट नाही रासायनिक शस्त्रविरोधातही इंटरेस्ट नाही आणि कशातही नाही. मी फक्त करिअर करणार आणि फावल्या वेळात मजा करणार... बाकी भानगडी मला कंटाळवाण्या आणि अडचणीच्याच वाटतात... प्रगतीमधले अडथळेच वाटतात!"

त्याच्या रोखठोक बोलण्यानं एकीकडे टेलरना राग आला तर दुसरीकडे तो फ्रँकलीन बोलल्यानं बरंही वाटलं! त्यांनी मोकळेपणानं म्हटलं. "डॉ. सतीश... तू आस्था दाखवलीस म्हणून आणि धीस इज अ पार्ट ऑफ डे टुडे लाइफ म्हणून मी म्हटलं... एनी वे एकापरीनं तुझंही ठीक आहे तुझ्या

मनाला जेव्हा तीव्र ओढ वाटेल, तेव्हाच ते,'' सेल्फ रिअलायझेशन, त्यातून प्राप्त होणारी निर्भयता, सुरक्षितता, इत्यादींमध्ये रंगून जाईल. त्याचप्रमाणे स्वत:च्या क्षेत्राचा सर्वकल्याणकारी विकास साधणाऱ्या योजनांची व धोरणांची महती, आणि किंमत तुला कळेल... असो. हॅव फन...''

सतीशला त्यावर काय बोलावं हे सुचलं नाही. पण त्यांच्या नाराजीचा सूर जाणवून हा म्हातारा आपल्या करिअरचं तर नुकसान करायचा नाही ना... अशी शंकेची पाल चुकचुकली....त्याच क्षणी त्याला जाणवलं की परमार्थाकडे दुर्लक्ष करून स्वार्थदेखील साधता येणार नाही!

■

सोमनिलयम आणि चार्लस्टन जोडणारे आत्मिक धागे कॅलिफोर्नियापर्यंत न पोचते तरच नवल! वास्तविक आजकाल गायत्रीची मन:स्थिती हल्ली फारच सैरभर झाली होती. रजा घेऊन ती घरी राहिली होती आणि सकाळ, दुपार, संध्याकाळ, रात्र... सतत वाइनच्या अंमलाखाली राहू लागली होती. शंभूचं आणि तिचं पटत नव्हतं आणि पोरांची लक्षणं अमेरिकन जीवनाशी सुसंगत पण तिच्या मनाला तुडवणारी होती. आई-बाबा-गोविंदाची आठवण व जबाबदारी गळूप्रमाणे ठसठसत होती.

सुनील आणि शीला तिच्या भावना अजिबात समजू शकत नव्हते असं नाही पण दोघांचाही निरुपाय होता...

मम्मी हल्ली फारच तुसडेपणानं वागे किंवा दारू पिऊन वेड्यासारखी हसे. नॉर्मल वागत नव्हती. हे त्यांना जाणवत होतं. परंतु आज प्रथमच ती इतक्या उत्साहानं मनापासून आणि उमेदीनं बोलताना पाहून दोघांनाही खूप हायसं वाटलं होतं.

तिनं म्हटलं, ''बाळांनो, मी सर्वतोपरी वाहवले होते. बेभान, बेपर्वा झाले होते. वाटू लागलं होतं की आय स्टार्टेड माय लाइफ ऑन रॉंग नोट... वाटलं होतं हा जन्म, हे आयुष्य भूताचो डाव ठरलं... वाया गेलं. वाटलं होतं, सुटका नाही.. वाटलं होतं सारं संपलं, धुळीला मिळालं!

मम्मीचे डोळे आज प्रथमच तेजानं चमकत होते. तिच्या चेहऱ्यावरचा तो तजेला पाहून शीला एकदम हरखून गेली... तिला भरून आलं... तिला मिठी मारून तिनं म्हटलं, मम्मी माय मम्मी... किती छान दिसतेस ग आज... आजपर्यंत कधी पाहिलं नव्हतं तुझं हे रूप...

शीला बेटी.... गॉड इज ग्रेट... आज मला जाणवलं की इट इज नेव्हर टू लेट... शीला बेटी माझी लाडकी ना तू मग ऐक बरं माझ्या बदललेल्या रूपाचं रहस्य... गायत्री बोलत राहिली. जीवनाचा सारा चित्रपट, जीवनातल्या धारणा, संस्कार जबाबदाऱ्या, अडचणी, मनाची घालमेल, सारं सारं भळभळत बाहेर आलं. शेवटी तिनं म्हटलं, के.के. नं. म्हटलं होतं. त्याचप्रमाणे आज हा सोनियाचा दिन आलाय माझ्या जीवनात. बाळानो, आपण कुणीही नाही... भारतीय, अमेरिकन... कुणीही नाही. ह्या आहेत वरवरच्या बाबी! स्वत:च्या अंतरंगाशी तादात्म्य पावत गेलं की सुलभा चित्रेप्रमाणे तडक येते आणि कटुता, वैफल्य, हावरटपणा, आसक्ती, चिंता यांचा अंमल हळूहळू नाहीसा होत जातो हे सत्य आहे... सत्य आहे. आपण कुणीही असलो तरी स्वत:च्या अंतरंगाशी समरस होत जगण्याचा प्रयत्न केला की जीवन, जसं धर्मयुद्ध बनतं तसंच ती एक आनंदयात्रा बनते... खरं म्हणजे सुलभाशी गप्पा झाल्या त्यावेळी हे मला जाणवलं होतं पण पेलत नव्हतं... अज्ञानी मनाला ते पचवायची ताकद नव्हती... मनाच्या त्या तयारीसाठी ही सारी होरपळ आवश्यक ठरली, पण आता आनंद आहे... माझ्या आनंदाची इथेही गरज आहे! माझ्या इथे येण्यातलं रहस्य, प्रयोजन कळलं मला! शीला, बाळ मला कॉफी करशील?''

''हो... ग मम्मी... आय ॲम सो हॅप्पी... अगदी तुला आवडते तशी... की नको, तुला आवडते तस्सा चहा करते बघ...''

गायत्री त्या अनपेक्षित प्रेमाच्या वर्षावानं स्तिमित झाली... तिला प्रथमच कळलं, शीलाच्या साऱ्या अमेरिकन दिखाव्याच्या आत किती स्वच्छ हृदय लपलंय...

■

यावेळी सोमनिलयममध्ये सकाळ झाली होती. राजवाड्याच्या परिसरात माळी, मजूर रघुराम वगैरेची वर्दळ सुरू झाली होती. स्वत:च सारं काम आटपून झाल्यावर कमलेंद्र सकाळच्या बातम्या पाहत बसला होता. हल्ली कमलेंद्र सकाळी उठताच बातम्या पाहात असे. एका बाजूला आपलं काम सर्वत्र पसरत असताना जगभर तमोगुण आणि राजगुणाचाही आगडोंब खदंखदतो आहे, हे त्याला प्रतिक्षणी जाणवत होतं. किंबहुना या साऱ्या कोलाहलाचा लवकरच स्फोट होणार याची त्याला सुस्पष्ट जाणीव झाली होती. जागतिक, हिंसाचाराचं आव्हान समोर

येऊन ठेपल्याचं त्याला स्पष्ट जाणवलं होतं.

अचानक अतिप्रचंड आवाज झाला. कानठळ्या बसणाऱ्या त्या आवाजानं ऐकणाऱ्याच्या उरात धडकी भरलीच. पण संपूर्ण राजवाडा हादरला.

तो धावतच बाहेर गेला. राजवाड्यासमोरच्या रस्त्यावर एक जीपच्या



ठिकऱ्या उडाल्या होत्या. ड्रायव्हरच्या चिंधड्या उडल्या होत्या. ती जीप राजवाड्याकडेच निघाली होती. कमलेंद्राच्या तात्काळ लक्षात आलं की जीपमध्ये लपवलेल्या बॉम्बचा हेतू नायडू कुटुंबाचा नायनाट करायचा होता. पण त्याचा स्फोट काही क्षण जीप बाहेर थांबवल्यामुळे दूर झाला होता. त्यांचे प्राण वाचले होते!

तात्काळ त्यानं पोलिसांना फोन केला. पण त्याच वेळी इतर फोन खणखणू लागले. "मुंबईत बॉम्बस्फोटाची मालिका. पहिला "दिल्लीत जातीय दंगल...", दुसरा हैद्राबादमध्ये धार्मिक स्थळात विष्ठा... संचारबंदी... तिसरा "पुण्यात गणपतीच्या मूर्तीची विटंबना" चौथा "डॉ. टेलर यांच्यावर जीवघेणा हल्ला..." पुन्हा मुंबईहून पहिला फोन... त्याचवेळी त्यानं दोन्ही टी.व्ही ऑन करून बातम्या ऐकायला सुरुवात केली. त्याच्या लक्षात आले की प्रत्यक्षात दहशतवाद्यांनी, अतिरेक्यांनी, धर्मवेड्यांनी,माफियांनी आणि राक्षसी सत्ताकेंद्रांनी एकत्र येऊन एकाच वेळी जगात उत्पात माजवायला सुरुवात केली होती. सोमनिलयमचा स्फोट ही या वणव्यातली केवळ एक ठिणगी होती. जगभरातून येणाऱ्या बातम्यांमध्ये एक सूत्र होतं. धार्मिक स्थळांची दुर्दशा, मूर्तींची बिटंबना, झोपडपट्ट्यांना आग, शाळेतील मुलांवर अंधाधुंद गोळीबार, शस्त्रसाठ्यांना आगी आणि डॉ. टेलरसारख्यां कार्यकर्त्यांवर प्राणघातक हल्ले. सर्वात महत्त्वाचं म्हणजे वेगवेगळया रेडिओस्टेशनचे ताबे घेऊन दहशतीची भयानकता वाढविण्यासाठी धर्मद्वेष वाढवणारी, चिथावणारी भाषणं! जगात माणुसकीचा विध्वंस करायचाच पण त्यावेळी प्रतिकार मोडून टाकण्यासाठी भयाचं आणि गोंधळाचं वातावरण तयार करायचं हा त्यांचा डाव स्वच्छ दिसत होता. कमलेंद्राची आता कसोटी होती. जगातलं सारं चांगलं नष्ट होऊन जाण्याची भीती उत्पन्न झाली होती. त्याचवेळी रेडिओवर बातमी आली की अतिरेकी रासायनिक शस्त्रांचा वापर करणार आहेत. त्याचप्रमाणे जगभरातल्या मोठ्या नद्यांमध्ये विष मिसळणार आहेत. ही बातमी खरी होती की अफवा हे समजायाला मार्ग नव्हता. रेडिओ स्टेशनमध्येही अतिरेकी घुसले होते का, हे समजत नव्हतं.

जगभरात जो आगडोंब उसळत होता त्याच्या धडाघड बातम्या येत राहिल्या. आता सर्वतोपरी प्रतिकार आवश्यक होतं. तो असा विचार करत होता तोच लहानू आणि हनुमंता फ्रान्सिसला धरून घेऊन आले. जीपमध्ये

स्फोट होण्यापूर्वी चोरून तिच्या खाली काही तरी ठेवणाऱ्या इसमाला त्यांनी पाहिले होते. जीपचा स्फोट होताच तो इसम पोबारा करीत असलेलं लक्षात येताच दोघेही त्याचा पाठलाग करत पोचले ते कृष्णा लॉजवर फ्रान्सिसच्या खोलीत! लगेच मनातील सारा आदर बाजूला ठेवून त्यांनी त्याला-मुसक्या बांधून राजवाड्यावर आणला होता. रागाच्या भरात फ्रान्सिसला दगडांनी ठेचून ठारच करायला निघालेला. लहानूला हनुमंतानं कसंबसं आवरलं होतं. फ्रान्सिसचा सारा ताठा एकदम उतरला होता. तो गलितगात्र आणि भीतीनं पांढराफटक पडला होता. चेहऱ्यावर अपराध, लाज आणि अपमान याचबरोबर पश्चात्ताप दिसत होता. आश्चर्य असं की आपण पकडले गेलो हे बरं झालं अशीही भावना दिसत होती! त्यामुळेच की काय फ्रान्सिस कबुलीजबाब द्यायला तयार झाला. त्यानं फ्रान्सिसचा कबुलीजबाब टेप करून घेतला. जबाबात साऱ्या जनेतला फ्रान्सिसनं उघड करून सांगितलं होतं की चांगल्या हेतूनं सुरू केलेली त्याची गुप्त चळवळ आता राष्ट्रद्रोही अतिरेक्यांच्या हाती गेली होती. बंदुकीच्या धाकाखाली त्याला ही वावरावं लागत होतं. त्यानं लोकांना आवाहन केलं होतं की सर्व धर्मीयांनी, सर्व जातियांनी, सर्व पक्षांनी, सर्व राष्ट्रांनी एकत्र येऊन परिस्थितीचा मुकाबला करणं आवश्यक होतं आणि शेवटी आपण जे बोलतोय ते सत्य आहे आणि आपल्याला त्यासाठी मरण आलं तरी चालेल, असं तडफडून सांगितल होतं. त्याच्या कथुलेग बाबाच्या लाखो कॉपीज काढल्या जातील याची कमलेंद्रानं व्यवस्था केली. त्याचवेळी मुंबई, पुणे, चार्लसन, कॅलिफोर्निया इथल्या साऱ्या संबंधितांशी संपर्क साधून या वणव्यावर मात करण्यासाठी एकत्र येण्याची व सतत संपर्कात राहून काम करण्याची निकड सांगितली. पण एवढ्यावर भागणार नव्हतं.

त्यानं ऑस्ट्रेलिया, इंग्लंड,जपान, अमेरिकेतील सर्व जुन्या मित्रांना व विशेषत: अमेरिकेतील त्याच्या सिनेटर मित्रांच्या द्वारे या प्रलयंकारी धुमश्चक्रीमध्ये जगातील सर्व सुसंस्कृत राष्ट्रांनीं आणि त्यांच्या हेरखात्यानीं एकमेकांशी सतत संपर्क ठेवायचं आवाहन केलं. त्यानं त्या सर्वांना कळकळीनं समजावलं की मानवतेच्या ह्या रक्तपिपासू शत्रूंबद्दल परस्परांना संपूर्ण आणि अचूक माहिती सतत पुरवली नाही तर सारं जग बेचिराख होऊन जाणार होतं.

मिनिटं, तास आणि दिवस रक्ताळत चालले होते.

पण त्याचप्रमाणे कमलेंद्राची तपश्चर्या वेगवेगळ्या तऱ्हानी उपयोगी पडू लागली होती.

ज्या आत्मविकासाचा ध्यास कमलेंद्रानं घेतला होता त्याचं महत्त्व पोलिसदल व सैन्यदलाच्या उच्च अधिकाऱ्यांना पटल्यामुळे आज मोक्याच्या वेळी त्यांच मोलाचं सहकार्य मिळू लागलं होतं. हे अनोखं, सज्जन आणि हैवानांच्या मधलं, धर्मयुद्ध जिंकण्यासाठी आजवरची धडपड कामी येऊ लागली होती . फ्रान्सिसच्या कबुलीजबाबामुळे त्याच्या कित्येक सहकाऱ्यांनी आता दहशतवाद्यांची माहिती उघड करायला सुरुवात केली. जगभर दहशतवाद्यांनी हजारो सुशिक्षित तरुणांच्या अन्यायाविरुद्धच्या असंतोषाचा मोठ्या कुटिलपणानं आणि क्रूरपणानं वापर करून घेतलेला उघड होऊ लागला. एकदा गुन्हे केले की शिक्षेच्या भयानं मग दहशतीच्या दुष्टचक्रात अडवलेल्या या तरुणांना फ्रान्सिस आणि इतरांच्या कबुलीजबाबामुळे धीर आला. आपल्या हातून जे गुन्हे झाले त्यांचा इतका विनाशकारी परिणाम होईल हे एकंदर गुप्ततेमुळे त्यांच्या ध्यानीमनी नव्हतं! पण ह्या घडीला ते जाणवताच, ''जीव गेला तरी चालेल पण हे दुष्टचक्र फोडून टाकायचं. दहशतवादाशी लढायचं. दहशतवाद्यांना खणून काढायचं'', अशी त्यांनी जाहीर प्रतिज्ञा करायला सुरुवात केली.

दिवसामागून दिवस जाऊ लागले, तसे अतिरेक्यांचे अड्डे उघड होऊ लागले. ते उघड होताच कित्येक पंतप्रधान, राष्ट्राध्यक्ष यांचे सुसंस्कृत मुखवटे गळून पडले. त्यांचे हिंस्त्र चेहरे जगापुढे आले आणि जागतिक दबावामुळे एकत्र आलेल्या राष्ट्रांच्या शक्तीमुळे विध्वंसक असे एकेक अड्डे नष्ट होऊ लागले.. हजारो सुशिक्षित, हुशार, सज्जन पण मार्गभ्रष्ट झालेले आणि दुष्टचक्रात अडकलेले तरुण सोडून जाऊ लागल्यामुळे दहशतवाद्यांचं अनेक प्रकारे नुकसान होऊ लागलं. त्यांची ताकद कमी झाली. त्याची गुप्त ठिकाणं उघडकीला येऊ लागली, धरपकडी वाढल्या. त्याचप्रमाणे हल्ल्यादरम्यान कित्येक अतिरेकी ठार होत गेले. शिवाय कित्येक चोरून ठेवलेले शस्त्रसाठे पकडले गेले. त्याचप्रमाणे अतिरेक्यांच्या दहशतीमुळे घाबरून जाऊन त्यांना सहकार्य करणारे सामान्य नागरिक आता निर्भय होऊ लागले.

दिवसामागून दिवस जात होते तसं बातम्यांचं स्वरूप बदलत गेलं.

स्वार्थापोटी पोसलेला दहशतवादाचा भस्मासुर बड्या राष्ट्रांवरच उलटला होता. अतिरेक्यांकडून त्यांच्या भूमीत शस्त्रसाठे उडवले गेल्यामुळे बड्या राष्ट्रांमध्ये मोठीच जीवितहानी व वित्तहानी झाली होती. शिवाय पसरवलेल्या धर्मद्वेषामुळे अगदी शाळकरी मुलांनीही एकमेकांचे खून पाडले होते. बड्या राष्ट्रांना कधी नव्हे ते लक्षात आलं होतं की त्यांची भांतिक प्रगती व शख्यबळ आज कुचकामी ठरली होती. याउलट स्वधर्म अर्थ काम व मोक्षाची शिकवण देणाऱ्या विश्वकल्याणकारी प्रेरणेच्या बळावरच लाखो तरुण दहशतवाद्यांपासून फुटले होते. केवळ या प्रेरणेतूनच विकसनशील देशातील पोलिसदलं व सैन्यदलं अतिरेक्यांविरुद्ध आणि धर्मवेड्यांविरुद्ध प्रभावीपणे लढू शकली. त्यांनीच माफियांचं कंबरडं मोडलं अन धार्मिक स्थळी लपवलेली शस्त्रास्त्र मोठ्या प्रमाणावर हस्तगत केली.

या सर्व घटनांच्या दरम्यान कमलेंद्रनं झंझावाती वेगानं पुढारलेल्या देशांना भेटी दिल्यामुळे कित्येक राजकीय नेते, उद्योजक, वैज्ञानिक, धार्मिक नेते यांच्या ध्यानी येऊ लागलं होतं की क्षुल्लक मतभेद बाजूला टाकून अतिरेकी, अतिरेकी सरकारं, दहशतवादी, वंशवादी, धर्मवेडे, माफिया, हया साऱ्यांना अलग पाडून त्यांच्याविरुद्ध सर्व शक्तिनिशी लढलं पाहिजे.

त्यांच्या ध्यानी येऊ लागलं होतं की संकुचिततेविरुद्ध विशालता, धर्मवेदाविरुद्ध सहिष्णुता आणि वंशद्वेषाविरुद्ध वाशिक सलोखा अशा तऱ्हेनं जगाचं ध्रुवीकरण झाल्याशिवाय अब्जावधी डॉलर्सचा चुराडा थांबणार नाही. अब्जावधी मुलांची जीवनं फुलणार नाहीत. अब्जावधीविरुद्धचा अत्याचार व जुलूम संपणार नाहीत.

आज या साऱ्या प्रकाराचा अठरावा दिवस होता. रात्रीचे नऊ वाजले होते. कमलेंद्राला कमालीचा थकवा आला होता, गेले अठरा दिवस तो सर्वतोपरी झटत होता. पण तरीही त्याला ते बातमीपत्रं ऐकायच होतं. सुरवातीच्याच बातमीमध्ये बॉम्बस्फोटाच्या मालिकेला जबाबदार माफिया आणि निष्पाप हत्यांच्या मागे असलेले अतिरेकी यांचे सर्वात मोठे लीडर्स मारले गेले व शेवटचे अड्डे ही उडवले गेल्याचं सांगितलं गेलं आणि त्यानं समाधानानं डोळे मिटले.

■





सोमनिलयमच्या परिसरात सूर्यकिरणांचा पिवळसर तांबूस प्रकाश पसरत होता. पहाट होत होती.

महाराज सत्येंद्र देवघरात आले. पाहतात तो तेथे कमलेंद्र बसलेला दिसला. क्षणात त्यांच्या नजरेसमोर तीस वर्षांपूर्वीचा तो प्रसंग उभा राहिला. तेच देवघर, तोच देव्हारा, त्या देवासमोर बसलेला त्यांचा तोच लाडका बाबू! त्यावेळी त्यांच्या मनात आलेली शंका आणि उभयतांमध्ये घडलेला संवाद त्याना आठवला. या क्षणी त्यांना जाणवलं की त्यांच्या मनात आलेली शंका कमलेंद्रानं एकाच वेळी सत्य ठरवली होती आणि साफ खोटीही ठरवली होती.

सत्य अशासाठी की योगी, संत, साधू यांचे सर्व सद्गुण त्याच्यात विकसित

होत गेले होते आणि खोटी अशासाठी की राजधर्माची श्रेष्ठ वैशिष्ट्येही त्याच्यामध्ये उमळत गेली होती. कमलेंद्राच्या त्या ध्यानस्थ मूर्तीकडे पाहून त्यांना जाणवलं की आत्मज्ञानी राजा जनकापासून चालू असलेली आणि महाराज पूर्णेंद्रांमध्ये त्यांना आढळलेली राजधर्माची परंपरा कमलेंद्रानं वर वर पाहता पूर्णपणे नष्ट केली होती तर खोलवर पाहता नवचैतन्यानं ती अंतर्बाह्य संजीवित केली होती.

महाराज सत्येद्रांना जाणवलं की महाराष्ट्रातील जगप्रसिद्ध संत शिरोमणी ज्ञानेश्वराना अनुस्यूत असलेली विश्वकल्याणाची कल्पना आणि साऱ्या थोर महात्म्यांची स्वप्नं कमलेंद्राच्या द्वारे आविष्कृत होऊ लागली होती. जगभरातील हिंसाचार, दहशतवाद इत्यादींवर मिळालेला विजय म्हणजे कमलेंद्राच्या स्वप्नपूर्तीची पहिली पायरी होती. त्यांच्या असंही मनात आलं की कालपुरुषच कमलेंद्राच्या अस्तित्वातून प्रगट होत होता. कार्यरत होत होता. त्यांचा उर उत्कट आनंदानं भरून आला. डोळ्यात आनंदाश्रू आले. त्या क्षणी त्यांच्या ध्यानात आलं की जीवनभर जोपासलेलं पण त्यांना स्वत:ला न पेललेलं राजधर्माचं शिवधनुष्य कमलेंद्रानं सहज पेललं होतं. इतिहासानं सारी राज सत्ता हिरावून घेतल्यावर देखील इतिहासाला कलाटणी देण्याचं अलौकिक कार्य कमलेंद्रानं केलं होतं. मन्यंतर घडवलं होतं. स्वत:च्या त्या ध्यानस्थ नातवाविषयी त्यांच्या मनात आता आदर दाटून आला. अनिमिष नेत्रानी ते त्याच्या तेज:पुंज सावळ्या चेहऱ्याकडे बघतच राहिले.

त्याचवेळी कमलेंद्रानं डोळे उघडले. तातांकडे लक्ष जाताच त्यालाही तो तीस वर्षांपूर्वीचा प्रसंग आणि त्यावेळी झालेली ती चर्चा आठवली. नकळत त्याला त्या आठवणीनं हसू आलं. ''ताता! काही काळजी करू नका मी साधू वा बैरागी नक्की बनणार नाही!'' तो अवचित म्हणाला.

त्याच्या त्या मिस्कीलपणानं महाराज सत्येंद्र एकदम भानावर आले. म्हणाले,

''बाबू, तुझ्या या काळ्यासावळ्या व्यक्तित्वातून कालातीत परंभाव काळामध्ये चैतन्य फुंकतोयं असं वाटतंय. अन् तो काळ साऱ्या विश्वामध्ये सर्वंकष उत्कर्षाची संजीवनी भरतोय असं वाटतंय! तुझ्या स्वप्नांमध्ये विश्वाचं आर्त होतं म्हणूनच त्या स्वप्नांतून विश्वकल्याणाची सुंदर पहाट उगवतेय!''

ते ऐकून कमलेंद्राचं ऊर भरून आला. आत्मप्रौढीनं नव्हे तर त्याच्या आत्मप्रचीतीला मिळालेल्या त्या विहंगम प्रतिसादानं. त्याच्या अंतरी स्फुरलेला अमृतसागर अशा तऱ्हेनं त्यांच्या हृदयी स्फुरू लागलेला पाहून त्याला आनंदाश्रू आले.

त्याला जाणवलं की केवळ त्याची स्वत:चीच नव्हे तर त्याच्या तातांची व सर्व सत्प्रवृत्त लोकांची स्वप्नं प्रत्यक्षात येत होती. संपूर्ण जगामध्ये स्वधर्मसूर्य, आरोग्य आणि वैश्विक एकात्मता यांचं शिक्षण दिलं जाऊ लागलं. आजपर्यंत पुस्तकी पांडित्याचं अनुत्पादक ओझं घेऊन सहा सहा तास मान मोडून खच्ची होणारी आणि शालेय शिक्षणाला विटणारी मुलं दररोज त्यांच्या आवडीच्या उत्पादक कामात आनंदानं सहभाग घेऊ लागली. अगदी खेड्यापाड्यातल्या शाळांमधून उत्पादकतेचं शिक्षण सुरू झाल्यामुळे मुलं कमवू लागली आणि शाळा सोडण्याचे प्रकार झपाट्यानं कमी होत चालले. साहजिकच हतबल होऊन मजुरी करणाऱ्या मुलांची संख्या कमी होऊ लागली. बालमजूर व भिकारी कमी होऊ लागले. इतिहासाऐवजी इतिहासाचं आकलन आणि बोध व त्याची व्यवहाराची सांगड घालून शिकवली जाऊ लागली. भाषेमध्ये स्मरणशक्तीवर ताण देणारी पाठ्यपुस्तकातील धड्यांची घोकंपट्टी बंद झाली आणि भाषेचं रसग्रहण आणि समर्पक अभिव्यक्ती यावर भर दिला जाऊ लागला. जीवशास्त्र, रसायनशास्त्र,पदार्थविज्ञान या विषयांतर्गत तत्त्वांचा सखोल अभ्यास केला जाऊ लागला आणि त्यातील निरर्थक बोजड पाठांतर बंद झालं. याच्या परिणामी लाखो टन कागदाची ही बचत होऊ लागली. बहुतेक शिक्षणसंस्थांमध्ये फळझाडे, फुलझाडे बहरू लागली. क्रीडांगणं,मर्दानी खेळांनी थडथडू लागली. बहुतेक शाळा कॉलेजातून रिसाक्लेबल मटेरिअलनं बनलेले संगणक आणि इंटरनेटची सोय झाली. जगभरच माहितीची दालनं मुलांना खुली झाली. संगणकाचं मटेरियल रिसायक्लेबल असल्यामुळे ते मटेरिअल परत निसर्गचक्रात सामावण्याची सुरक्षितता तयार झाली व नष्ट न होऊ शकणारे संगणकाचे जुने भाग कमी झाले. शाळा आणि महाविद्यालयं रात्रंदिवस चालू राहिल्यामुळे कर्मचारी पदाच्या नोकऱ्या वाढल्या. शिक्षकांच्या नोकऱ्या वाढल्या. उत्पादकतेमुळे त्यांना पगार अधिक मिळू लागला.

या शिक्षणामुळे मुलांना सम्यक् दृष्टिकोनातून लैंगिकतेचं जीवनातील स्थान व महत्त्व समजू लागलं. लैंगिकतेशी निगडित आर्थिक, सामाजिक, शारीरिक जबाबदाऱ्या, समस्या व उपाय याबद्दल त्यांना यथायोग्य आकलन होऊ लागलं. मोकळेपणा वाढला. पण स्वैराचाराची ओढ कमी झाली. प्रेमभावनेला पंख फुटले. पण वासनेची वावटळ शमू लागली. शृंगार आणि

सौंदर्य वाढू लागलं. नग्नतेचा हव्यास कमी झाला. वीरश्री वाढली पण खुनशीपणा कमी झाला. शरम, लाज आणि दबून जाणं कमी झालं. निर्लज्ज बेशरमपणा कमी झाला. मुलामुलींमधली जवळीक वाढली. पण परस्परांना वापरून घेण्याचा कावेबाज बनेलपणा आणि फसवणूक कमी झाली. परस्परांबद्दलचा दुरावा कमी झाला. पण आदर वाढला. धीटपणा वाढला पण उन्मत्तपणा कमी झाला. वातावरणात हलकेफुलकेपणा आला. खेळीमेळी आली पण छचोरपणा कमी झाला, उदात्ततेची आस वाढली पण संकुचित स्पर्धा, आणि असूया कमी झाली. आत्मविश्वास वाढला. इतर संस्कृतीबद्दलची सहिष्णुता वाढली. अभ्यासूपणा वाढला. पण घासूगिरीची मनोवृत्ती कमी होऊ लागली. शिक्षणातील उत्पादकता व 'गुणवत्ता' वाढली. तशी सर्टिफिकेटस् व 'गुण' यांची किंमत कमी झाली. साहजिकच सर्टिफिकेट व गुण यांसाठी होणारा भ्रष्टाचार आणि अनुत्पादक कोचिंग क्लासेसचं लोण कमी झालं. नोकरीसाठी फक्त गुणवत्ताच बघितली जाऊ लागल्यामुळे आणि नोकरीवर अवलंबून राहू लागू नये असंच शिक्षण मिळाल्यामुळेही समाजातलं वैफल्य कमी होऊ लागलं. त्यामुळे गुन्हेगारीकडे वळणारा तरुणांचा लोंढा आणि गुन्ह्यांचं प्रमाण कमी होऊ लागले. साहाजिकच गुन्हेगारी जगताची ताकद कमी होऊ लागली आणि त्यामुळे नशील्या आणि घातक पदार्थांची आवक-जावक कमी होऊ लागली आणि त्यांना बळी पडणाऱ्यांची संख्या कमी होऊ लागली. याचाच परिणाम म्हणजे वैद्यकीय क्षेत्रावर व्यसनाधीनतेचं ओझं पडणं कमी होऊ लागलं आणि गुन्हे कमी होऊ लागले. त्यामुळे रात्री-अपरात्री स्त्रिया-मुलींना बाहेर पडणं आणि आपापली काम करणं सुरक्षित होऊ लागलं. त्यामुळे त्यांच्या घरातला तणाव कमी होऊ लागला. कौटुंबिक जीवनाची गोडी वाटू लागली. नाचण्या-बागडण्याचं खेळण्याचं, हसण्या-खिदळण्याचं आणि त्याचबरोबर गगनाला गवसणी घालण्याचं स्वातंत्र्य मिळाल्यामुळे मुलांचा हेकटपणा,एककल्लीपणा, घासूपणा उद्धटपणा, चिडचिडेपणा, भित्रेपणा, अस्वस्थपणा,अपराधीपणा, आत्मकेंद्रितता, तुसडेपणा,कोरडेपणा वगैरे अनेक दुर्गुण कमी होऊ लागले. त्यामुळेही घराघरातलं वातावरण वेगानं सुधारू लागलं.

औद्योगिक जगामध्ये नवे प्रवाह सुरू झाले. उद्योगामध्ये प्रार्थनेची

पद्धत सुरू झाली. कामगारांसाठी फॅक्टरी, मिल,कारखाने,ऑफिसच्या जवळ निवासाची सोय होऊ लागल्यामुळे. कामगारांची उत्पादकता वाढली आणि प्रदूषण मुक्तीमध्ये त्यांचाही सहभाग काढला. सिगरेट, गुटखा दारू व तत्सम पदार्थांच्या अशा जाहिराती करून तरुण व कोवळ्या मुला-मुलींना गैरमार्गावर नेणाऱ्यांना रानटी व पाशवी समजलं जाऊ लागलं. नव्या संकेतामुळे जाहिरात व्यवसायालाही उदात्त परिमाण प्राप्त झालं. विविध पूजास्थानामधील शैक्षणिक व उत्पादक उपक्रमांमुळे धर्मग्रंथाच्या पठणावर चरितार्थासाठी अवलंबून राहणाऱ्यांची संख्या कमी होऊ लागली. त्याचप्रमाणे धार्मिक संस्थाच्या ह्या विधायक आणि विश्वकल्याणकारी कार्यक्रमांमुळे सांप्रदायिक कटुता कमी होऊ लागली. जातीयवादी व धर्मद्वेष्ट्या राजकारणाची शक्ती त्यामुळे लुळी पडू लागली. त्यांना मिळणारा आर्थिक पाठिंबा आणि त्यांच्याकडे आकृष्ट होणारे तरुण या दोन्हींमध्ये घट होऊ लागली.

लाखो वैज्ञानिक अण्वस्त्रनिर्मितीच्या विरोधात उतरू लागले. उद्योजकांनी या लाखो वैज्ञानिकांची बुद्धी व संशोधन योग्य तऱ्हेने वापरून किफायतशीर आणि उपयुक्त उत्पादननिर्मिती सुरू केली. या साऱ्यांचा परिणाम असा झाला की राष्ट्राराष्ट्रांमधील संशय व वैर कमी होऊ लागलं.

वैज्ञानिक क्षेत्राप्रमाणेच वैद्यक क्षेत्रात बदल होऊ लागले. संपूर्ण आरोग्याची संकल्पना राष्ट्राध्यक्षापासून ते बालवाडीपर्यंत सर्वांना शिकवली जाऊ लागली. संपूर्ण किंवा सम्यक् आरोग्य आणि सम्यक् वैद्यक यांचे अभ्यासक्रम तयार झाले आणि सर्वच वैद्यकीय पध्दतीचा अभिनिवेश कमी होऊ लागला. वैद्यक महाविद्यालय आणि रुग्णालयामध्ये मोफत सेवा देण्याचं बंद होऊ लागलं व यामुळे डॉक्टर, नर्सेस आणि वॉर्डबॉय या साऱ्यांची संख्या वाढली. पगार वाढले. व सेवेचा दर्जा उंचावू लागला.

सम्यक् दृष्टिकोनाचा परिणाम शेतीव्यवसायावरदेखील दिसू लागला. शेतीचं नियोजन जागतिक आणि स्थानिक अशा दोन्ही पातळ्यांच्या सुसंवादातून होऊ लागलं. त्यामुळे लाखो टन धान्याची बचत होऊ लागली. दुष्काळाचं प्रमाण कमी होऊ लागलं. दुष्काळग्रस्तांची दैना कमी होऊ लागली. एकीकडे सिमेंटचं जंगल तर दुसरीकडे जंगलतोड, एकीकडे लोकांचे लोंढे तर दुसरीकडे सकस जमिनीची हेळसांड असं नेहमीचंच चित्र बदलू लागलं. शेतीची पारंपरिक पद्धत, रासायनिक खतांचे धोके, कीटकनाशकांचे तोटे

इत्यादी बाबींवर संशोधन विचार व ठोस कृती करण्याचं आंतरराष्ट्रीय समुदायाला व नेतृत्वाला पटू लागलं.

पर्यटनसंस्था शैक्षणिक सहलींचं प्राधान्यानं आयोजन करू लागल्या. इथिओपिया ते बांगलादेश आणि निकारगुवा ते व्हिएटनाम अशा जगभरातली शाळकरी बछडी सर्वत्र दिसू लागली. संस्कृतीच्या विभिन्नतेनं विस्मित होऊ लागली. प्रफुल्लित होऊ लागली. नव्या मित्र-मैत्रिणीशी खळाळत्या आवेगानं मिसळू लागली. भावनांचे बंध भाषेच्या बंधनावर आरूढ झाले! डिस्नेलॅण्डमध्ये आशियाई तर मदुराईमध्ये चिनी, पिरॅमिडकडे जपानी तर सिंगापूरला आदिवासी मुलं दिसू लागली.

कमलेंद्राच्या नजरेसमोर जीवनाची सहस्रावधी क्षेत्रे सहस्रदल कमलाच्या पाकळीप्रमाणे उलगडत होती. स्वप्नपूर्तीचे नवे नवे टप्पे दाखवीत होती. सहस्रावधी पाकळयांना अंत नव्हता. त्यांच्या उमलण्याला अंत नव्हता. त्यातून मिळणाऱ्या स्वप्नपूर्तीच्या प्रत्ययकारी संजीवक सुगंधाला अंत नव्हता अन् मर्यादाही नव्हती!

कमलेंद्राच्या डोळ्यात उमटलेली ती प्रसन्नता पाहू महाराज सत्येंद्र एकदम म्हणाले, ''बाबू, मला तुझा अभिमान वाटतो! नायडू घराण्याच्या बेचाळीस पिढ्या उध्दरल्यास तू! आमच्या सर्वांच्या जीवनाचं सार्थक केलस! विश्वविख्यात ज्ञानेश्वरातील पसायदानातील ती शेवटची ओवी आठवते!''

**तेथ म्हणे श्री विश्वेशरावो।**
**हा होईल दानपसावो।**
**येणें वरें ज्ञानदेवो।**
**सुखिया झाला।**

